हे पुस्तक पर्यावरण रक्षी पुनर्निर्मित कागदावर छापलेले आहे.

ISBN 81-237-1826-8

1996 (शके 1918)



Original Title : Nisarga (Kannada)

Translation : Nisarga (Marathi)

रु 54.00

संचालक, नॅशनल बुक ट्रस्ट, इंडिया,
ए-5, ग्रीन पार्क, नवी दिल्ली-110016
यांनी प्रकाशित केले.

# भूमिका

कन्नड साहित्याने एक हजार वर्षं कधीच पूर्ण केली आहेत, परंतु कन्नड कादंबरीने अजून शंभर वर्षंही पूर्ण केलेली नाहीत. स्वातंत्र्य प्राप्तीनंतर कादंबरी साहित्याचा कल्पनातीत विकास झाला आहे आणि प्रतिवर्षी त्यात वाढच होते आहे. आता ह्या साहित्य प्रकाराचा एवढा विकास झाला आहे की कोणीही एक समीक्षक असा दावा करू शकणार नाही की आपण साऱ्याच्या साऱ्या कन्नड कादंबऱ्या वाचून त्यांची समीक्षा करण्यात यश मिळवू शकू. परंतु हे म्हणणेही उचित होणार नाही की केवळ वैपुल्य आणि विविधता साहित्याच्या गुणवत्तेस पोषक ठरते.

कादंबरी म्हणजे काय ? ह्या साहित्य प्रकाराचा जन्म कुठे झाला ? कधी झाला ? ह्याच्या विकासाच्या रूपरेषा, रीती-रिवाज वा पध्दती काय आहेत ? हा साहित्यप्रकार कन्नडमध्ये कधी अस्तित्वात आला ? कसा आला ? का आला ? ह्याची उत्पत्ती कशी काय होत आहे ? ह्याच्या संवर्धनास कोणाकोणाचे योगदान कारणीभूत झाले. ह्याच्यासाठी कोणी कोणी कार्य केले ? कोणाला त्यात यश प्राप्त झाले ? ह्या यशाची... सफलतेची इतरांशी तुलना करता त्याचा स्तर वा प्रत काय आहे ? ही कादंबरी कोणत्या दर्जाची आहे ? ह्या प्रश्नांचे स्थूलमानाने उत्तर देणे हाच या संक्षिप्त लेखाचा उद्देश्य आहे. हा काही कन्नडमध्ये प्रकाशित झालेल्या समस्त कादंबरीकारांच्या साहित्यकृतींचा समीक्षणात्मक परिचय नव्हे.

कादंबरी म्हणजे काय ? ह्याची सरळ साधी व्याख्या सांगता येणं कठीण आहे. ह्या साहित्य प्रकाराचे वैशिष्ट्यच मुळी हे आहे की, त्याला निश्चित असे कुठलेही रूप नाही. उत्कृष्ट कादंबरी हा असा साहित्य प्रकार आहे की जो सर्वसामान्यत: एखाद्या विशिष्ट जनसमूहाच्या वा वर्गाच्या आशा आकांक्षा, आवडी निवडी, अभिरूची त्याचप्रमाणे त्याचा सांस्कृतिक स्तर विस्तृतपणे प्रतिबिंबित करतो. जसजशा एखाद्या जनसमूहाच्या आशा आकांक्षा आणि आवडी निवडी देशकालपरत्वे बदलत जातात तसतसे कादंबरीची कथावस्तू आणि स्वरूप यांच्यातही परिवर्तन घडून यायला लागते. अर्थातच हा साहित्य प्रकार सदैव लोकजीवनाच्या बरोबरीने विकसित होत जातो. अतएव कादंबरी हा जसा गतिमान तसाच लोकप्रिय असा साहित्य प्रकार आहे.

कन्नडमध्ये कादंबरीची सुरूवात पाश्चात्य साहित्याच्या - मुख्यत्वेकरून इंग्रजी साहित्याच्या प्रभावाने 'कन्नडच्या नवोदय' काळात झाली. तोवर कादंबरीने साऱ्या यूरोपीय भाषांत तीनशे वर्षांची कालक्रमणा पूर्ण करून आपले एक महत्वपूर्ण स्थान साहित्यात निर्माण केले होते. पाच सहा देशातील अनेक थोर साहित्यिकांच्या साहित्य साधनेद्वारे कादंबरीचा सर्वांगानं विकास झाला होता. अनेक कादंबरीकारांनी आपआपल्या शैलीनुसार कादंबरीचे तंत्र विकसित करून तिच्यात वैविध्य आणले होते. सर्वांगानं विकसित झालेला हा साहित्य प्रकार कन्नडमध्ये या शतकाच्या तिसऱ्या दशकात प्रकट झाला.

याचा अर्थ असा नव्हे की 1920 च्या पूर्वी कन्नडमध्ये कादंबरी लेखन हे झालेच नव्हते. कादंबरी लेखन जरूर झाले होते, परंतु त्यात नांव घेण्यासारख्या अशा कादंबऱ्या फारच थोड्या होत्या. साहित्य समीक्षकांचे असे मत आहे, की मुद्दण्णानं 'गोदावरी' नावाची कादंबरी अर्धीमुर्धीच काय ती लिहिली होती. केंपुनारायणच्या 'मुद्रामंजूष' मध्ये कादंबरी - सुलभ कथन शैली आणि भाषेची सहजता दिसून येते. गुलवाडी अण्णारायनं 1899 मध्ये एक सामाजिक कादंबरी लिहिली होती. ह्या युगाच्या (कन्नडचा नवोदय) प्रारंभी प्रकाशित मौलिक (स्वतंत्र अशा अर्थाने) कादंबऱ्यात बोलार बाबूराव यांची 'वाग्देवी', एम्. एस्. पुट्टण्णाची 'माडिदुण्णो महाराया', केरूर वासुदेवाचार्य यांची 'इंदिरे' आणि श्रीमती तिरूमलांबा यांच्या कादंबऱ्या उल्लेखनीय आहेत. ह्यातील पहिल्या कादंबरीत वैदिक समाजाच्या अवनतीचे चित्रण आहे. दुसरीत म्हैसूरच्या जनजीवनाचे वास्तवपूर्ण चित्रण झालेले आहे. 'इंदिरे' मध्ये सुशिक्षित समाजाचे काल्पनिक चित्र रंगविलेले आहे. त्याचप्रमाणे तिरूमलांबाच्या साहित्य कृतीत सामाजिक चर्चा आढळते. यांवरून हे स्पष्ट होते की या कादंबऱ्यावर पाश्चात्य साहित्याची छाप आहे.

वस्तुत: कन्नड कादंबरीवर पाश्चात्य कादंबरीचा हा जो प्रभाव आपणास आढळतो तो बंगाली आणि मराठी कादंबऱ्यांच्या द्वारे घडून आला आहे. सर वॉल्टर स्कॉट यांच्या धाटणीनं लिहिल्या गेलेल्या बंकिमचंद्रांच्या बंगाली कादंबऱ्यांचा बी. वेंकटाचार्यांनी कन्नडमध्ये अनुवाद केला आहे. त्यातील प्रमुख म्हणजे - 'विषवृक्ष', 'आनंदमठ', 'देवी चौधुरानी' - आणि ह्या अनुवादित कादंबऱ्या आजही चांगल्याच लोकप्रिय आहेत. त्याचप्रमाणे हरिनारायण आपटे यांच्या 'ईश्वरी सूत्र', 'उष:काल', 'कमलकुमारी' (गड आला पण सिंह गेला), 'वज्राघात' वगैरे मराठी कादंबऱ्यांचा गळगनाथ यांनी कन्नडमध्ये अनुवाद केला, ज्यांचा रसिकतेनं आस्वाद घेणारा वाचक वर्ग आजही अस्तित्वात आहे. गळगनाथ यांनी 'माधव करूण विलास' नामक एक स्वतंत्र कादंबरीही लिहिली होती परंतु तिला त्यांच्या अनुवादित कादंबऱ्यांची उंची लाभली नाही. सार हे, की ह्या दोन अनुवादकांनी कन्नड कादंबरीचं रिक्त भांडार उत्तम साहित्यकृतींनी समृद्ध करण्याचा प्रयत्न

केला आहे. त्यायोगे कन्नड वाचकांना कादंबरीचा रसास्वाद काय असतो याची कल्पना आली. त्यांनी आपल्या कादंबरीद्वारा लोकांत साहित्याची गोडी निर्माण केली आणि कन्नड गद्य साहित्याला एक नवे रूप प्रदान केले.

कन्नड साहित्याच्या नवोदयाची तुतारी फुंकणारे थोर व्यक्तित्व म्हणजे आचार्य बी. एम्. श्रीकंठय्या. त्यांनी दर्शविलेल्या मार्गानं कन्नडचा जो कार्यारंभ झाला, तो आजही अव्याहत चालू आहे. पाश्चात्य साहित्याचा अनुवाद, अनुकार आणि त्याच्याही पुढे जाऊन त्याच्या प्रभावानं प्रेरित होऊन स्वतंत्र दृष्टिकोनातून स्वतंत्र साहित्य रचना त्यांच्याच प्रेरणेनं झाली आहे. याची सत्यता साहित्याच्या प्रत्येक शाखेत प्रत्ययास येते पण आपण इथे फक्त कादंबरी साहित्याचीच चर्चा करू या.

1920 ते 1947 पर्यंतच्या कादंबरी लेखनास 'संक्रांती काल' आणि त्यानंतरच्या पर्वास 'उत्कर्ष काल' म्हणता येईल. या अवधीमध्ये लिहिल्या गेलेल्या कादंबऱ्यांचे स्थूलमानानं येणेप्रमाणे वर्गीकरण करता येईल. पौराणिक, ऐतिहासिक, सामाजिक, प्रादेशिक, कौटुंबिक, विडंबनात्मक, समस्याप्रधान, विचारात्मक, मानसशास्त्रीय आणि राजनैतिक वगैरे. याचा अर्थ असा नव्हे की एकेका कादंबरीत एकेक विषयाची चर्चा केली गेली आहे. ते तर अशक्य आहे. अनेक उत्कृष्ट कादंबऱ्यात हे सर्व विषय अथवा यातल्या काही विषयांचे गुणदोष दिसून येतात.

नवोदय काळाच्या आधी ऐतिहासिक (अनुवादित) कादंबऱ्या अधिक होत्या. संक्रांती कालात ह्या विषयावर फारच थोड्या कादंबऱ्या लिहिल्या गेल्या. ज्यांचा आवर्जून उल्लेख करता येईल, अशा फक्त तीनच आहेत आणि त्या म्हणजे देवुडु नरसिंह शास्त्रींची **'मयूर'** आणि आनंदकंदाची 'राजयोगी' त्याचप्रमाणे 'अशांति पर्व'. 'मयूर' मध्ये कल्पनेची पुटं अधिक असली तरी ती एक अद्भुतरम्य आणि रम्य कृती आहे. आनंदकंदांच्या कादंबऱ्यात विजयनगरच्या राजनैतिक आणि सामाजिक जीवनाचे निरूपण चातुर्ययुक्त शैलीनं केले गेले आहे. विडंबनात्मक कादंबऱ्याही फक्त तीनच आहेत. शिवराम कारंत यांची पहिली कादंबरी 'देवदूत', श्रीरंग यांची 'विश्वामित्राची सृष्टी' आणि ना. कस्तूरींची 'गालिगोपुरा'. पहिल्या कादंबरीत समाजाचं प्रखर विश्लेषण आहे आणि पौराणिक कथेतील हा एक नवा चमत्कार आहे. दुसऱ्या कादंबरीत, कादंबरीच्या कथानकाचा विकास त्याचप्रमाणे पात्र विश्लेषणात चमत्कृतीस प्राधान्य आहे. परिणामत: जागोजागी हास्याच्या फुलबाज्या झडू लागतात. तिसरीमध्ये सहज विरोधांची विकृती त्याचप्रमाणे व्यक्ती आणि समाज यांचे विडंबन चित्रित केल्याचं दिसून येतं. विनोद हाच त्याचा महाप्राण आहे. हास्यरस प्रधान अशी आणखी एक कादंबरी आहे. आणि ती म्हणजे कस्तूरी लिखित 'चक्रदृष्टी'. ही कादंबरी व्यक्तिचित्रणात्मक आहे. त्यात नवतंत्राचा वापर केला गेला

आहे. नवतंत्राचा उपयोग करून घेऊन लिहिली गेलेली आणखी एक कादंबरी आहे. 'अंतरंग'. प्रस्तुत कादंबरीत देवडुंनी प्रथमत:च मनोविश्लेषणाचा कलात्मक प्रयोग केला आहे. अशा प्रकारच्या विषयावर लिहिल्या गेलेल्या आणखी काही कादंबऱ्यांचा इथं उल्लेख करता येईल. कारंतकृत 'सूलेय संसारा' ही वास्तवपर कादंबरी असून आणि त्यांचीच 'बेहदजीव' ही कादंबरी प्रादेशिक स्वरूपाची आहे. श्रीरंग लिखित 'भरमप्पनभूत' ही गुप्तहेर कादंबरी आहे. रसिकरंगांच्या 'वालुरि' आणि 'कारण पुरूष' समस्यामूलक त्याचप्रमाणे विचारात्मक कादंबऱ्या आहेत. 'सुदर्शन' ही एक सुंदर कौटुंबिक कादंबरी आहे. 'बिडुगडेय बेले' राजनैतिक आहे. मास्ती वेंकटेश अय्यंगार यांची 'सुब्बण्णा' ही जरी एक लघु कादंबरी असली तरी तिच्या शाश्वत मानवतेच्या गोडीनेच जीवनाची ती पूर्ण अभिव्यक्ती झाली आहे. तिच्यात एका गायकाच्या जीवनाची मार्मिक गाथा आहे.

गायकाच्या जीवनाचा उल्लेख करीत असताना 'संध्याराग' ची चर्चा आवश्यक आहे. बहुतेक करून ही ए. एन्. कृष्णराव यांची सर्वश्रेष्ठ कादंबरी होय. या आधी त्यांनी 'उदयराग' नामक आपल्या कादंबरीत एका चित्रकाराच्या जीवनाचे चित्रण केले आहे. त्यानंतर त्यांनी 'साहित्य रत्न' मध्ये साहित्यिकाचे आणि 'नटसार्वभौम' मध्ये अभिनेत्याचे जीवन रंगविले आहे. ह्या सर्व कादंबऱ्याच्या लेखनामागे लेखकाचा उद्देश कलाकारास आपल्या कलेच्या अभिवृध्दीसाठी समाजाबरोबर कशा प्रकारचा संघर्ष करावा लागतो हे दर्शवून देणे हा आहे. परंतु ह्या कादंबऱ्यात संताप आणि वास्तवता यांच्या नावाखाली कादंबरीकारानं कामजीवनाचं विकृत चित्रण केले आहे.

कन्नड कादंबरी क्षेत्रात सुरूवातीपासून आजतागायत सातत्यानं श्रेष्ठ दर्जाचं लेखन करणाऱ्या साहित्यिकात शिवराम कारंत यांचे नाव विशेष उल्लेखनीय म्हणूनच गणले जाईल. पंचेचाळीस वर्षांत तीस - पस्तीस कादंबऱ्या लिहिणं हे त्यांच्या संयमाचे द्योतक आहे. 1947 पूर्वी त्यांनी फक्त सातआठ कादंबऱ्या लिहिल्या होत्या. 'सूलेय संसार' ह्या त्यांच्या सुरूवातीच्या कादंबरीत वैधव्याचं दु:ख, 'नरसम्मान समाधि' मध्ये नीरस दाम्पत्य, वैराण वैवाहिक जीवन आणि 'चोमनदुडि' मध्ये दारिद्र्य तसंच अस्पृश्यता यांची समस्या चित्रित झाली आहे. 'बेहदजीव' ची कुडी लहान असली तरी ती एक सुंदर प्रादेशिक कादंबरी आहे. सहज कुतुहल जागं करून पात्राच्या ठायी आसक्ती निर्माण करून स्वाभाविक चित्रण सादर करणं हे या कादंबरीचं वैशिष्ट्य आहे. 1942 मध्ये प्रसिद्ध झालेली त्यांची 'मरलिमण्णिगे' ही कादंबरी आजही त्यांची सर्वश्रेष्ठ कादंबरी मानली जाते. तो त्यांच्या प्रतिभेचा प्रगल्भ आविष्कार आहे. तीन पिढ्यांच्या जीवनाचे सुसंबध्द विवेचन, अर्थपूर्ण निसर्ग चित्रण, संयत विस्तार, समर्थ व्यक्तिचित्रण; त्याचप्रमाणे

प्रादेशिक (बोलीभाषेच्या) शैलीचे प्राधान्य वगैरे गुणांमुळे 'मरलिमण्णिगे' कन्नडमधील एक थोर कादंबरी मानली जाते. ह्या कादंबरीचा सर्वात मोठा गुण हा की, निसर्गाची धारणा आणि संहार ह्या दोन्ही शक्ती मानवी जीवनाच्या द्वारे अभिव्यक्त झाल्या आहेत.

प्राय: याच दर्जाची आणि ह्याच प्रकारची दुसरी एक कादंबरी आहे. कुवेंपु (के. वी. पुट्टप्पा) ची 'कानूरू हेग्गडती'. ह्या कादंबरीत प्रादेशिकतेचा सूर प्रमुख आहे. हार्डीच्या 'रिटर्न ऑफ द नेटिव' ची आठवण करून देणाऱ्या ह्या कादंबरीत प्रादेशिकताही सार्वभौमतेच्या स्तराला पोहचली आहे. तिथे एगडन तसंच हीथ ज्याप्रमाणे केवळ कथेची पार्श्वभूमी न राहता पात्रांच्या जीवंत चित्रणाला सहाय्यीभूत होतात, त्याच प्रमाणे इथेही मलेनाडू कथेचे बाह्यावरण न होता पात्रांच्या जीवनाचं एक अंग झाले आहे. मूलत: कवी कुवेंपुनं आपले तत्कालीन जीवन दर्शनच ह्या गद्यरूप महाकाव्यात व्यक्त केले आहे असे म्हटले तर ते चुकीचे होणार नाही.

कन्नडमधील आणखी एक प्रचंड म्हणता येईल अशी कादंबरी म्हणजे 'समरसवे जीवन'. प्रस्तुत कादंबरीचा पहिला भाग 'इज्जोडु' या नावाने स्वातंत्र्यपूर्व काळात प्रसिध्द झाला होता. ज्या प्रकारे कारंतांनी पश्चिम कारावलीचं आणि कुवेंपुंनी मलेनाडुचं चित्रण केलं, त्याचप्रकारे विनायक (व्ही. के. गोकाक) यांनी उत्तर कर्नाटकाच्या पार्श्वभूमीवर (आणि तिथल्या त्या वातावरणात) ह्या कादंबरीची सुरूवात केली आहे. 'कानूरू' च्या हूवय्या प्रमाणेच धारवाडचा नरहरीही आदर्श व्यक्तिरेखा आहे. ही कादंबरीही वास्तवात दोन घराण्यातील परस्पर द्वेष-वैमनस्य कशा प्रकारे कौटुंबिक जीवन विषमय करून सोडते ही विशेषत्वेकरून दर्शविते. ही पुरी करायला लेखकाला वीस वर्षे लागली. विनायकांचा जीवनानुभव, प्रतिभा, दृष्टिकोन त्याच प्रमाणे जीवनदर्शन या साऱ्याचा कसकसा विकास होत गेला हे यावरून दिसून येते.

सार असे की कन्नड कादंबरीच्या 'संक्रांतिकालां'त, दोन बृहतकाय आणि उत्कृष्ट दर्जाच्या अन्य अनेक कादंबऱ्या लिहिल्या गेल्या. सर्वसाधारणपणे या काळात सर्व प्रकारच्या विषयावरील कादंबऱ्या लिहिल्या गेल्या. कथावस्तूच्या विविधतेच्या जोडीनेच तंत्राच्या वैविध्याचेही यात दर्शन घडते. साहित्य समीक्षकांच्या मतानुसार ह्या काळात केवळ ऐंशी नव्वद कादंबऱ्या लिहिल्या गेल्या असतील. संख्येच्या दृष्टीने त्या फार नाहीत परंतु महत्त्व आणि प्रभाव ह्या दृष्टीने विचार करता त्या कोणत्याही भारतीय भाषा भगिनीच्या तुलनेत कमी वा उण्या नाहीत. पश्चिमात्य वाङ्मयीन वातावरणाच्या प्रभावानं निर्माण झालेल्या कादंबऱ्या कन्नडभूमीत उत्तमप्रकारे फुलाय फळायला लागल्या.

देश स्वतंत्र झाला. कर्नाटकचे एकीकरण झाले. कन्नड जनता जागृत झाली. कविवाणीने आदेश दिला, की कन्नडच्या अभिवृध्दीस हातभार लावा. येवढं झाल्यावर काय पुसता !

वीर कर्नाटकी एक झाले. समान हितानं प्रेरित झालेली लेखणी लिहू लागली. अनेक कादंबऱ्या लिहिल्या गेल्या. ह्या समृध्दी कालात लिहिल्या गेलेल्या साहित्याचं मूल्यांकन काळच करू शकेल.

विनायक सुरवातीपासूनच लिहीत होते. 1934 मध्ये लिहायला घेतलेली 'इज्जोडु' नावाची कादंबरी 1954 मध्ये लिहून पूर्ण झाली. तेव्हां तिचं नाव बदलून 'समरसवे जीवन' असे ठेवले गेले होते. हिचा आरंभ विरसतेत झाला, परंतु शेवट समरसतेत. ह्या कादंबरीच्या योगे कन्नड कादंबरीच्या विकासाचा परिचय होतो. दरम्यान कुवेंपुने आपली दुसरी कादंबरी 'मलेयल्लि मदुमगलु' प्रकाशित केली.

ह्या सव्वीस वर्षात कारंतनी जवळ जवळ तितक्याच कादंबऱ्या लिहिल्या आहेत. ते कोठल्याही संप्रदायामागे गेले नाही. आणि त्यांनी स्वत:ही कुठला संप्रदाय वगैरे निर्माण केला नाही. त्यांची प्रत्येक कादंबरी कथा वस्तू आणि रचनाशैलीदृष्ट्या स्वतंत्र ढंगाची उतरली गेली. त्यांनी जीवनाच्या हरएक पैलूचे वैज्ञानिक दृष्टीकोनातून विश्लेषण करून पाहिले आहे. त्यांची अशी धारणा आहे की, साहित्याची निर्मिती स्वानुभवांच्या सामर्थ्यावरच करायला हवी. ह्यासाठी त्यांनी हा उभा देश या टोकापासून त्या टोकापर्यंत स्वत:च्या पायाखाली घातला आहे. त्यांच्यापाशी अनुभव आणि विचार या दोहोंचेही ऐश्वर्य आहे. आदर्शवादी असूनही ते वास्तवतेशी एकनिष्ठ आहेत. त्यांच्या 'कुडीयर कूसु', 'मुगीयद युध्द', 'हेत्तलानायी', 'सन्याशीय बुदुकु', 'मोग पडेद मन', 'चिगुरिद कनसू', 'करूलिन करे', 'समीक्षे', 'मुकज्जिय कनसूगलुलू', 'आल निराल', आणि 'अलिद मेले' वगैरे सारख्या कित्येक कादंबऱ्या आजही विद्वानांप्रमाणेच सर्वसामान्य वाचकातही सारख्याच लोकप्रिय आहेत. एवढेच नव्हे तर अग्रगण्य समीक्षकांचे असे मत आहे की कारंत, ज्यांचा उभ्या भारतानं सार्थ अभिमान बाळगावा असे एक थोर कन्नड कादंबरीकार आहेत.

ह्या उत्कर्ष कालात अनेक लेखकांनी खूप काही लेखन केले. त्यातील 'मंगल सूत्र', 'गृहलक्ष्मी' वगैरे सारख्या काही कादंबऱ्या आदर्श प्रधान कादंबऱ्या आहेत. 'शिवसंतान', 'नग्नसत्य', 'संजेगत्तुल' अशा काही कादंबऱ्यातून माणसाच्या अध:पाताचे विवेचन केले गेले आहे. या कादंबऱ्यात सर्वत्र एकप्रकारची आत्मीयता पसरलेली दिसते. यांचाच मार्ग अनुसरणारे न. रा. सुब्बराव यांनी आपल्या सामान्य कादंबऱ्यातून वेश्याजीवन, स्त्री-स्वातंत्र्य, कौटुंबिक जीवनाची शिथिलता वगैरे समस्यांचे विवेचन केले आहे. त्यांच्या 'हंसगीते', 'कंबनियकुयिलू', 'रक्तरात्री', 'तिरूगुबाग' ह्या ऐतिहासिक कादंबऱ्या अतिशय लोकप्रिय आहेत. त्यांची कथानके आणि पात्र योजना ह्यामध्ये गतकाल वर्तमानात आणून उभा करण्याची अद्‌भूत कल्पनाशक्ती आहे. काही संवाद नाट्यपूर्ण आहेत.

ऐतिहासिक कादंबऱ्यात कलानुरूप वेशभूषेचे चित्रण करण्यात जागरूकता आणि प्रामाणिकपणा दृष्टीस पडते. मथितार्थ हा की, चित्रदुर्गच्या नायकांचा काल यशस्वीपणे सादर करण्याचे त्यांचे सामर्थ्य असामान्य आहे असंच म्हणावं लागेल.

ऐतिहासिक कादंबऱ्या लिहिण्याचा प्रयत्न अनेक लेखकांनी केला आहे. कर्नाटकाच्या गतवैभवाचे चित्रण करणं हाच त्यांचा त्यामागचा उद्देश आहे. त्यासाठी आवश्यक तो शोध घेण्याची कल्पनाशक्ती सर्वांमध्ये सारख्याच प्रमाणात अस्तित्वात आहे असे मात्र म्हणता येणार नाही. इथे प्रमुख लेखकांचाच काय तो उल्लेख केला जाणार आहे. मास्ती हे ह्या सर्वांत थोर आहेत. श्रेष्ठ आहेत. त्यांच्या दोन कादंबऱ्या आहेत. 'चेन्नबसवनायक' आणि 'चिक्कवीर राजेंद्र'. ह्या कादंबऱ्या वाचल्या की आपले कार्य संपादिण्याचे सामर्थ्य मास्तींच्या ठायी निश्चितच आहे याची स्पष्ट कल्पना येते. आपल्या संस्कृतीविषयीचे जे प्रेम, जे आकर्षण त्यांच्या ठायी आहे ते अन्य लेखकांच्या ठिकाणी दृष्टीस पडणे दुर्मिळच म्हणावे लागेल. गतकालीन जीवन आणि संस्कृती जिवंतपणे उभी करण्यात मास्ती केवळ अद्वितीय आहेत. बहुदा ह्या दर्जाची आणखी एक कादंबरी म्हणजे के. वी. अय्यर यांची 'शांतला' ही होय. (समेतनहळ्ळी रामराय यांच्या 'सवती गंधावरणे' चा ही या संदर्भात इथं उल्लेख करता येईल.) अय्यर कृत 'रूपदर्शी' इतिहास आणि पुराण यांच्यामधली साहित्यकृती आहे. पौराणिक कादंबऱ्या लिहिणारे एक काय ते देवडु नरसिंह शास्त्रीच आहेत. त्यांच्या 'महाब्राह्मण', 'महाक्षत्रिय' आणि 'महादर्शन' अशा तीन कादंबऱ्या प्रसिद्ध आहेत. या कादंबऱ्यांसाठी त्यांनी प्रागैतिहासिक प्रथानक घेतले आहे. वास्तवात ते भूत आणि वर्तमान यांचा संयोग घडवून आणणारे साहित्य शिल्पी आहेत. गतकाल आणि सद्य:काल यांची सांगड घालण्याचे जे काही कादंबरीकार आहेत, त्यात कोटी श्रीनिवास राय हे प्रमुख होत. त्यांनी इतिहासाची चौकट न मोडता सत्य तसेच कायम ठेवून आणि वाचकांची आवड ध्यानी घेऊन आकर्षक कथानकांच्या आधारे सुंदर कादंबऱ्या लिहिल्या. टिपू सुलतान हा विषय घेऊन कथानकांची एक मालिका सादर केली आहे. ह्याच विषयावर लिहिली गेलेली वीर केसरींची 'दौलत' नावाची कादंबरी, त्याचप्रमाणे एम. एन. मूर्तींच्या 'संधान', 'संविधान' आणि 'संहार' या तीन कादंबऱ्या उल्लेखनीय आहेत.

बी. पुट्टस्वामय्यांची 'क्रांतिकल्याण' ही कादंबरी विशेषत्वानं उल्लेखनीय आहे. ही सहा भागात प्रसिद्ध झाली असून तिच्यात बाराव्या शतकातील कर्नाटकाच्या जनजीवनाचं व्यापक चित्रण केले गेले आहे. साहित्यामध्ये संस्कृती, राजनीती, धर्म, समाज आणि प्रशासन यांचे चित्रण कशाप्रकारे होऊ शकते याचेही कादंबरी एक उत्कृष्ट उदाहरण आहे.

या विपरीत ज्यांची कथा-वस्तू अत्यंत मर्यादित क्षेत्रापुरतीच बंदिस्त आहे अशा काही कादंबऱ्या लिहिल्या गेल्या आहेत. कारंत यांची 'कुडीयर कुसू' पश्चिम कारावलीतील केवळ कुडीयरांचेच जीवन चित्रित करते. गणपतींच्या 'कन्निकावेरी' मध्ये कोडगु (कुर्गमधील) लोकांचे जीवन चित्रित झाले आहे. अशाप्रकारे भारती सुत यांचे 'हुलियबानू', 'चिगुरू हासिगे' मध्ये केरळच्या सीमावर्ती प्रदेशातील एका विशिष्ट जन-समुहाचं चित्रण झालं आहे. बिंदुमाधवांनी 'बलिपीठ' ह्या आपल्या कादंबरीत मेंढपाळ - धनगरांचं जीवन चित्र रंगविलं आहे. त्याचप्रमाणे मिर्जि अण्णाराय यांनी 'निसर्ग' मध्ये उत्तर कर्नाटकाच्या सीमेलगतच्या ग्रामीण जीवनाचं चित्र वर्णन केलं आहे. एम. इनामदार यांनी 'कनसिन मने', 'कदिट्टमने' आणि 'बाडिदहूवु' मध्ये सुशिक्षित वाचकांसाठी सुशिक्षित जीवनाच्या समस्या सादर केल्या आहेत. गोरूर रामस्वामी अय्यंगार यांनी 'नम्मूरिन रसिकरु' मध्ये एका गावातल्या अनेक लोकांचं चित्रण मोठ्या मनोरंजक ढंगात शब्दबध्द केलं आहे. ते 'पिकविक पेपर्स' चं स्मरण करून देतं. विनोदात्मक कादंबऱ्यामध्ये 'नम्मूरिन रसिकरू'चं स्थान अग्रगण्य आहे.

गोरूर प्रमाणेच जुन्या पिढीतील आणखी एक प्रसिद्ध लेखक म्हणजे 'श्रीरंग' (आद्य रंगाचार्य) हे होत. त्यांचा विनोद हृदयस्पर्शी (मनाला गुदगुल्या करणारा) नसून बुद्धिस्पर्शी (बुद्धि गम्य असा) आहे. ते साऱ्या काव्य-पुराणांची समकालीन जीवनाशी सांगड घालून पाहण्याचा प्रयत्न करतात. याची फलश्रुती म्हणजे त्यांची 'विश्वामित्राची सृष्टी' ही साहित्यकृती होय. श्रीरंगांनी पाश्चात्य साहित्य आणि संस्कृती यांचा गाढा अभ्यास केला आहे. त्यांच्या कादंबऱ्यांना कन्नड साहित्यात एक विशेष स्थान आहे. त्यात मनोविश्लेषणाचे नाविन्य आहे. हे सत्य त्यांच्या 'पुरूषार्थ', 'अनादि', 'प्रकृती', 'पुरूष', 'कुमारसंभव' आदिमध्ये प्रचितीस येते. निसर्गाच्या लीलेचं मानवाला आकलन होत नाही. तो नित्य आहे. अबाधित आहे. त्या नित्यतेसमोर मानवी ज्ञानाची मर्यादा स्पष्ट करून दाखविणं हेच या कादंबऱ्यांचं उद्दिष्ट आहे.

निसर्गाचे सातत्य, मानवाचं क्षणभंगुरत्व आणि ह्या दोहोंच्या संघर्षात मानवाचा पराभव ह्या प्रतिपाद्य विषयाला कथारूप देऊन रावबहादूरनी 'ग्रामायणा' त एक 'रामायण'च लिहिले आहे.

आजच्या लेखकातील एस्. एल्. भैरप्पा यांची 'वंशवृक्ष' ही कादंबरी जीवनाच्या एका बृहत् कथावस्तूवर आधारित आहे. जीवनावरील श्रध्दा आणि मूल्य विषयक संघर्ष ह्यात गुंतून एखादी व्यक्ति कशा प्रकारे तगमगते, अस्वस्थ होते हे सत्य ह्या कादंबरीत फार सहज सुंदर पध्दतीनं व्यक्त केले गेले आहे. नदीचं मूळ आणि गुरू अथवा ऋषीचं कूळ शोधू नये. शांतीचं मूळ किती पोकळ आहे हे दुःखद सत्य इथं पाहावयास मिळते.

प्रस्तुत लेखकाच्या आणखीही काही कादंबऱ्या आहेत. त्यापैकी 'गृहभंग', 'मतदान', 'जलपात', 'दूरसरिदरू' आणि 'नायिरनेरलु' यांचा उत्कृष्ट असाच उल्लेख करावा लागेल. अखेरच्या कादंबरीत भैरप्पांनी अलिकडेच पुनर्जन्माच्या संबंधात लिहिल्या गेलेल्या संशोधनपर लेखांच्या आधारे, काही लोकांना पूर्वजन्माचे स्मरण राहिल्यानं त्याचा समाजावर काय परिणाम घडून येतो, हे दाखविण्याचा यशस्वी प्रयत्न केला आहे.

मानसशास्त्रावर आधारित कादंबरी लेखन करणाऱ्यात श्रीमती अनुसया 'त्रिवेणी' ह्या अग्रगण्य आहेत. त्यांच्या 'बेविकन कण्णु', 'दूरदबेट्ट', 'मुच्चिदबागिलु', 'शरपंजर' वगैरे कादंबऱ्या याचं उदाहरण आहे. त्यांच्या 'हृदयगीत', 'तावरेकोल', 'हण्णले चिगुरिदाग', 'वसंतगान', आणि 'बेलिमोड' ह्या कादंबऱ्याही अत्यंत लोकप्रिय आहेत. लेखिकेची एक विशिष्ट शैली आणि दृष्टिकोन हे तिच्या लोकप्रियतेचे कारण आहे. प्रस्तुत लेखिका जीवनाकडे कुतुहल युक्त नजरेनं पहात, जे आपल्याला जाणवलं त्याचं मृदू, लालित्ययुक्त आणि विनोदपूर्ण शैलीत दर्शन घडविते. त्यांच्या कादंबऱ्यात आलेलं कौटुंबिक चित्रण घडू शकतील अशाच घटना प्रसंगाचे असते. अशा प्रकारे खास स्त्री-दृष्टिकोनातून कौटुंबिक जीवनाचे चित्रण करणाऱ्यात वाणी, एम. के. जयलक्ष्मी, एम. के. इंदिरा आणि अनुपमा निरंजन ह्या कादंबरीकार उल्लेखनीय आहेत.

निरंजन, कृष्णमूर्ति पुराणिक आणि बसवराज कट्टीमनी हे तिघेही सामर्थ्य संपन्न लेखक आहेत. त्यांनी खूप लेखन केलं आहे. पाश्चिमात्य 'संतप्त तरूणां' प्रमाणेच त्यांनी समाजावर टीकेची धार धरली आहे. त्यांच्या साहित्यात जीवनात अनुभवास येणारे अन्याय, असत्य आणि अनीती यांच्याशी लढून झगडून आदर्शाच्या दिशेनं मार्ग क्रमण्याचं धाडस जाणवतं आणि आणखी जाणवतं ते एक वेड. परंतु त्यांचं हे समाज-प्रेमच त्यांच्या कलेला आघात कारक ठरले आहे. त्यांच्या उत्कृष्ट साहित्यकृती म्हणजे : कट्टीमनी यांची 'ज्वालामुखिय मेले' आणि मण्णुमुत्तु हेण्णे, निरंजन यांच्या 'बनशंकरि' अन् 'रंगम्मन वठार', पुराणिकांच्या 'मुत्तैदे' आणि 'बेवारिन बेले' ह्या कादंबऱ्या. अन्याय आणि अनीतीच्या दुष्परिणामाचं आश्वथ यांनी 'बरदसिरी' मध्ये कलात्मकरित्या प्रतिपादन केले आहे. आणि 'हंबल' मध्ये आदर्शाच्या मार्गातल्या अडचणी सुंदर प्रकारे व्यक्त केल्या आहेत.

अलीकडचे काही कादंबरीकार म्हणजे - 'भग्नमंदिर' चे लेखक हेमंत, 'हेमंतगान'चे गायक व्यासराय बल्साल, 'मुक्ती' चे लेखक शांतिनाथ देसाई, 'मुरूदारी गलु' (तीन रस्ते) चे लेखक यशवंत चित्ताल, 'गंगव्वा गंगामाई'चे रचनाकार शंकर मोकाशी आणि 'संस्कार'चे प्रणेते यू. आर. अनंतमूर्ती. ह्या लेखकांच्या साहित्यकृतीचं मूल्यमापन आताच करता येणं शक्य नाही.

सारांश असा की कन्नड कादंबरी-साहित्याचे दालन भरपूर समृध्द आहे. भारतातील

इतर कुठल्याही भाषेच्या कादंबरी-साहित्याच्या तुलेत ते कोणत्याही प्रकारे उणे नाही असं म्हटलं तर ते चुकीचे ठरू नये.

'निसर्ग'-ही मिर्जि अण्णाराया यांची पहिलीच कादंबरी असूनही ती त्यांची सर्वश्रेष्ठ कादंबरी आहे. बेळगाव जिल्ह्याच्या उत्तर भागातील एका गावाचे आणि त्यातील जैनसमाजाचे चित्रण ह्या कादंबरीत प्रथमच झाले आहे. संपूर्ण चित्र वास्तवतापूर्ण आणि सहज स्वाभाविक असं उतरलंय यांचं कारण म्हणजे त्यांची प्रादेशिक भाषाशैली. दैनंदिन जीवनातल्या भाषेच्या उपयोगानं त्यांनी एका छोट्याशा परिघात एक विशिष्ट जग निर्माण केलंय. ह्या जगात व्यक्त होणारं सत्य असं की, समाजानं लादलेली कृत्रिम बंधनं आणि माणसाच्या निसर्ग सुलभ भाव भावना, प्रवृत्ती यांच्या संघर्षात निसर्गाचा विजय होतो. ह्या कादंबरीत कित्येक जागी सूचकतेनं - सांकेतिक रूपानं आणि काही जागी स्पष्टपणे ही गोष्ट सांगितली गेली आहे. प्रबळ नैसर्गिक प्रवृत्तीच्या आहारी जाऊन अनंत आणि तारा यांच्यात घडून आलेला विवाहधर्मास मान्य नसलेला (विवाहपूर्व) समागम हे यांचे एक उदाहरण आहे. ते जितके सूचकतेनं व्यक्त झाले आहे तितकेच लेखकानं शेवटी स्पष्टपणे खालील शब्दात व्यक्त केले आहे.

'निसर्गाचं चक्र आपल्या नियमानुसार पुढे चालूच राहते.'

ह्या प्रादेशिंक कादंबरीचा कथा-प्रवाह अडतो, खंडित होतो, तो त्या प्रदेशाचे रीती-रिवाज, सण सोहळे, जीवनाचा विकास आणि उद्देश यांच्या विस्तृत चित्रणाने. ह्या परिघात अडकून दुःख भोगत राहणारे अनंत आणि तारा ह्या कथेच्या केंद्रस्थानी आहेत. ह्या दोघांमधील सहज प्रेरणा आणि प्रगाढ प्रेम समाजाच्या समष्टीगत आणि व्यष्टीगत दुर्गुणांवर आदळून उध्वस्त होते. ह्या कादंबरीची मुख्य गोष्ट ही की त्यांची बाळपणची मैत्री मृत्यूत परिणत होते. काम ही जीवनाची मूलभूत शक्ती - तिच्या विरूध्द कोणत्याही प्रकारचा अन्याय केला असता विनाश हा ठरलेला - ह्या गोष्टीचा ही कादंबरी एक पुरावा होय. ह्या कादंबरीचा नायक कोणी आदर्शवादी वगैरे नाहीये - तो तर बिचारा प्रेम वैफल्यानं ग्रासल्यामुळे जीवनात विकृतपणे भरकटत गेलेला एक माणूस आहे.

अण्णाराया यांच्या अन्य कादंबऱ्यातही ग्रामीण जीवनाचे चित्र आणि वातावरण पाहावयास मिळते. परंतु त्यात राजनैतिक आणि सामाजिक समस्याही मुख्यत्वेकरून रंगविलेल्या असतात. 'राष्ट्रपुरूष', 'प्रतिसरकार', 'अशोकचक्र', 'भस्मासूर', 'रामाण्णमास्तर' ह्या त्यांच्या कादंबऱ्यातील एकही कादंबरी 'निसर्ग'च्या तोडीची नाही. यातील कुठलीच कादंबरी निसर्गची पातळी गाठू शकणार नाही.

**सी. डी. गोविंदराव**

# 1

उन्हाळ्याचे दिवस होते, चैत्र महिना जवळ जवळ संपत आला होता. सायंकाळ व्हायला आली होती म्हणून ऊन्हं उतरणीला लागल्यासारखी झाली, पण उकाड्याला अंत नव्हता. एक सारखा घाम घाम होत होता.

अशा या तिन्ही सांजेच्या वेळेला मगदुमच्या घराच्या अंगणात काही मुलं खेळत होती. खेळ जोरात होता. लहान मुलं फेर धरून उभी होती. त्यात तारक्का मुलांना त्यांच्या उंचीनुसार नीट जागेवर उभी करण्यात गढली होती. फेराबाहेर तिची मैत्रीण सुमती खेळ पुढे चालू करायची वाट पाहात उभी होती.

तारक्काचं काम आटोपलं तसं ती मुलांना उद्देशून म्हणाली, 'सारेजण हात पुढे करा पाहू. चला खेळ सुरू करू या.' दोघींनी एकमेकींचे हात हातात घेतले. त्यातली एक वर्तुळात आणि दुसरी वर्तुळाबाहेर उभी राहून गायला लागली.

'कबुतर उडालं, घात झाला. मांजराला दूध नाही-कुत्र्याला भाकर नाही-कबूतर उडालं! कबूतर उडालं!!' आणि हे पालूपद पुन: पुन्हा आळवीत फिरत राहिली. मधून मधून कोणा न कोणातरी मुलाच्या डोक्यावर हात ठेवून गायची. 'मोत्यासारखी आई देईन बस, सोन्यासारखी नवरी देईन बस; गाईसारखी बहीण देईन बस.'

अशा प्रकारे नाना प्रकारच्या गोष्टी देण्याचं अभिवचन देत देत ती एक एका मुलाला बसवत गेली.

लग्नाचा सारा गडबड गोंधळ कालच आटोपला होता. बहुतांश मांडव उतरवला गेला होता; तरी देखील लग्नघरात लहान मोठ्या कामांना तोटा नव्हता.मगदुमांचे मल्ल आळीतल्या लोकांकडून लग्नापुरते वापरायला आणलेले सामान ज्याचे त्याला परत करण्यात आज देखील गुंतलेले होते. ही सारी मंडळी आज मल्लच्याच घरी जेवायला होती. आत रात्रीच्या जेवणाची तयारी चालू होती. मांडवाच्या एका कोपऱ्यात पडलेल्या औरसचौरस लाकडी बैठकीवर पाच सहाजण जेवायचं बोलावणं कधी येतंय याची वाट पाहात बसले होते. बसल्या बसल्या ते आपआपसात झाल्या लग्नाबाबतच टीका टिप्पणी करीत होते.

एक म्हणाला, 'काहीही असो, तारक्का सुस्थळी पडली, खूप आहे येवढं हे.'

दुसरा म्हणत होता, 'नवरा मुलगा मुलीला शोभेसा नाहीए. वरातीच्या वेळी मुलाला

घोडीवर बसविताना त्याच्या पाठीला जाडसर गादी बांधत होते. हेतू असा की, मुलगा अंगापिंडानं जरा मोठा-भरलेला दिसावा !'

'तारक्काची हुशारी पाहिलीत ? एवढ्यातच सारं उमजलीय. पोरीनं घोड्यावर बसल्यापासून तो थेट घरी परतेपर्यंत तोंड वर करून काही पाह्यलं नाही. गुणी आईची मुलगी आहे, अखेर.' अशा प्रकारे एका वृध्दानं तारक्काची समजूतदारपणाची प्रशंसा केली.

'अरे ! सारे जवळच्या रक्ताचेच तर नातेसंबंध आहेत. मल्लनं मुलगी दिली आणि बहिणीचं घर आपलसं केलं-हेच तर घडलंय.'

'ते तर पहिल्यापासूनच आपुलकीतलं होतं. धाकट्या बहिणीचं घर का कुठं कोणाला परकं असतं ?

'जाऊ दे न भाऊ. हं, आता त्याना तसं हवंच असतं तर, परक्यातल्या कोणीही चारशे वरदक्षिणा देऊन आणि वर पुन्हा मिनतवाऱ्या करून आपली मुलगी या मुलाला दिली असती...'

'यांनी कुठं काय कशात कमी केलंय ? रोकड रक्कम नसेल दिली एक; पण जावयाला सोनं तर दिलंय, एकूण एकच. पोरीच्या लग्नाचा खर्च मल्लच्या ऐपतीबाहेर झालाय. उगाच कोणाच्या बाबतीत असं फुकाचं बोलणं बरं नव्हे.' एका तरूणानं मल्लची बाजू घेत म्हटलं.'

'माझ्या म्हणण्याचा अर्थ असा नव्हता. खर्चाची काय बाबत - प्रत्येक जणच तो करीत असतो आणि मुलीच्या लग्नाकारणी तर तो करावाच लागतो. पण मुलीच्या आईचं मन तिथं मुलगी द्यायला मुळीच राजी नव्हतं. 'माझी एकुलती एक मुलगी आहे. तुम्ही आपल्या बहिणीच्या लोभात गुंतून मागचा पुढचा काही एक विचार न करता तिच्या घरी ती द्यायला निघालात. उद्या त्या घरी मुलीला सुख लागलं नाही तर पाहा ! एकाच गावात शेजारी पाजारीच तर ती रहाणार आहे. रोज सकाळी उठल्या उठल्या मुलगी दुर्मुखलेली दिसली तर ते माझ्याच्यानं मुळीच सहन होणार नाही. मुलीच्या हातनं काही सांडलं लवंडलं, नासलं बिसलं तर ते सांभाळून घेणारी बाई असायला हवी. तशी चिमव्वा फाटक्या तोंडाची बाई आहे; केवळ तुमची बहीण आहे म्हणून आजवर कधी हे उघड बोलून दाखवलं नाही इतकंच-' हे सारं रत्नानं आपल्या नवऱ्याला स्पष्टपणे सांगितलं होतं. मल्लनं तिचं बोलणं मुळीच कानी घेतलं नाही. सरळ आपल्या मनाप्रमाणं हवं ते करून टाकलं.

ही गोष्ट तिथं उपस्थित असलेल्यापैकी काहीना बहुदा आवडली नसावी. त्यांनी आपलं लक्ष मुलांच्या खेळावर केंद्रित केलं. एक मुलगा म्हणत होता: 'मोत्यासारखी बायको देईन...' तेवढ्यात त्याचं लक्ष वडिलधाऱ्या मंडळीकडे गेलं. ते सारे त्याच्याचकडे पाहात होते. ते ध्यानी येताच तो लाजला आणि गोंधळून खाली बसला, तसं सारे

लोक खो खो करून हसायला लागले. इतर मुलंही त्या हास्यात सामील झाली. मुलानं लाजून खाली मान घातली. खेळ पुढे सुरू झाला. तारक्का आणि सुमतीनं गाण्याचं पालुपद आळवीत आणखी एक दोन फेऱ्या मारल्या अन् मग त्यानी आणखी एका मुलाच्या डोक्यावर हात ठेवला.

तेव्हा एक घटना घडली. तारक्काच्या विवाहासाठी आलेल्या नातेवाईक मंडळीत अनंत नावाचा एक आठ वर्षांचा मुलगाही होता. तो तारक्काच्या सख्ख्या मामाचा एकुलता एक मुलगा. त्यानं एक सुंदर जरीची टोपी घातली होती. तिला तो भारी जपत असे. गावातल्या मुलाबाळांनाच नव्हे तर मोठमोठ्या बायकांनाही त्याच्या या टोपीचं खूपच आकर्षण होतं. त्याच्या टोपीनं जणू सर्वांचंच लक्ष वेधून घेतल्यासारखं केलं होतं. लग्नाला आलेल्या साऱ्या बायकांच्या तोंडी आपलं 'टोपी काय सुरेख आहे!' ही एकच गोष्ट. साहजिकच 'आमच्या अनंताकडे काय सुरेख टोपी आहे!' याचा तारक्कालाही भलताच अभिमान वाटायला लागला होता.

सुमतीनं अनंताच्या डोक्यावर हात ठेवताच तारक्का सतापून, 'बस् हो बाजूला. सोड माझा हात. तू आमच्या अनंताची टोपी पार मोडून टाकलीस, असं म्हणत सुमतीच्या हातातून आपला हात सोडवून घेत त्या टोपीचा चेमटून मुडपलेला भाग ठाकठीक करायला लागली

तसं सुमती म्हणाली, 'इतकीशी कुठं मुडपली टोपी, तर काय मोठं बिघडलं ग!'

'वा ग वा - माझ्या मामांनी लग्नासाठी येताना चांगले दहा रूपये मोजून विकत आणली होती - तुला काय माहीत?'

अनंत तारक्काच्या हातातल्या आपल्या टोपीकडे एकटक पहातच होता. त्याचं तोंड पार उतरलं होतं, डोळ्याच्या कडा पाणावल्यासारख्या झाल्या होत्या. तारक्कानं त्याच्याकडे पाहिलं मात्र तो मुळूमुळू करून रडायला लागला.

'जाऊ दे रे - ये माझ्यापाशी असा. भाऊ ना तू माझा?' असं म्हणत, त्याला जरा बरं वाटावं, त्याचं सांत्वन करावं यासाठी त्याला उचलून कडेवर घेत तारक्का नाचायला लागली - 'माझा सोन्या...लाडका राजा बेटा' असं काहीबाही लाडं लाडं गुणगुणत ती त्याचे डोळे पुसू लागली.

खेळ तिथंच थांबला. मुलांनी धरलेला फेर मोडला - विस्कटला. सुमतीमुळं आपला खेळ उगाचच असा मध्ये मोडला म्हणून काही मुलांना मनातून तिचा भारी राग आला. काही जण 'खेळ गेला खड्ड्यात...' असं बडबडायला लागले. सुमतीचा सारा उत्साह मावळला. थिजल्या उदास मनानं ती, मंडळी जिथं लाकडी बैठकीवर गप्पा टप्पा करीत बसली होती तिकडे जायला वळली.

'एवढ्या मोठ्या पोराला उचलून कडेवर घेतलेस - दोघंही धडपडाल ना!' म्हणत

अनंताच्या आईनं सुंदराबाईनं आतून धमकावलं.

तेवढ्यात एका कोपऱ्यातून तिथं येऊन थडकलेली रत्नाबाई म्हणाली, 'उतरव नं त्याला खाली बेटा. आला तसाच सुखानं त्याला आपल्या घरी परत जाऊ दे. पडून धडपडून त्याच्या सुंदर चेहऱ्याला खोकबिक पडली म्हणजे ग?' मग पुन्हा आत जात हसत हसत म्हणाली, 'बघ सुंदरा - तारक्काचं अनंतावर केवढं प्रेम आहे. इथं कधी कोणा मुलाला ती उचलून कडेवर घ्यायला लागली आणि मूल तिच्या हातून खाली पडेल बिडेल या भयानं तिला तसं कोणी करू दिलं नाही, तर ती लगेच चिडून म्हणते 'तुम्ही तुमच्या मुलाशी मला खेळू दिलं नाही तर काय मोठं बिघडणारं माझं - ऐनापुरात आमचाही एक मुलगा आहे - माझ्या सख्ख्या मामांचा मुलगा - मी त्याला मांडीवर घेऊन खेळवीन.'

तेवढ्यात बैठकीवर बसलेला एक वृध्द म्हणाला, 'रत्ना! तुझ्या मुलीनं त्या मुलाला उचलून कडेवर घेतलंय - पण त्याच्यासकट ती खाली आपटणार आहे बघ - तिला स्वतःची तरी काही शुद्ध आहे का!' मग तारक्काकडे वळून म्हणाला, 'बघा कशी नाचत्येय ती... आणि त्याच्याकडेही पाहा ना जरा, एवढा मोठा घोडा वाढलाय पण बघा कसा तिच्या कडेवर चढून बसलाय तो! चल उतर खाली'. असं म्हणून त्याने त्याला दम भरला.

तारक्कानं मुलाला कडेवरून खाली उतरवलं. दोघंही बैठकीकडे गेले तेव्हां तिथं बसलेल्यांपैकी एक जण म्हणाला -

'अशा तऱ्हेचा धांगडधिंगा करीत राहिलीस तर उद्या तो भरमा गप्प बसेल होय?...चल घे नाचून काय नाचयबिचायचं असेल ते आताच. चार दिवसाची तर गोष्ट. उद्या सासरी नवऱ्याकडे धाडतील तेव्हा करून पाहा धांगडधिंगा'.

'का? काय करील तो.... अजून तर बाळी आहे ती. तिला एक मूल होईपर्यंत आम्हाला ती लहानबाळीच वाटत रहाणार', सुंदराबाईनं उत्तर दिलं.

'आणि ते तरी काय फार मोठं दूर आहे. सारा दोन वर्षांचाच काय तो प्रश्न. आता पासून सोनं गोळा करून ठेव, रत्ना'. थोड्या अधिकारवाणीच्या स्वरात भीमप्पा म्हणाला.

'सोनं आणि ते कशासाठी बाई?' सुंदराबाईनं प्रश्न केला.

'तारक्काच्या ऋतुशांतीच्या प्रसंगी जावयाला देण्यासाठी, पाच तोळ्याची पोंची * हातात पडल्या वाचून काही भरमा चौरंगावरनं हलणार नाही. एवढं लक्षात ठेव. आपलं माणूस म्हणून गरीब समजून चालू नकोस'.

'बापरे! भीमप्पाही चौगुलेच्याच बाजूचा आहे? काही का असे ना, तू त्याच्या बाजूनंच बोलणार, आमचं घर भिकेला लावलंय, तुम्ही साऱ्यांनी मिळून तर हे असं

**पोंची:** पुरूषानं मनगटात घालायचा एक सोन्याचा अलंकार.

केलंयत ! बसल्या बसल्या जीभ सैल सोडून बोलायला कोणाचं काय जातय ?' तिच्या मनात येऊन गेलं अन मग एकदम 'ऋतुशांतीची वेळ येऊ दे, जे आम्हाला द्यायचं ते आम्ही देऊ. तुम्ही लोकांनी सांगायची काय जरूर आहे ? अधल्यामधल्यांना उगाच कशाला त्याचा घोर हो ?' काहीशा थट्टेनं, काहीसं घुश्श्यात रत्नव्वा त्याला मध्येच आडवीत म्हणाली.

'अग जाऊ दे ग रत्नव्वा, उगाच कशाला रागावतेस त्यांच्यावर? ये तारा, नवऱ्याचं नाव काय तुझ्या, ते तर सांग. त्या लग्नाच्या गोंधळात नीट ऐकायला नाही आलं आम्हाला'. असं म्हणत एका वृध्दानं तिचा हात धरून आपल्याकडे ओढून घेतलं.

'हो, मी देखील ऐकलं नाही बरं का' असं म्हणत एका तरूणानं त्या वृध्दाच्या म्हणण्याला दुजोरा दिला.

'आता तिच्या मागे कशाला लागलायत आणखी ? चला उठा, जेवायला चला. सारा स्वयंपाक कधीचा निवून चाललाय' असं म्हणत रत्नव्वानं साऱ्यांना जेवायला बोलावलं.

बैठकीवरून एक एक करून सगळे जण उठले आणि हातपाय धुवून आत गेले. त्या रिकाम्या झालेल्या बैठकीवर मुलं येऊन बसायला लागली. पाचसहा मुलं येऊन बसताच बैठक गच्च भरली. अनंत अद्याप तसाच खालीच उभा होता. त्याला बसायला आता तिथं जागाच उरलेली नव्हती. एक दोघा मुलांना बाजूला ढकलत 'हां जरा तिकडे सरकून बसा. आमच्या अनंताला जागा करून द्या कशी बसायला' तारक्का जरा नाराजीच्या स्वरात म्हणाली.

'बस राहून दे ना. बैठक तुमची आहे म्हणून एवढं काही आखडायला नको' तोंड वाकडं करीत सुमती तारक्काला म्हणाली आणि नंतर इतर मुलांकडे वळून म्हणाली, 'चला ही जर एवढी फणकाऱ्यानं वागतेय, रागराग करत्येय तर कशाला आम्ही इथं रहायचं ? गौडाचं अंगण खूप मोठं आहे. तिथं जाऊन खेळूया आपण.'

तेवढ्यात आतनं अनंतच्या आईनं - सुंदराबाईनं हाक मारीत म्हटलं, 'तारा जेवायला ये पोरी, अनंतालाही बरोबर घेऊन ये. साऱ्या मुलांनी जेवून घेतलं तर आमचंही काम उरकल्यासारखं होईल.'

लग्नासाठी आलेल्या नातेवाईकांची चार पाच मुलं, तारक्का, अनंत वगैरे जेवायसाठी आत गेले.

'चला, आपणही आपआपल्या घरी जाऊया.' असं म्हणत सुमती जायला निघाली. इतर मुलंही तिच्या पाठोपाठ चालू लागली. जाता जाता त्यांच्यामध्ये नाना प्रकारच्या गोष्टी झाल्या.

एक म्हणाली, 'सुमी बिचारी सरळ साधी आहे.'

आणखी एक छोटा मुलगा म्हणाला, 'घर त्यांचं होतं म्हणून तिनं त्यांना सोडून दिलं.'

'बाई गं ! त्या टोपीला जरा कुठे नुसता हात लागला, तर केवढा राग आला तिला !' आणखी एक मुलगी तारक्काच्या वागण्यावर टीका करीत म्हणाली.

'मुलगा एवढा मोठा वाढलाय तरीही ही आपली त्याला कडेवर घेऊन मिरवत्येच आहे. आणखी चार दिवस जाऊ देत - मग तिनं त्याला असं कडेवर घेतलं तर समजेल चांगलं !' सुमती हात ओवाळीत तारक्काला दूषणं लावीत म्हणाली.

'आणखी किती दिवस अशी त्याला कडेवर घेऊन मिरवील ? जाऊ दे ना. येत्या बुधवारी तर सासरची माणसं तिला घेऊन जायला येणार आहेत.'

'सासरी गेल्यावर समजेल तिला चांगलं. चिम्मव्वासारख्या सासूला खूष राखणं काही खायचं काम नव्हे !' हात नाचवीत एक मोठी मुलगी म्हणाली.

'एवढ्या लांबची गोष्ट कशाला - आज रात्रीच काय ते समजेल की. कानातले डूल हरवलेत तिनं. मी तेव्हाच सांगणार होते तिच्या घरच्यांना... पण उगाच भांडण नको म्हणून भिऊन गप्प बसते झालं.' आपण किती चांगली सरळ साधी मुलगी आहोत हे दर्शविण्याचा प्रयत्न करीत सुमती म्हणाली.

तेवढ्यात समोरून भरमण्णाच आला. साऱ्या मुलांनी खट्याळपणे हसत त्याला चहू बाजूंनी घेरलं.

'ताराला न्यायला कधी येणार ?' घोळक्यातल्या एका मुलीनं विचारलं.

'का ?'

'उगाचच भांडत असते ती आमच्याबरोबर. .! तिला मोकळं नाही सोडायचं' .

'तुम्हा लोकांची भांडाभांडी झालेली दिसत्येय' - असं म्हणत हसत हसत भरमण्णा पुढे निघून गेला.

मुलांनी त्याची वाट सोडली. त्यांना भरमण्णाचं बोलणं रूचलं नाही. भरमण्णाच्या वडलांचं नाव हूवण्णा चौगुले होतं. चौगुले दुसऱ्या आळीत रहात. मगदुम प्रथमपासुनच त्यांचे आप्तसंबंधी होते. ते लोक जरा गरीब होते, परंतु खायप्यायला पुरेशी जमीन त्यांच्यापाशी होती. झालंच तर घरदारही होतं. चौगुले श्रीमंत होते. आठदहा नांगराची शेती त्यांच्याकडे होती. गावात एक दोन घरंही होती. गावात त्यांना एवढी मान - प्रतिष्ठा होती की, गावात एखाद्याच्या लग्नकार्याला ते उपस्थित राहू शकले नाही तरी गाववाले त्यांच्या घरी फराळाआराळाच्या मिठाईचं ताट आणि पानसुपारी वगैरे सन्मानानं पोहचती करीत.

रात्री झोपायच्या वेळी अंगणात घातलेल्या एका अंथरूणावर आठ दहा पोरं पसरली होती. तारक्काच्या जवळ अनंत लवंडला होता. सारी मुलं आपआपसात गप्पा गोष्टी

करीत होती. अद्याप त्यांना तशी झोप वगैरे काही आलेली नव्हती. नाना प्रकारच्या गप्पात ही मुलं रंगली होती. अनंत आपली शाळा आणि आपलं गाव या विषयी मोठ्या गंभीरपणे पण उत्साहभरानं तारक्काला काही काही सांगत होता. तारक्कालो त्याच्या त्या सांगण्यात काही एक रस नव्हता. अनंताच्या पलीकडे पहुडलेल्या आपल्यापेक्षा वयानं मोठ्या असलेल्या मुलीकडनं सासर विषयीचे अनुभव जाणून घेण्यास ती उत्सुक होती. जन्मल्यापासून आजवर ती गाव सोडून कुठेही बाहेर गेली नव्हती. याच घरात ती लहानाची मोठी झाली होती. हे घर सोडून दुसऱ्या नव्या घरी जायची गोष्ट तिला गूढ - रहस्यमय अशी वाटत होती. त्या संबंधी जाणून घेण्याची तिच्या मनाला भारी आस लागून राहिली होती. म्हणून अनंताचं बोलणं मध्येच थोपवीत ती त्याला म्हणाली, 'अनंत, जरा तिकडे जाऊन झोप ना म्हणजे मला अक्काशी थोडं बोलता येईल.'

आपलं बोलणं मध्येच तोडलं याचा अनंताला राग आला. तो चिडून म्हणाला, 'मी नाही जा -हवं तर तूच जाऊन झोप तिकडे.'

'अनंत शंहाणा ना तू? थोडंसं सरकून घें त्या बाजूला. आमचं बोलणं आटोपलं की पुन्हा येऊन झोप माझ्या जवळ, माझं ऐकणार की नाही तू ?'

'ऊं ... हूं तू माझं बोलणं का नाही ऐकत ?' दृष्टी वळवून अनंतने विचारलं.'

तारक्कानं त्याला नाना प्रकारे समजावून सांगायचा प्रयत्न केला. अगदी दाताच्या कण्या करून त्याच्या मिनतवाऱ्या केल्या, पण अनंत जागचा हलायला ढिम्म तयार होईना. अखेर हार पत्करून स्वतःच तिकडं जावं या विचारानं ती उठून बसली. अनंतानं काही तिला जाऊ दिलं नाही. त्यानं तिचा पदर धरून ओढला, हात धरून ठेवला - पण तिनं त्याचं काही एक ऐकलं नाही, आपला हात सोडवून घेत ती तिथून निघून गेली. अनंत फिरून चिडला. त्यानं निश्चय केला की, या दोघींना एकमेकींशी बोलू म्हणून द्यायचं नाही. तो आपल्या क्रमिक पुस्तकातल्या कविता मोठमोठ्यानं म्हणायला लागला. तारक्काच्या जवळ जाऊन तिच्या बोलण्यात अडथळे आणण्याचाही त्यानं खूप प्रयत्न केला. त्याचा तो दंगा ऐकून आतून त्याची आई ओरडली, 'गपचूप झोप कसा, अनंता.' पण अनंत मुळीच गप्प बसला नाही. तेव्हा मात्र तारक्काला ते सारं असह्य होऊन तिनं त्याला 'चल हट निघ इथनं - हो बाजूला' असं म्हणत ढकललं. तिच्या बोलण्यात एक प्रकारचा कडवा तिखटपणा होता.

'मी नाही जाणार...'

'कां ?'

'माझी मर्जी... तू कोण विचारणार मला ?'

तारक्का रागारागानं त्याची बाही पकडून त्याला खेचून घेऊन गेली आणि धक्का देत म्हणाली, 'जरा थोडं बोलून घ्यावसं मनात होतं तर हे भूत मध्ये अडमडले.

शहाणा - शहाणा म्हणता फारच थेर करायला लागलाय - माहीत नाही कुठून शिकून आलाय हे सारं!'

अनंतनं यावर ब्रही तोंडातून काढला नाही. रागानं मारे गाल फुगवून अंथरूणावर गुपचूप बसून राहिला. 'इथंच बैस'. तारक्का म्हणाली.

'काय वाट्टेल ते करा पण मी तुम्हाला मुळीच बोलू देणार नाही.' अशा निर्धारयुक्त स्वरात अनंत कडाडला.

'काय वाट्टेल ते कर' - असं म्हणत बसून राहिला. तो मनोमन रागानं आतल्या आत खदखदत होता. तो वयानं लहान होता खरं परंतु त्याच्या जिद्दीपणाला सीमा नव्हती. मोठा हट्टी होता तो. तिथंच जवळ जमिनीवर लोळण घेत त्यानं जोर जोरानं रडायगायला सुरूवात केली.

'काय झालं अनंत, ये आत ये - ' रत्नाबाईनं त्याला आतून हाक मारली. अनंताला वाटलं की आपल्या रडण्याचा योग्य तो परिणाम घडून येतोय तर! तसं त्यानं आणखीनच मोठ्यानं गळा काढला. रत्नव्वा बाहेर आली आणि त्याला उचलून कडेवर घेत विचारायला लागली - 'काय झालं अनंत, कां रडतोस असा?'

'स्फुंदत स्फुंदत तो म्हणाला, 'तारीनं मारलं.'

खोटं खोटं रागवल्या सारखं करीत रत्नव्वा म्हणाली, 'काय म्हणून मारील ती माझ्या बाळाला, फार आखडलीय होय? कसली एवढी घमेंड आलीय हिला!'

तेवढ्यानं जरा खूष होत त्यानं आपलं रडं अंमळ थांबवलं आणि म्हणाला, 'तिनं आपल्या कानातला डूल हरवून टाकलाय, मी तुम्हाला हे सांगेन म्हणालो, म्हणून मारलं.'

'अस्सं, डूल हरवलाय?' म्हणत रत्नव्वानं मग तारक्काकडे वळून विचारलं, 'खरं आहे हे? कुठं हरवलायस?' तारक्का त्यावर काही बोलली नाही. अश्रू दाटल्या डोळ्यांनी गुपचूप पडून राहिली. 'कालच तर बनवून आणले होते हे... हे धरून आतापर्यंत तीन जोड हरवलेस - सारखं सारखं हरविणं चाललंय, तुला स्वत:ची काही शुद्ध वगैरे आहे की नाही? तशी ही छोटी वस्तू आहे. हरविली तर पुन्हा बनवून घेता येते - पण पुन्हा पुन्हा असं हरवित गेलीस तर मग सारखं कुठून बनवून आणायचं ते? एवढी मोठी झालीयस, तरी अजून अक्कल नाही आली? कुठं हरविलंयस - ते तर सांगायचं होतंस, शोधून नसतं का पाहता आलं?

अनंतानं रत्नव्वाच्या बोलण्याला दुजोरा देत म्हटलं, 'जिथं म्हशी बांधतात ना, तिथं. मी जसं म्हणालो की, सांगतो आता हे तसं मारायला धावून आली अंगावर.'

'नालायक कुठची...' असं म्हणत हात उगारून ती तारक्काला मारण्यासाठी तिच्या दिशेनं झेपावली; तशी आतून सुंदराबाई धावत तिथं आली. आणि, 'बस् फार झालं. कां अशी दाटत्येयस तिला? घरात चार घरची चार पोरं आलीयत... वस्तू कोणाकडून

नाही हरवत!.. तुला वेडबिड लागलंय की काय?, असं म्हणत तिनं रत्नाव्वाला शांत करीत तिची समजूत काढली.

'हा काय पोरखेळ आहे होय? मोठी झालीय...लग्न झालंय उद्या नवऱ्याच्या घरी जाणार ती. अजूनही खेळच! थोडी तरी समज असायला हवी हिला. स्वयंपाक पाणी करायला शिकायला हवं - स्वयंपाकघरात रहायला हवं - ते सारं सोडून रात्रंदिवस पोरांबरोबर हिचा आपला हुतूतू...हमामा चाललेला. आज एक हरवला, उद्या दुसरा हरविल. असंच सारखं सारखं हरवित राहिली, तर हिला काय वाटतं की बनवून देणारे कोणी लखपती कुबेराचे बाप लागून राहिलेत हो!'

'पुरे आता. राहू दे ना - मुलांच्या हातून काही झालं तरी वस्तू या अशा हरविणारच - त्याला कोणी झालं तरी काय करणार? तू तिला एवढं हे सारं सांगून राहिलीयस - एक छोटासा डूल हरविला तर तू हे एवढं आकांड तांडव करत्येस! गेल्या वर्षी आमच्या अनंताच्या लग्नात गौडाच्या घरून अंगठी मागून आणून आम्ही त्याला घालायला दिली. एका रात्रीपुरताच काय तो प्रश्न होता. दहावीस लग्नसोहळ्यात वापरायसाठी म्हणून काही मागून आणली नव्हती ती. रातोरात मुलाचं लग्न करायचं ठरलं. अशावेळी अंगठी कुठे घडवून मिळणार म्हणून आणून ती त्याला घातली अन तीही त्यानं हरवून टाकली. रात्रीची वेळ होती. या अजाण पोराच्या हातून कल्पना नाही कुठं गळून पडली ती. गॅसची बत्ती घेऊन सकाळ उजाडेपर्यंत रात्रभर आम्ही इथं तिथं ती शोधत राहिलो, पण अंगठी सापडायचं नाव नाही. शेवटी त्यांना नवी अंगठी बनवून देणं भाग पडलं. आता हे असं घडतं त्याला कोणाचा झाला तरी काय इलाज असतो. कोणी झालं तरी काय करणार?' सुंदराबाईनं सांगितलं.

'बरोबर आहे, बोलून चालून लहान पोर ते. त्याच्या हातून काही सांडलं हरवलं तर समजू शकते मी पण ही तर काही लहान नव्हे. चांगली मोठी झालीय. एक एक महत्वाची मुद्याची गोष्ट सांगते. ही ही सोनं हरवायला लागली, अशी डूल हरवायला लागली, तर कोण नाही मुस्काटात भडकावून देणार तिच्या?' रत्ना कठोरपणानं म्हणाली.

तारक्का तिथंच तशी अंथरूणावर पडल्या पडल्या स्फुंदून स्फुंदून रडत होती. या दु:खाहूनही तिच्या मनात अधिक तीव्रतेनं जर काही दाटून आलेलं असेल तर तो अनंता विषयी वाटणारा राग संताप!

## 2

दुसऱ्या दिवशी सकाळी बऱ्याच उशीरापर्यंत तारक्कानं अंथरूण सोडलं नाही. तोंडावर चादर ओढून घेऊन ती तशीच झोपून राहिली. तिच्या आईनं तिला एक दोन वेळा जागं करायचा प्रयत्न केला देखील पण ती काही उठली नाही. सुंदराबाई म्हणाली, 'तिच्या मर्जीस येईल तेव्हा तिला उठू दे.' सारी माणसं आपआपल्या कामाला लागली. दिवस आणखी थोडा वर चढल्यावर सुमतीनं येऊन तारक्काला हाक मारली.

'अजून अंथरूणातच पसरलीय', असं म्हणून रत्नव्वा गप्प झाली. नंतर थोड्यावेळानं दही घुसळणं थांबवीत ती म्हणाली 'अग हो सुमी, ताराचा डूल हरवला कसा ? तुम्ही पोरीही वस्तू अशाच हरवत असता का ?'

सुमती थोडावेळ तिथं तशीच गुपचूप उभी राहिली. ती उमजली की डुलावरून आईनं दाटलं असणार, शक्य तर तीही एक दोन गोष्टी तिखट मीठ लावून सांगून तिला आईची बोलणी खायला लावी. पण आज तिचं मन अशा कशाला तयार नव्हतं. तिथंच थोडा वेळ ती एखाद्या खांबासारखी उभी राहिली. मग सावकाश एक एक पाऊल उचला ती तारक्काच्या अंथरूणाशी गेली आणि तिनं तिच्या तोंडावरची चादर खसकन ओढून दूर केली. तारक्कानं डोकं हलवून नकार दिला.

सुमतीनं जरा मुद्दामच जोरानं तिला 'तारक्का!' करून हाक मारली. निरूपाय होऊन तारक्का उठून उभी राहिली. नंतर सुमतीनं दबल्या आवाजात तिला म्हटलं, 'मी गोळ्या आणि बांगड्यांचे तुकडे आणलेत. परसदारी घर करून खेळूया आपण. आज इंद्रीही येत्ये म्हणालीय. चल तूही चल.'

मागील दारी एक छोटसं कडूनिंबाचं झाड होतं. त्याच्या तळाचा केरकचरा झाडून काढून जागा साफ केली होती. तिथंच घर बनवायचं नक्की ठरलं. गल्लीतल्या आणखी चारपाच मुलीही आल्या होत्या.

तेवढ्यात अनंतही घरातनं आला. तारक्कानं रागानं डोळे वटारून एकवार त्याच्या कडे पाहिलं, नंतर दुसरीकडे तोंड वळवून बडबडली, 'आखडू कुठचा, काल कागाळी करून मला बोलणी बसविली, अन् आता आलाय इथं!' नंतर सुमतीला डोळ्यानं काहीतरी खुणावून जवळ बोलावलं आणि तिच्या कानात ती काहीतरी कुजबुजली.

अनंतनं विचारलं, 'अक्का, ए अक्का मी ही येऊ खेळायला ?'

तारक्कानं काही एक उत्तर दिलं नाही. सुमती म्हणाली, 'मुलींच्या खेळात तुझं काय काम आहे ?' तिच्या बोलण्याचा स्वर काहीसा कठोर होता.

'का ? मी का नको येऊ ?'...

'नाही आम्ही तुला नाही खेळायला घेणार.'

'तर तुम्ही मला खेळायला घेणार नाही ?' अनंतनं डोळे लाल करीत विचारलं.

'नाही.' तारक्का दृढतापूर्वक म्हणाली.

'मी तर खेळणारच....' असं म्हणत अनंत तिथं जाऊन फतकल मारून बसला.

'जा नीघ इथून...' सुमती कठोरपणे म्हणाली.

'नाही तुम्ही लोक जा... आमच्या परसदारातनं.'

सुमती गप्प बसली आणि तारक्काच्या तोंडाकडे पहायला लागली.

'कोणाचं परसदार आहे ? आमचं आहे.' तारक्का काहीशा अभिमानानं उद्‌गारली.

थोडा वेळ कोणीच काही बोललं नाही. बाजूच्या टेपाडातनं एक खार बाहेर आली आणि पळून गेली. वारा पडला होता. सारी झाडं झुडपं स्तब्ध होती. सूर्य हळूहळू वर चढत होता. ज्या घरात मुली खेळत होत्या त्या घराच्या कौलारातून धूर निघून हलके हलके नागमोडी वळणं घेत वर चढत होता.

'उठ इथनं.' तारक्का म्हणाली.

'मी इथंच बसणार. तुम्ही लोक हवं तर जा इथनं.' अनंत हट्टाला पेटून म्हणाला.

थोडा वेळ तारक्का गप्प बसली. नंतर विचार करून म्हणाली, 'सुमे, चल, त्या भिंतीच्या सावलीला घर बनवूया आपण.' असं म्हणत ती तिथनं निघून गेली.

'हो इथं एका बाजूला भिंतही आहे...घर छान बनवता येईल-' असं म्हणत सुमतीही खेळाचं सामान घेऊन तिथनं झट पसार झाली.

इतर मुलीही लाकडाचे तुकडे, डब्या, बांगड्यांचे तुकडे आणि भावल्या वगैरे गोळा करून घेऊन जायला लागल्या. त्या तिथं पोहचताच थोड्याच वेळात खेळ सुरू झाला.

अनंतानं एकवार पुन्हा मोठ्या गंभीरपणानं तिकडे पाहिलं. त्याचं मनही तिकडे ओढ घेत होतं, परंतु त्याला कल्पना होती की आपण तिथं गेलो तरी आपल्याला कोणी खेळायला म्हणून घेणार नाही. परंतु खेळल्यावाचून काही त्याच्याच्यानं रहावत नव्हतं. तो जागचा उठून उभा राहिला, त्याला कडाडून जांभई आली आणि त्यानं जांभई देत अंगाला आळोखे पिळोखे दिले. हळू हळू तो मुलींचा घोळका जिथं जमला होता तिथं गेला. त्या सर्वांना उद्देशून खोडसाळपणे तो म्हणाला-'मी इथं देखील आलोय...'

शांतपणे आणि मोठ्या गांभिर्यानं तारक्का म्हणाली-'तू इथं यायचं नाही...'

अनंत ते न ऐकल्यासारखं करीत त्यांच्यापाशी जाऊन ठेपला देखील. सुमतीनं चिडून म्हटलं-'पाहा हं ! अनंत, भांडण होईल.'

'होऊन जाऊ दे, काय होणारय !' सुमतीचा अपमान करीत अनंत म्हणाला.

सुमतीला राग आला. ती अनंताला थोपवायला गेली. अनंतानं तिच्या हाताला चिमटा काढला. तिनं संतापून त्याला धक्का दिला. त्यासरशी अनंताचं डोकं भिंतीवर आपटलं आणि माथ्याला थोडीशी जखमही झाली. रागानं अनंताच्या अंगचा भडका उडाला. डोळ्यात अश्रू दाटून आले होते. ओठ थरथरायला लागले.तोंड लालीलाल झाले. काही एक न बोलता तो उठला आणि हळूहळू घराकडे जायला निघाला. थोडं दूर जाताच त्यानं वळून मागे पाहिले आणि मग जोर जोरात रडत पुढं जाऊ लागला.

तारक्कानं त्याला 'अनंत! अनंत!!' करून जोरानं हाक मारली. अनंत ऐकलं न ऐकल्यासारखं करीत चालतच राहिला . तारक्कानं पुन्हा हाक मारली-' अनंत, ये रे ये खेळायला ये.' अनंतानं तिच्या बोलण्याला काहीही प्रतिसाद दिला नाही. तारक्का काहीशी घाबरली आणि सुमतीकडे वळून पाहात म्हणाली-'तू काही ना काही भांडण उभं करत्येस आणि घरी मला नस्ती बोलणी खावी लागतात.'

'मी काय केलं. तूच तर आधी म्हणाली होतीस की...'

'काय म्हणाले होते मी ? खेळायला बोलावू नकोस, हेच ना... असं ढकलून दे म्हणून थोडंच म्हटलं होतं-'

'पुरे पुरे तुझं तर नेहमीच हे असंच असतं. काल टोपी मुडपली-मोडली गेल्याचं निमित्त करून खेळात खो घातलास आणि आज....' सुमती म्हणाली.

तारक्का रडत म्हणाली-'जाऊ दे!' तिचं मनही कष्टी झालं होतं. अनंत रडत रडत घरी गेला.

रत्नव्वानं विचारलं- काय रे काय झालं ?'

'अक्कानं खेळायला घेतलं नाही मला.'

त्याचं रडणं यासाठी नव्हतं. तो उमजला की सुमतीनं आपल्याला ढकलून दिल्याचं सांगितलं, तर तारक्काला चांगला दम मिळेल. रत्नव्वानं त्याचं सांत्वन करीत म्हटलं-'ये तुला खायला देते. तू त्यांच्या मध्ये खेळायला जाऊ नकोस. त्यांना कोण काय करणार, वेड्या पोरी आहेत त्या.' असं म्हणत ती त्याला आत घेऊन गेली. एक पत्रावळ मांडून त्याला लाडू करंजी वगैरे वाढली. एवढंच नव्हे, तर त्याला बरं वाटावं, त्याचं समाधान व्हावं म्हणून पोटापेक्षा थोडं जास्तच वाढलं होतं तिनं त्याला. तेवढ्यात सुंदराबाई काही कामासाठी आत आली. तिनं ते सारं पाहिलं आणि म्हणाली-'येवढं कशाला वाढलंत त्याला ? तेवढं जाईल का त्याला... ? उगाच इकडं तिकडं टाकून फुकट घालवील झालं-'

'जाऊ दे - खाईल तो- सकाळपासून काही खाल्लेलं नाहीए त्यानं.' असं म्हणत रत्नव्वा बाहेर निघून गेली.

'हे सारं खाऊ नकोस बाळा, सारं तेलातलं आहे. माहीत नाही किती दिवसाचं शिळं आहे - आधीच तुला खोकला येतो-' म्हणत तिनं आपल्या पेटीचं कुलूप काढलं आणि घरून येताना बरोबर करून आणलेले तुपातले लाडू त्याला दिले.

अनंत थोडा वेळ तिथंच बसून राहिला - त्यानं थोडसं खाल्लं देखील - पण सुंदराबाईचं पाऊल तिथून बाहेर पडताच त्यानं पत्रावळ गुंडाळली आणि सदऱ्याच्या पुढच्या भागाची झोळी करीत त्यात टाकली अन् इकडे तिकडे पाहिलं, दरवाजाच्या आडून बाहेरच्या खोलीत कोणी आहे नाही याची सावधपणे चाहूल घेतली. घरात कोणीही नव्हतं - हळू हळू तो दरवाजाशी आली. बाहेर डोकावला - धावत धावत परसदारी गेला. 'हे पाहा काय काय खायला आणलंय ते.' सदऱ्याचा पुढा उघडा करीत त्यानं मोठ्या अभिमानानं पत्रावळीतले खाद्यपदार्थ साऱ्यांना दाखविले.

अनंताला पाहून तारक्काला भारी आनंद झाला. आतापर्यंत पोरी चार चार हेलपाटे घालून चुकल्या होत्या. पाच सहा मुलींनी आपलं खेळातलं घरही येव्हाना तयार केलं होतं.

तारक्काकडे पाहात सुमती म्हणाली - 'अनंतानं खायला आणलंय काय ? छान झालं हे - आता तर आपल्याला लग्न-लग्न खेळता येईल - होय की नाही, तारक्का ?'

तारक्का काहीही बोलली नाही. फक्त तिच्या चेहऱ्यावरील हावभावांवरून तिला हे मान्य असल्याचं व्यक्त होत होतं. इकडे अनंत एक करंजी मटकावण्यात मशगुल झाला होता. इतर मुलं म्हणाली, 'काल तारक्काचं लग्न झालंना, अगदी तस्संच लग्न-लग्न खेळू या आपण.'

सुमती म्हणाली - 'हो- अजूनही तारक्काचं अंग हळदीचंच आहे ना, तर तिनं व्हावं नवरी मुलगी.' नंतर अनंताकडे पाहात तिनं विचारलं - 'अनंत बोल तू-तू हो तारक्काचा नवरा.'

आता तारक्काच्यानं गप्प बसवेना - शरमून नकार व्यक्त करीत म्हणाली - 'जा अं, मला नकोय... मी नाही तयार - माझं लग्न झालं नाही वाटतं ? हा कसा काय माझा नवरा ! उगाच काय निरर्थक काही तरी !'

'लग्न झालं म्हणून काय झालं ? लुटुपुटीच्या खेळात तो तुझा नवरा बनला तर काय बिघडलं ? एवढ्यावरून काही कोणी तुम्हाला खरोखरीचे नवरा बायको मानणार नाहीत...'

'मला नकोय - हवं तर इंद्री आणि तो दोघं होऊं देत.'

'ते तेवढसं चांगलं नाही दिसणार -' मग अनंताकडे वळून हाक मारीत म्हणाली, 'ये अनंत !'

आता अनंत काहीसा आखडल्यासारखा झाला. त्याला वाटलं की आपण खायला

घेऊन आलोत येवढ्याचसाठी आपल्याला हे असं खेळायसाठी बोलावताहेत. म्हणून तो मग गुपचूप बसून राहिला. सुमती निराश होऊन खेळात गढली. इतर मुलीही खेळात रमल्या. अनंतानं मनाशी विचार केला. आता पुन्हा बोलावलं तर जायला हवं आपण. पण फिरून काही कोणी त्याला ये म्हणून हाक मारली नाही. त्याचं मन मात्र आतून खेळाकडे ओढ घेत होतं. अखेर न राहवून म्हणाला - 'खायला देतोय - या.' मुलींनी ते ऐकलं आणि त्याच्याकडे फक्त वळून काय ते पाहिलं. एक लहानगी तेवढी काही खाऊ खायला मिळेल या आशेनं त्याच्या जवळ गेली. अनंताचा मूळ हेतू काही सफल झाला नाही, तरीही त्यानं त्या छोट्या पोरीला आपल्या जवळ येऊन बसायला सांगितलं - तिला खायला देऊन विचारलं, 'मी तुला एक गोष्ट सांगू?'

मुलगी म्हणाली - 'हूं.'

अनंत तिला आपल्या शाळेत मास्तरांनी शिकविलेल्या गोष्टी एकएक करून सांगायला लागला. तो गोष्टी सांगायच्या कामात मोठा तरबेज होता. शाळेत चाचणी घेण्यासाठी कधी निरीक्षक आले की, त्याचे शिक्षक गोष्ट सांगायसाठी त्याला हमखास उभा करीत. मुळात त्याचं बोलणं वगैरे मोठं गोड असायचं. लोभस मुद्रेनं हसत हसत हावभाव करून जेव्हा तो एखादी गोष्ट रंगवून सांगायला लागायचा तेव्हा कशीही का व्यक्ती असेना अगदी मंत्रमुग्धाप्रमाणे त्याच्यावर लुब्ध होऊन जात असे - मोहित होत असे. गावातल्या मुलांना अशा गोष्टी ऐकायला भारी आवडायचं. त्याना अशा गोष्टी ऐकायची कधी संधीच मिळत नसे. अनंत कधी कधी मुलांना गोष्टी सांगायचा. गावची मुलं त्या अगदी मुग्ध होऊन ऐकत. माकडाची गोष्ट अनंत मोठे हावभाव करीत सांगायला लागला. खेळणाऱ्या मुलींचं चित्तही तिकडे आकर्षित होऊ लागलं. त्यानं एक गोष्ट सांगून संपविली आणि दुसरी गोष्ट सांगायला सुरूवात केली. एक एक करून साऱ्या मुली अनंताकडे गोष्ट ऐकायला यायला लागल्या. गोष्ट सांगणं निर्वेधपणे चालू राहिलं.

येवढ्यात रत्नव्वाकडनं जेवायचं बोलावणं आलं. ते उठले आणि आत गेले. इतर मुलीही आपआपल्या घराच्या दिशेनं चालू लागल्या. अनंतानं फराळाचं दिलेलं बाहेर नेलं म्हणून सकाळ धरून त्याची आई सुंदराबाई त्याच्यावर रागेजून होती. तिनं विचार केला, 'आत पाऊल तर टाकू दे - त्याची अक्कल बरोबर ठिकाणावर आणत्ये मी.' अनंत जेवायला येऊन कुठे बसतो न बसतो तोच ती म्हणाली, 'आत्याच्या घरी आल्यापासून एक एक नवी नवी थेरं करायला शिकायला लागलायस हो? गावी चल - मग तुला दाखवतेच कशी ते!' अनंत गुपचूप मान खाली घालून जेवत होता. सुंदराबाईनं प्रकरण आणखी वाढवलं. म्हणाली, 'येताना तर म्हणाला होतास, घरी बसून वाचीन - अभ्यास करीन. आणि पुस्तकंही घेऊन आला होतास. इथं आल्यापासून एक दिवस कधी पुस्तक हातात घेतलंयस? दिवसभर नुसता धांगडधिंगा नुसतं हुंदडणं! या वेळी जर का नापास

झालास तर शिकणं सवरणं बंद करून गायी म्हशी चारायला धाडून देईन तुला.'

तारक्काही मान खाली घालून जेवत होती. तिचं तोंडही पार उतरलं होतं. डोळे भरून आले होते. घास घशाखाली उतरत नव्हता. अनंताचं मन एवढं हळवं नव्हतं. तो गंभीरपणे जेवत होता.

'सारेच कुठं शिकले सवरलेले असतात का...? गायी चारल्या म्हणून काय बिघडणार आहे?' रत्नाबाई म्हणाली.

'करू दे तेच, आमचे चार रूपये तेवढेंच वाचतील, महाराला द्यायचे ते...'

सुंदरव्वाचं हे बोलणं ऐकून अनंताचं काळीज गोठल्यासारखं झालं. कदाचित त्याच्या डोळ्यासमोर आपल्या घरच्या गायी वगैरे वळणाऱ्या गड्याचं चित्र उभं राहिलं असणार! त्या गड्याचा चिंध्या झालेल्या अंगरखा, त्याचं घाम आणि धूळ यानं माखलेलं घाणेरडं कळकट शरीर या साऱ्यांची आठवण त्याला अगदी असह्यशी होऊन गेली असणार. छे: छे: आपली ही अशी अवस्था येता कामा नये या विचारानं त्यानं भराभरा जेवण उरकलं. बाहेर जाताना माजघरात ठेवलेलं पुस्तक बरोबर घेऊन गेला.

तारक्का जेऊन पडवीत आली. अनंत तिथं नव्हता. तिनं इकडे तिकडे पाहिलं. मागीलदारी जाऊनही पाहून आली. अनंत तिथंही नव्हता. मग घरभर फिरून शोध घेतला, पण तो काही दृष्टीला पडला नाही - तसं खांबाला टेकून गुपचूप बसून राहिली - अनंत कुठं असेल बरं याचा विचार करण्यात थोडा वेळ घालवला; पुन्हा उठून स्वयंपाकघरात गेली - साऱ्या बायका जेवायला बसल्या होत्या. सुंदराबाई तिला म्हणाली, 'ये तारा, घे थोडं आणखी खाऊन.'

'अहं' म्हणत तारक्का बाहेर निघून गेली.

'आता खाल्येय... ती अनंताला शोधीत असणार!' रत्नाबाई म्हणाली.

तारक्का पुन्हा अंगणात गेली. आता काय करावं हे काही केल्या तिला उमगेना, तशी ज्वारीची पोती जिथं रचून ठेवलेली होती त्याच्यापाशी तिथंच एक कांबळं अंथरून त्याच्यावर पहुडली - अस्वस्थ मनानं या कुशीचं त्या कुशीला होत राहिली. धान्याच्या पोत्यांकडल्या बाजूनं कोणाचं तरी गुणगुणणं तिच्या कानी आलं तसं तारक्का उठून आनंदानं जागची उठून उभी राहिली. अनंत पुस्तक वाचीत बसला होता.

'अनंत!' हर्षभरानं तिनं त्याला हाक मारली.

अनंतानं तारक्काकडे गालातल्या गालात हसत पाहात विचारलं, 'काय?'

'चल खेळायला चल.'

'नको, आई रागावते...'

'तू तिच्या देखत असं का वागतोस...? खायला दिलं तुला फराळाचं [illegible] ते सारं घेऊन बाहेर गेलास म्हणून तुला बोलणी खावी लागली.'

'तू मला खेळायला घेतलं नाहीस. खायचं काही घेऊन आलो, तर खेळायला घेशील असं वाटलं म्हणून घेऊन आलो होतो...' अनंत एक दीर्घ श्वास घेत म्हणाला.

तारक्काचे डोळेही आसवांनी तरारून आले होते. प्रेमभरानं अनंताचा हात हातात घेत ती म्हणाली - 'आता यापुढे कध्धी कध्धी तुला टाकून खेळणार नाही.'

अनंतानं डोकं हलवलं. आपलं समाधान व्यक्त केलं.

# 3

अशा प्रकारे दोनतीन दिवस गेले. लग्नासाठी आलेले बहुतेक नातेवाईक परत गेले. सुंदराबाईलाही येऊन महिना झाला होता. तीही जायची उत्सुकता दर्शवू लागली होती. एक दिवस सकाळी रत्नानं आपल्या नवऱ्याला हाक मारून म्हटलं, 'सुंदराबाई जायची घाई करत्येय - मी आणखी चार दिवस रहा, ताराची पाठवणी केली की मग जा म्हटलं, तर म्हणत्ये, मुलाची शाळा बुडते - त्यांचा अभ्यास मागे राहील, घरात इतर कामंही खूप पडलीत - यासाठी गेलंच पाहिजे म्हणत्ये. जायचंय तर उद्याच जाऊ दे. दिवसही चांगला आहे. एक साडी आणायचीय. त्यासाठी बाजारात जावं लागेल.'

मल्ल म्हणाला - 'मी शेतावर जाऊन गाडीवानाबरोबर गाडी पाठवून देतो, बाजार पेठेत जाऊन जे काही हवं असेल ते घेऊन या. साडी वगैरे तिच्या पसंतीनं खरेदी करा.'

माजघरातून सुंदराबाईनं म्हटलं, 'बाजार बिजार काही नको, मी उद्या सकाळी अगदी पांढर फटफटताच निघून जाईन. एवढं काय आहे मोठं की आत्ताच दिलं पाहिजे. पुन्हा कधी येऊन घेऊन जाईन. आता खर्चात आणखी खर्च कशाला?' सुंदराबाई जाणून होती की हे काही आपल्याला उगा असंच रिक्तहस्तानं जाऊ देणार नाहीत.

'वा! लग्नाला येऊन असंच जाणार हो! लोक हसणार नाहीत आम्हाला? ताराच्या कपड्यांबरोबरच तुमच्यासाठी एक लुगडं घ्यायचं आम्ही ठरविलं होतं पण तुम्हाला ते पसंत पडेल न पडेल, म्हणून तुम्ही आल्यावरच तुमच्या पसंतीनं ते घ्यावं असा विचार केला. मनात हाही विचार होताच की लग्नानंतर थोडे दिवस तुम्ही रहालच - अनायासे घरची गाडी आहे - कधीही बाजारात जाऊन घेऊन येता येईल.' रत्ना आग्रहपूर्वक म्हणाली.

सुंदराबाई गप्प बसली. पडवीत उभा असलेला अनंत धावत धावत आत आला आणि मोठ्या लाडानं म्हणाला, 'मी ही बाजाराला येईन. बैलगाडी आहे, बैलांच्या गळ्यात घुंगरं आहेत, छान आवाज येत असेल - ऐकायला कित्ती मज्जा वाटेल.'

'तू कशाला उन्हाचा येतोयस. तू आणि तारक्का आपले घरातच खेळा कसे.'

तसं रत्ना म्हणाली, 'गाडी आहे. येऊ दे, तो थोडाच आपल्या कडेवर बसून येणार आहे.' तिच्या तोंडातून एवढं कुठं उच्चारले जाते न जाते तोच 'मी गाडीत बसून बाजाराला जाणार' म्हणत अनंत मोठ्या खुशीत टणाटण उड्या मारीत बाहेर पळाला.

आंगणात तारक्कानं त्याला विचारलं, 'कोण कोण जाणार आहे ?'

'मी...'

'तू कोणा बरोबर जाणार आहेस ?'

'ही आत्ता गाडी शेतावरून येईल. मी, आत्या आणि आई सारे जाणार आहोत.'

'कोणी सांगितलं ?'

'आईनं'

'तू नको जाऊस'

अनंत उगा राहिला.

'आपण दुपारी घर बनवून छान छान खेळ खेळू.'

'नको. हवं तर तूही चल आमच्या बरोबर बाजाराला-' अनंत म्हणाला.

'मला नाही येता यायचं - अद्याप माझ्या अंगची हळद उतरलेली नाहीए.'

अनंताला म्हणण्याचा अर्थ नीटसा समजला नाही. 'नसेल येता येत तर नको येऊस तू - मी तर जाणार बाबा-' त्यानं स्वच्छ स्वच्छ सांगून टाकलं.

'उद्या तर तू जाणार आहेस. निदान आजच्या दिवस तरी आपण दोघे मिळून खेळूया. चल ये.' हे सारं सांगताना तारक्काच्या शब्दाशब्दातून व्यक्त होणारा विनय पाहून कोणीही बाजाराला जायचा आपला बेत रहित करता - परंतु अनंताचं या गोष्टीकडे जरा देखील ध्यान नव्हतं - तो शहरात जन्मला आणि लहानाचा मोठा झाला. शहरी मुलांची तेवढ्यास तेवढी - कामापुरती मैत्री करायची वृत्ती त्याच्याही ठायी होती. खेड्यापाड्यात वाढलेल्या मुलांत आढळणाऱ्या कोमल स्नेहभावाची त्याला कल्पना देखील नव्हती. म्हणून त्यानं... 'आपण तर जाणार बुवा. मी अजून ते गाव पाहिलेलं नाही-' असं स्पष्ट सांगून टाकलं.

'तर जा अन् काय...' तारक्का म्हणाली. तरीही तिनं मनाशी विचार केला की, आईला सांगून अनंतला घरीच थांबवून ठेवायला हवं. त्यासाठी तिनं प्रयत्न करून पाहिला पण तिची इच्छा सफल झाली नाही. ते सारे खाऊन पिऊन तयार होऊन बाजाराला जायला निघाले. गाडी दाराशीच उभी होती. अनंत सर्वांच्या आधीच गाडीत जाऊन बसला होता. तारक्का फुरंगटून गाल फुगवून घराच्या पायऱ्यांवर उभी राहून त्यांच्याकडे पाहात होती. तिला नाईलाजानं घरी राहणं भागच होतं. सुंदराबाईनं गाडीत बसता बसता ताराची मुद्रा पाहिली अन् म्हणाली -

'एकटीचा वेळ जाणार नाही - मुमी ही मेली कालच गावी निघून गेलीय... अनंत, तू कां नाही घरी राहत ताराच्या सोबतीला...?'

तारक्काला मनोमन वाटत होतं की, अनंतानं घरी राहणं आवश्यक होतं. परंतु तिचा स्वाभिमान तिच्या आड आला - आपल्या पोटातलं हे तिनं ओठावर येऊ दिलं नाही. -गप्प बसून राहिली. गाडी निघाली - ती दृष्टीआड होऊन पार दिसेनाशी होईपर्यंत पाहात तशीच

तिथं उभी राहिली. मग काहीशा असहाय्य मन:स्थितीत आत निघून गेली. घरात कोणीच नव्हतं. चार सहा दिवस लग्नाच्या धामधुमीत कसे निघून गेले ते उमजलेच नाही. आता एकदम घर सुनं सुनं झाल्यानं तिला ते असह्यसं होऊन गेलं. डोळे आसवांनी तरारले. हळू हळू तिचं मन सासरचा विचार करण्याकडे वळलं...

'उद्या बुधवारचं सासरी जावं लागणार. घेऊन जायला येणार आहेत. बालपणी तर गेले होते. ठीक आहे, आता तिथं आईबाबांना सोडून कशी काय रहाणार मी! मुलीचा जन्मच मेला मुळी वाईट. जन्मघर सोडून दुसऱ्या घरी जाऊन जगावं लागतं...' या साऱ्या विचारांचं दडपण तिच्या डोक्यावर आलं. निरर्थकच ती घरात इकडून तिकडे फेऱ्या मारायला लागली. करायला काही कामच नव्हतं. आज मैत्रिणीही कोणी आल्या नव्हत्या. सुमतीही कालच आपल्या सासरी गेली होती. ती तारक्काची समवयस्क असली तरी तिचं लग्न आधीच झालं होतं. ती एक दोनदा सासरी जाऊन राहून वगैरे आलेली होती. काल सासरी जायला निघायला आधी भेटून मनातलं सारं सारं काही सांगून निरोप घेऊन गेली होती. आपली सासू आपल्याला कशी शिक्षा करते, सतावते वगैरे साऱ्या गोष्टीही तिनं तारक्काला मोकळेपणी सांगून टाकल्या होत्या. ते सारं आठवून आणि त्या संदर्भात स्वत:विषयी विचार करता करता ताराला रडू फुटलं. या साऱ्यात काही वेळ गेला. बरोबर खेळायला कोणी नव्हतं, करायला हाताशी काही काम नव्हतं. इकडे तिकडे धुंडून अनंताचा परवा फाटलेला मलमलचा सदरा तिनं हाती घेतला. आत जाऊन सुई दोरा शोधून आणला आणि दारात बसून शिवायला लागली. तिला धाकटा वा थोरला कोणी भाऊ नव्हता. अनंताचं काम करण्यात तिला मोठं सुख वाटत होतं. आनंद वाटत होता.

दुपारच्या वेळी बसायला म्हणून एक म्हातारी आली. तिनं विचारलं - 'काय करत्येस ग, तारा?'

तारा मान वर करीत म्हणाली, 'या चांगलव्वा आजी, काल खेळताना अनंताचा सदरा जरा फाटला होता - तो शिवत्येय झालं!'

'अगं माझ्या पोरी, तू ग कधी हे शिवणटिपण शिकलीस?' बसता बसता इकडे तिकडे बारकाईनं पाहून घेत तिनं विचारलं - 'इथं कोणी मुतलंबितलं तर नाही...'

तारक्का मनातल्या मनात 'आली मोठी स्वच्छतेची पुतळी' म्हणत उघडपणे 'छे: इथं कोण करील असं काही दरवाजाशी -' असं म्हणत गप्प बसली.

म्हातारी आरामात भिंतीच्या सावलीला फतकल मारून बसली - मग आत डोकावीत म्हणाली, 'घरात कोणी दिसत नाहीय ते?'

'सगळे बाजाराला गेलेत.'

'आता फिरून पुन्हा कशाला बाजार?'

'उद्या माझी मामी गावी परत जाणार आहे.'

सुंदरा उद्या जात्येय ? आणखी चार दिवस राहून तुझी पाठवणी करून मग गेली असती की-'

'अनंताची शाळा बुडतेय यासाठी जायचं म्हणत्ये-' कांहीशा असमाधानानं तारक्का म्हणाली.

'अजून मुलगा जसा लहान आहे - एवढ्यात असं कुठलं शिक्षण वाया चाललंय ते! कधी केव्हातरी तर येते ती - आणखी चार दिवसांनी गेली असती तर नसतं चाललं ? आता काय पुन: पुन्हा येणं होणार आहे हो ?'

ताराला तिचं हे बोलणं रूचलं नाही. 'तुमचं म्हणणं बरोबर आहे... पण आमच्या अनंताचं सारं लक्ष शाळेकडे - अजून हा एवढा लहान आहे तरी तिसरीत शिकतोय.' अनंताचा मोठेपणा वाढवून फुगवून सांगत ती म्हणाली: 'इथल्या शाळेच्या काय गोष्टी करता, ते तर मोठं गाव आहे... शहर आहे...तिथं एकाचं पाहून दुसरा शिकत जातो.

'आमचा अनंत खूप-खूप शिकेल - चांगला मोठा मामलेदार होईल -' तारानं मामलेदार म्हणजे काय याची काही कल्पना नसतानाही मोठ्या अभिमानानं सांगून टाकलं.

'होऊं दे पोरी, सुंदराचं नशिब उदयाला येईल! एवढा हा एकच मुलगा आहे ना तिला! या मुलाच्या पाठीवर आणखी काही नाही झालं का तिला?' त्या खेडवळ म्हातारीनं पोरीचं म्हणणं खरंच मानलं.

'जाऊ दे, आणखी होतील. अजून काय नवरा-बायको म्हातारे थोडेच झालेत ?' असं म्हणून मग थोडं थांबून तिनं विचारलं, 'देवळात तर जाते येते ना सुंदरा ?' देवाधर्माला धरून वागणाऱ्यांना सारं काही प्राप्त होतं अशी तिची श्रद्धा होती. एवढ्याचसाठी म्हाताऱ्या चांगलव्वानं हा प्रश्न केला होता.

अशा प्रकारे जरा वेळ गप्पा टप्पा करून म्हातारी निघून गेली. तारक्काही अंमळशानं रात्रीच्या स्वयंपाकाच्या तयारीला लागली. वेळ कसातरी कडेला लागला. सारी मंडळी बाजाराहून परतली तशी तारक्का धावत धावतच पडवीत गेली. 'हां हां शिवशील, जरा दूर रहा, बाजारात फिरून आलोत ना-' तिची आई म्हणाली. सर्व मंडळींनी कपडे बदलले. तारक्कानं आतून सर्वांना धुतलेले कपडे आणून दिले. अनंतानंही अंगातला सदरा काढून टाकला. तारक्कानं दुपारी शिवून बिवून ठाकठिक केलेला त्याचा सदरा अभिमानानं आणून दिला. अनंतानं तो पाहिला - त्याची शिवण त्याला आवडली नाही. ती हात शिलाई होती, घातलेली टीप चांगली मोठी होती. मशीन शिलाईच तेवढी माहीत असलेल्या त्याला ही हातशिलाई पाहून जरा नवलच वाटलं. आईला ते दाखवीत हसत हसत तो म्हणाला, 'बघ कसं शिवलंय ते!'

'हातशिलाई ही अशीच असते... कोणी शिवलंय ?' नंतर तारक्काकडे वळून आनंदानं - 'तारा, तू शिवलंयस होय ?' असं म्हणत प्रेमभरानं तिनं तिला एक गोड चिमटा काढला.

अस्वस्थपणे तारा 'हो' म्हणाली.

सुंदरव्वानं तारक्काचं मस्तक कुरवाळीत शिवलेला सदरा हाती घेतला आणि पुन्हा बारकाईने त्याचं निरीक्षण करीत 'किती छान आहे' असं म्हणत प्रेमानं तिची दृष्ट काढल्यागत आपल्या कानावर बोटं मोडली आणि रत्नाकडे पाहत म्हणाली, 'तू काळजी करीत होतीस नव्हे, पोरीचं सासरी कसा निभाव लागेल म्हणून ? तिला स्वत:ची अक्कल नाही. नुसती सांगकामी आहे; शुंभासारखी नुसती उभी राहते. वगैरे म्हणत होतीस ना ? आता सांग तिला सदरा शिवून ठेवायला कोणी सांगितलं होतं ? तिनं आपण होऊन तो शिवून ठेवला की नाही ? माझ्या तर स्वप्नात देखील नव्हतं की सदरा शिवायला हवा म्हणून ! तिनं तर आपण होऊन सुई दोरा शोधून काढून शिवून टाकला. वाढत्या वयाबरोबर शहाणपण आपोआप येत जातं माणसाला!' असं म्हणत ती अनंताच्या अंगात सदरा घालायला लागली.

अनंत सदऱ्याच्या बाहीतून आपले हात सोडवून घेत म्हणाला, 'हा असा शिवलेला सदरा घालून जाईन तर शाळेत सारी जणं ही ही करुन हसतील मला'.

तारकाच्या मुद्रेवर झर्रकन म्लानतेची छाया पसरुन गेली. ते सुंदरव्वाच्या नजरेतून काही सुटलं नाही. ती काहीशी चिडून म्हणाली, 'अरे, जा जा. म्हणे शाळेतील मुलं हसतील ! यात हसण्यासारखं काय आहे ? असा सदरा वापरायची त्यांना अक्कल आहे काय ? आणि मग ताराच्या पाठीवरुन हात फिरवीत तिला बरं वाटावं यासाठी ती पुढं म्हणाली, 'चार वर्ष जरा उशीरा जन्म घेतीस, तर माझ्या अनंतासाठी तुला सून करुन घेऊन जात्ये.'

तशी रत्ना म्हणाली 'हो, अनंतासाठी कसली हिला सून करुन घेऊन गेली असतीस ते दिसलंच की ! आपल्या माहेरची मुलगी सोडून कोणाला पत्ता लागू न देता रातोरात अनंताचं लग्न उरकून टाकलंस तू ते लग्न होतं की पोरखेळ ?'

ते ऐकलं आणि सुंदरव्वा काहीशी आतून हादरल्यासारखी झाली. चकित झाली. म्हणाली, ' माहेरचीच मुलगी सून आणीन असा काही माझा हट्ट नव्हता बाई. नात्यातच सोयरीक जमवते तर हा नाही आला, तो नाही आला करुन माझा जीव नसता का खाल्ला साऱ्यांनी ? कार्यात अशा गोष्टी व्हायच्याच. बाहेरुन कुठून आणली, घरातच मुलगी होती.. आपण होऊन आले आणि चार अक्षता टाकून, सारं उरकून घेतलं यात माझा एवढा देखील हात नव्हता हं...'

रात्रीची जेवणं झाली. कल्पना नाही, अनंता भराभरा आपल जेवण उरकून का कशासाठी

दारात येऊन राहीला ते! तारका जेवण आटोपून तिथनं जायला लागली. तर दारातच तिची वाट अडवीत दुष्टासारखा समोर येऊन उभा ठाकला. तारका म्हणाली 'वाट सोड ना ?'

खट्याळपणे ही ही ही करून हसत अनंत तसाच तिची वाट अडवून उभा राहिला. त्याच्या मनात काय आहे ते उमजून तारकानं तयाचा हात धरून त्याला दूर ढकलण्यासाठी धडपडत म्हटलं, 'सोड ना माझी वाट, हो बाजूला. 'नाही. प्रथम आपल्या नवऱ्याचं नाव घे, मग देईन जाऊ तुला.''तिला नवऱ्याचं नाव घ्यायला सांगतोस. तू घे, आधी आपल्या बायकोचं नाव.' मुलीच्या मदतीला धावून येत रत्नव्वा म्हणाली. 'हं अनंत, तूही आपल्या बायकोचं नाव घे बाळा... फार दिवस होतील... मी ही ऐकलं नाही ते... ? पोराच्या तोंडून त्याच्या बायकोचं नाव ऐकण्याच्या उत्साहभरात सुंदराबाईनं त्याला आग्रह केला.

माझं काय, माझं लग्न झालं त्याला फार दिवस झालेत आता. आधी तिला घेऊ दे. मग मी घेईन नंतर.' अनंताच्या बोलण्याच्या एकंदर पध्दतीवरून तो नंतर नाव घेणार नाही हे तारका मनोमन समजून चुकली होती. परंतु आईनं आणि मामीनं फारच आग्रह चालवला तशी चालवला तशी लाजून उखाण्यात नाव घेऊ लागली....

''दोन पदरी मोत्याची माळ,
आठ पदरी मोत्याची कंठी..
उंटावर बसून गुंफतो,
हत्तीवर बसून दान करतो!
पालखीत बसून मोंगऱ्या खेळतो..
पलंगावर बसून लेकाला खेळवतो,
तांदळाच्या पोत्यावर बसून हिशोब जुळवतो..
हिशोब न जुळला तर बहिणीला बोलावतो!
'भरम' भ्रमात पडल्यासारखं होऊन.''

'तूही उखाण्यात नाव घे. याहूनही अधिक छान उखाणा व्हायला हवा तुझा.' सुंदराबाई मुलाला समजावून सांगत म्हणाली.

'मला नाही माहीत. खरं कोडं तर हे आहे की त्या काळ्या पोरीशी मी मुळी लग्नच केलं नाहीए...' असं म्हणत आणि ही ही ही करून हसत हसत अनंत बाहेर पळून गेला.

बोलून चालून एका अजाण पोराचे उद्गार ते. पण ते ऐकलं, आणि जणू काही कोणी आपल्या काळजाला तापल्या सांडशीनं डाग देत आहे अशा सुंदरव्वाची भावना होऊन गेली... अशी कळ तिच्या काळजाला चटका देऊन गेली.

# 4

अनंत त्या रात्री सकाळ होईस्तो आपल्या घरी जायचीच स्वप्नं पाहात होता, रात्री मध्येच जेव्हा त्याला जाग आली तेव्हा त्याला आपण ऐनापुरातच झोपलो आहोत वा मित्रांबरोबर शाळेत जातो आहोत असा भास झाला. आता चांदूरमध्ये राहून राहून तो उबगला होता. सुरूवातीला चार दिवस त्याला गाव यासाठी आवडले होते की, सारे जण त्याच्याशी मोठ्या प्रेमानं बोलत. तेव्हा त्याला वाटलं होतं की राहायला शहरापेक्षा हे गावच अधिक चांगले आहे. परंतु हळूहळू त्याचं मन आपल्या गावचीच ओढ घेऊ लागलं, कारण इथं खेळायला बरोबरीचे कोणी मित्र नव्हते, मोठी शाळा नव्हती; येऊन जाऊन खेळायचं झालं, तर घरात तारक्काबरोबर वा गल्लीतल्या मुलांबरोबरच खेळणं भाग होतं.

दुसऱ्या दिवशी सकाळी उठल्या उठल्याच आपल्या बिछान्यावर बसून त्यानं आवतीभोवती बारकाईनं पाहिलं. गावाला जायची कुठली कसली तयारी त्याला दिसली नाही - तसं साशंक मनानं त्यानं आपल्या आईला हाक मारली : 'आई !'

त्याच्या आईनं माजघरातनंच विचारलं - 'कायरे आज एवढ्या लौकर कशाला उठलास ?'

'घरी कधी जायचं ?'

सुंदराबाईनं काही एक उत्तर दिलं नाही. मुलाची गावी परत जायची ही उत्सुकता पाहून ती मोठ्यानं हसायला लागली. अनंतानं चक्रावून म्हटलं 'आई !'

'आता गावीबिवी कुठं नाही जायचं, इथं आमच्या घरी गायी वळायला रहा.' रत्नाबाईनं हसत हसत म्हटलं.

अनंत तोंड एवढसं करून शाल पांघरून घेऊन फिरून झोपी गेला. गावी जायची गोष्ट फिस्कटल्यामुळे तो अगदी बेचैन होऊन गेला होता. जायचं नाही म्हणाल्यामुळे त्याला आपल्या आईचाही भारी राग आला होता. राग अनावर झाल्यामुळे अखेर त्याला रडू कोसळले. त्याला वाटलं वडील आणि गाव सोडून आपण इकडे आलोत त्याला जणू काही पाचसहा वर्षं उलटलीत. पण अनंताचं जाणं रहित झालं ही गोष्ट तारक्काला छान झालीशी वाटत होती.

पडवीत दुसरं कोणी नाही असं पाहून तारक्कानं हसत हसत विचारलं, 'अनंत, तुमचं गावी जायचं रहित झालं नां ?'

अनंतानं उतावळं होत विचारलं, 'कां उशीर कां करतेय आई अशी ?'

'...बुधवारी जाणार... माझ्या पाठवणीनंतर'

'नाही, आम्ही आजच जाणार आहोत.' एकदा ठरलेला बेत आई कधीही मोडणार नाही या खात्रीनं अनंत म्हणाला.

'जाणार... आणि कोणाबरोबर ?'

'अर्थात आईबरोबर.'

'अरे, ती तर दूरची बसलीय मूर्खा -' असं म्हणत तारानं त्याला वाकुल्या दाखविल्या.

'अनंताची मुद्रा काळवंडली. आता त्याला उमजलं की सकाळी आई हसून गप्पशी का झाली होती, परंतु तरी त्याला ताराक्काच्या सांगण्याचा विश्वास वाटेना. तो अंथरूणावरून उठला आणि हलकेच माजघरात गेला तिथं एका कोपऱ्यात सुंदराबाई बसली होती. त्यानं तिच्याकडे साशंक नजरेनं पाहिलं. तेवढ्यात त्याची आई म्हणाली, 'इकडे शिवायचं नाही साडी ठेवली आहे तिथं' तेव्हा त्याची खात्री पटली. दबल्या आवाजात 'नाही' म्हणत तो आत निघून गेला.

अनंत हे चार दिवस कसे काढायचे याचा मनाशी विचार करीत होता. आता अनंत आणि तारक्का दोघंच सवंगडी उरले होते. तारक्का नवी नवरी असल्यामुळे कुठे घराबाहेर जाऊ येऊ शकत नव्हती. त्यामुळे घराचं परसदार आणि पडवी ही दोनच ठिकाणं त्यांना खेळायला उपलब्ध होती. घर तयार करणं, गाडी बनवणं वगैरे खेळ ते खेळत. कधी कधी अनंत आपल्या शाळेत शिकलेले खेळ, कोडी वा उखाणे तिला समजावून सांगायचा. त्यातलं तारक्काला काहीही समजत नसायचं, तरीही ती मोठ्या औत्सुक्यानं तो जे जे काही सांगेल ते ऐकत राहायची. कधी खेळाचा कंटाळा आला की, अनंत तारक्काला आपलं पुस्तक वाचून दाखवायचा, तिला सांगायचा की यात कविताही आहेत. अनंताची हुषारी पाहून तारक्का मनोमन सुखावून जायची. कधी कधी तो कविता गाऊनही दाखवायचा. ती कधी आश्चर्यानं त्याला विचारायची - 'अनंत, हे इतकं बारीक अक्षर तू कसं काय वाचतोस ? त्यावर अनंत हसून ज़रा आढ्यतेनं म्हणायचा - 'हे क़ाय बारीक अक्षर आहे होय ? सहाव्या इयत्तेच्या पुस्तकातलं अक्षर तर याहूनही खूप बारीक असतं... ते पाहिलंस तर तू काय म्हणशील कल्पना नाही!' तशी शाळेचा अभ्यास हे भारी कठीण काम आहे. असं समजून ती गप्प बसायची. तारक्काचं मन अनंताशी ही हुषारी - हे शहाणपण पाहून आनंदानं स्वत:ची हार कबूल करायचं. अनंताचं शिक्षण, त्याचं बोलणं सवरणं आणि खेळ वगैरे विषयी जरा फुगवून तारक्का आपल्या वडिलांना कौतुकाने

सांगायची. संध्याकाळी मल्ल शेतावरून घरी परत आला की, त्याला तिच्या तोंडून याच कौतुक कथा ऐकायला मिळायच्या.

एक दिवस दुपारचं तारक्काला जवळ बसवून रत्नव्वा आणि सुंदराबाईनं सासरी मुलीनं कसं राहायचं, सासऱ्यांबरोबर कसं वागायचं, या विषयी एक दोन तास उपदेश केला. तिच्या हिताच्या चालीरितीच्या चार गोष्टी त्यांनी तिला समजावून सांगितल्या. ते सारं ऐकल्यावर सासर म्हणजे निव्वळ भूतखाना असलं पाहिजे असा तिचा ग्रह झाला, अर्थात या साऱ्या गोष्टींचा मननपूर्वक विचार करण्याइतकी समज आणि प्रौढपणा तिच्या ठायी नव्हता म्हणा. काहीही असो आपल्या पुढ्यात बसून त्यांनी तिला जे जे काही सांगितलं, शिकवलं त्याला ती 'हूं हूं' म्हणत गेली. तिचं मन त्यात नव्हतंच मुळी. ते तर बाहेर अनंताबरोबर खेळण्या बागडण्यात दंग झालं होतं. बाहेर अनंत खेळायला कोणी जोडीदार नसल्यामुळे गोठ्यात जाऊन गायीच्या वासराशी खेळण्यात गढला होता. अधून मधून घाबरून तो दाराच्या दिशेनंही नजर टाकायचा कारण आपण हे असं इथं खेळतोय हे जर आईला समजलं, तर ती आपल्याला चांगला दम भरील याचीही त्याला पूर्ण कल्पना होती. त्यासाठी त्यानं एक सावधगिरीचा एक उपायही शोधून काढला होता. तिथं जवळच त्यानं आपली पुस्तकंही हाताशी ठेवून दिली होती. आतून सुंदराबाई येतेयं असं दिसलं रे दिसलं की लगेच पुस्तक उचलून घेत ते वाचायचं नाटक करायचा. जवळ पास कोणीही नाहीए अशी खात्री पटली की, कुठं वासरावर स्वार हो, कुठं त्याची शेपटीच पिरगळ, तर कधी त्याच्या गळ्याभोवती मिठी मारून लोंबकळत रहा. असे नानाप्रकारचे खेळ तो त्याच्याशी खेळायचा. ते छोटं वासरू म्हणजे त्याच्या दृष्टीनं एक खेळणंच होऊन बसलं होतं. अशा प्रकारे बराच वेळ त्या वासराशी खेळता खेळता त्यानं त्याच्यावर स्वार होऊन त्याचा कान पिरगळला. तसं ते वासरू अचानक अंग झाडीत जागचं जागं उभं राहिलं आणि अनंत टप्पदिशी खाली जमिनीवर आदळला. त्यात त्याला चांगलंच लागलं. त्यासरशी तो 'आं.. आं...आं...' करून रडायला लागला.

हे कानी पडताच आतून रत्नव्वा लगेच तिथं धावत आली - 'काय केलंस... वासरानं लाथ वगैरे मारली का?' असं म्हणत तिनं त्याला वर उचलून घेतलं. एवढं होऊनही अनंत आपली पुस्तक उचलून घ्यायला विसरला नव्हता. त्याची आसवं पुसत, 'घरात बसून वाचायचं बेटा, इथं कशाला आला होतासं?' असं म्हणत त्याला कडेवर घेऊन ती आत गेली. तो आरडा ओरडा ऐकून तारक्का धावत बाहेर आली. सुंदराबाई रागारागानं म्हणाली, 'कशाला आणतेस त्याला इकडे?'... तिथंच पडू द्यायचा... गायीच्या पायाखाली... वासराबरोबर खेळू नकोस, सांगून सांगून थकले मी. तरीही हा आपला रात्रंदिवस तिथंच तडमडतोय एखाद्या कोडग्यासारखा!' इकडं हे तोंडानं ताडन चाललं असलं तरी त्याचा पाय वगैरे कुठे तुडवला गेला नाहीना, त्याला कुठे लागलं बिगलं

नाहीना, हे पाहिल्याविना तिच्याच्यानं रहावलं नाही. अगदी जवळ जाऊन नीट निरखून तिनं ते पाहून घेतलं. रत्नव्वानं त्याला आंजारत गोंजारत एक लाडू खायला दिला. तो हाती पडताच तो लगेच खेळायसाठी बाहेर धावला.

न जाणो आपला पोरगा तो तेलातला लाडू एखादवेळेस खाऊन बसायचा म्हणून मोठे अधिरतेनं त्याला हाक मारीत ती 'अनंत इकडे ये बाळा... बाहेर नको घेऊन जाऊस..' म्हणाली. परंतु तसाच धावत बाहेर सटकला तशी सुंदराबाई त्याला करड्या आवाजात दटावीत म्हणाली, 'अंत्या मी काय म्हणते समजतं की नाही... मुलांनी कसं राहायला हवं? नुसतं डोळ्यांनी खुणवताच उमजून जाणारी मुलं, मुलं म्हणायची, नाहीतर ह्या अशांना घेऊन काय करायचं?' वगैरे बडबडत तिनं आत जाऊन आपल्या पेटीतून तुपातला लाडू काढला आणि रत्नव्वाची नजर चुकवीत ओच्यात लपवीत तो अनंताला नेऊन दिला अन् त्याच्या हातातला लाडू हिसकावून घेत तारक्काला दिला.

दुसऱ्या दिवशी सकाळी तारक्का आणि अनंत खेळत होते. दिवस वर आल्यास चांगले दोन घंटे उलटले होते. पडवीत उन्ह होतं. त्यामुळं मुलं जास्तीच खुशीत होती. खेळही मजेत चालला होता - तेवढ्यात तारक्काचा सासरा तिथं आला.

आल्या आल्याच म्हणाला, 'रत्ना, उद्या सकाळीच मी तारक्काला घेऊन जाईन... कारण पुढे मग लौकरसा चांगला मुहूर्त नाहीए.'

रत्नव्वा घागर घासणं अर्धवट टाकून हात धुवून ते साडीला पुसत लगबगीनं बाहेर आली - 'या बसाना' म्हणाली. तिनं एक दोरीवरचं एक कांबळ ओढून खाली अंथरीत तारक्काकडे रागानं डोळे वटारून पाहिलं, आणि म्हणाली, 'आम्हीही शास्त्रीबुवाना विचारलंय... उद्याचा दिवस चांगला आहे. जावं घेऊन... आम्हीही त्याच तयारीला लागलोत.'

तेवढ्यात तारक्का परसदारी सटकली. अनंत गोंधळून माजघरात गेला. हूवण्णा - तारक्काचा सासरा, कांबळ्यावर बसत म्हणाला -

'तर असं म्हणाना की तुम्ही मंडळी देखील याच्याच तयारीत होता ते!' मग थोडं थांबून त्यानं विचारलं; 'हां तारा पहिल्यांदाच सासरी जातेय... पाठराखीण म्हणून बरोबर कोण येणार? सुंदरा येईल ना?'

'नाही, मी उद्या घरी परत जात्येय - खूप अडचण आहे घरात. आल्याला उणापुरा महिना होईल की आता...?' आतून सुंदरा म्हणाली.

'मी चार दोन दिवस येऊन जाऊन राहीनच की, कोणा परक्याचं का घर आहे? ती तिथं कशी राहील याची उगाच चिंता कशाला? नवं का घर आहे ते तिला?' रत्ना म्हणाली.

'सारं पाहण्यासवरण्यातलं घर आहे... नाही अशातला भाग नाही. पण प्रत्येक घरचे

काही रीतरिवाज म्हणून असतातच की नाही !' असं म्हणत हुवण्णा उठू लागला - तसं रत्ना म्हणाली,

'नाही नाही बसा जरा आता, चहा घेऊन तर जाल.'

'आत्ताच घेतलाय. आता पुन्हा नको आणखी. शेतावर जायला निघालो होतो. ही म्हणाली, जाता जाता एवढं हे सांगून पुढं जा - म्हणून आलो होतो. उशीर होईल भारी - हा मी निघालो...'

सुंदरा मध्येच म्हणाली, 'नवीनवी नाती जुळतील. चहा घेऊन तर जा.' तिच्या बोलण्यात थोडी थट्टेची उब होती.

'आमचे ही काही नवे आप्तसंबंध जुळून आलेत अशातला भाग नाही. जुनी नाती होती तीच कायम आहेत !'

'असं कसं होईल...? आता सून करून घेतलीयत ना ! पूर्वी मेव्हण्याच्या घरी येत होता - आताचं नातं काही वेगळंच आहे.'

'अशातली कुठली गोष्ट नाहीए, ताई. तेव्हांही आप्पाचं होतं आणि आजही आप्पाचंच घर आहे. मुलगी दिली म्हणून घर काही बदलत नसतं.' असं म्हणत तो उठून जायला निघाला.

'का निघालात का ? आत चहासाठी आधण ठेवलंय की चुलीवर चहा घेऊनच जा ना !' म्हणत रत्नव्वानं आग्रह केला. मग आत जाऊन कपड्यांच गाठोडं घेऊन बाहेर आली... बाजारातनं आणलेले साडी-पोलकी वगैरे दाखवायला लागली. हूवण्णानं ते सारं पाहिलं. आपल्या समजुतीनुसार त्या कपड्यांची किंमत सांगितली. रत्नव्वा कपडे दाखवता दाखवता अधून मधून स्वयंपाक घरात डोकावून चहा तयार करून घेन आली. हूवण्णा चहा पिता पिता म्हणाला, 'सुंदरा जर पोरीबरोबर पाठराखीण म्हणून येती तर आम्हीच तिला साडी नेसवून धाडलं असतं. भरीला भर तुम्ही लोकांनी उगाच हा आणखी खर्च कशासाठी केलात आता ?

'मी देखील हेच सांगत होते यांना. पण ऐकलं नाही यांनी माझं -' तारक्काच्या बरोबर जाऊन तिच्या सासरी पाचसहा दिवस राहून पाठराखणीची एक साडी येताना पदरात पाडून घ्यायची सुंदरव्वाच्या पोटातली गोष्ट सहज ओठावर येऊन चुकली.

'याच विचारानं आम्हीही तिच्यासाठी साडी आणली नव्हती - परंतु ही तर परवाच जायला निघाली होती...'

तिला मध्येच थोपवीत सुंदराबाई म्हणाली, 'मग अजून काय झालं. ही साडी पुन्हा केव्हा तरी देऊ शकाल-' ती असं म्हणाली खरी परंतु आतून त्याबरोबर तिच्या मनात हेही आलं की, 'हे पुन्हा ही साडी आपल्याला फिरून देतील की नाही कोण जाणे !'

तिच्या बोलण्याचा हेतू ध्यानी आला म्हणूनच की काय रत्नाबाई म्हणाली, 'असा

लग्नाचा प्रसंग पुन्हा पुन्हा थोडाच येत असतो. तुमच्यासाठी म्हणून आणलेली साडी तुम्ही नेसून जा - ते जे काही नेसवतील ते जाताना इथं ठेवून जा -'

चार एक दिवस राहून दोन साड्या पदरात पाडून घ्यायचा सुंदराबाईचा विचार रत्नाच्या या बोलण्यानं उलटाच्या पालटा झाला - म्हणून सुंदरा म्हणाली, 'आम्ही उद्याच जातो आहोत - तुम्ही कशाला त्रास करून घेताय ?'

तिथंच उभा असलेला अनंत, न जाणो आता आणखी चार दिवस इथं रहावं लागतं की काय या चिंतेनं मनातनं कष्टी झाला होता. पण आईच्या बोलण्यामुळं अशातलं काही एक होणार नाही याची खात्री पटल्यानं उल्हासीत झाला. काही वेळानं चहा वगैरे घेऊन हूवण्णा निघून गेला.

नंतर रत्नव्वानं तारक्काला बोलावून तिच्यावर खूप राग काढला. 'सासरे घरी आल्यावर चटकन उठून कांबळं अंथरायचं नव्हतंस का! खुशाल आपली खेळतच राहिली - उद्या सासरी गेल्यावर अशीच वागशील वाटतं! याच गोष्टी तिच्या रागाचं कारण होत्या. म्हणून तारक्काचं मन भारी उदाससं झालं. घरात एका कोपऱ्यात जाऊन ती गुपचूप बसून राहिली. तिच्या मनात विचार उमटायला लागले. सासरी कसं राहायचं.. कसं वागायचं... महिना झाला ही सारी मंडळी मला समजावून सांगताहेत - पण अद्याप काही ते नीट माझ्या डोक्यात शिरत नाहीए... कल्पना नाही तिथं माझ्या हातून काय गाढवपणा घडेल - कुठल्या चुका होतील कोण जाणे! थोड्या वेळानं त्या चिंतेचं ओझं मनावर वागवीत मामीपाशी गेली - हळूच विचारलं - 'उद्या तुम्हा सर्व मंडळींना सोडून मी एकटी तिथं कशी राहणार ग, मामी ?'

'या साऱ्या वरवरच्या गोष्टी आहेत. तिथं दोनतीन वेळा जाऊन राहून आलीस, की आई-बाप सारंसारं विसरशील. नवऱ्याशी गूळपीठ जमेल. मनात म्हणत असशील कधी एकदा उजाडतं आणि कधी एकदा सासरी जाऊन पोहोचतेय.' सुंदरव्वा तोंड लटकंच वाकडं करीत म्हणाली...तिची मुद्रा हास्यानं फुलून आली होती. ओठावर सहज स्मित होतं.

मामीच्या म्हणण्याचा आशय न उमजून तारक्का म्हणाली, 'आईला सोडून एक दिवसही मी कधी कुठं बाहेर राहिले नाही.'

'त्यात काय एवढं? एकाच गावात तर आहात, रोज सकाळ उजाडताच आईला भेटू शकशील. जर दुसऱ्या कुठल्या गावाला गेली असतीस तर काय केलं असतंस ? एकदा गेलं की सहा सहा महिने... सुमीचंच घे, काल गेली आता पंचमीलाच येईल, वा पुढं दिवाळीला. माहेर कुठं सासर कुठं-' घसा जरा साफ करीत सुंदरव्वा म्हणाली.

'हो - सुमी मोठी धीराची आहे हं, मामी. माझी तर गावातल्या गावात ही अवस्था होऊन राहिलीय.'

'अन हो - गावातल्या गावातच आहोत म्हणून उठसूट घरी नाही यायचं बरं का. इकडचं तिकडं आणि तिकडचं इकडं नाही सांगायचं. ते सासर आहे बेटा. खबरदार एकमेकात भांडणबिंडण लावून देशील तर - मी हे सारं तुझ्या हिताचं म्हणून समजावून सांगतेय.'

तारक्का तिथं बसली नाही. सासर म्हणजे तिच्यालेखी एक न उलगडणारं कोडं होऊन बसलं होतं - त्याच विचारात ती जागची उठून उभी राहिली - सुंदरव्वानं पुढं सांगायला सुरूवात केली. 'आता तू लहान नाही आहेस, तुला रोज सकाळी उठवावं लागतं. हे बरं नाही. सासू जागी व्हायच्या आत उठून दळायला बसलं पाहिजेस. जर सासू दळत असेल तर तिनं नको म्हटलं तरी दळायला बसलं पाहिजे. नुसतं रिकामटेकडं बसून रहायचं नाही. इथं आई जरा काही बोलली की तू लगेच तोंड फुगवून फुरंगटून बसत्येस. तिथं असलं काही चालणार नाही. इथल्यासारखं आपलं आपण हातानं घेऊन काही खाता कामा नयेस. सासू जेवढं देईल तेवढंच खायचं.' अशा काही गोष्टी सांगून ती गप्प बसली.

तो एक दिवस तारक्कानं निरूत्साहात घालविला. त्या दिवशी दुपारी ती अनंत बरोबर खेळली देखील नाही. संध्याकाळपर्यंत ज्वारी निवडणं, घरातली कामं करणं, परसदारनं जळण आणणं असल्या कामात ती व्यग्र राहिली. अनंत मधून मधून येऊन खेळायला बोलवायचा, तिला जावसं वाटे देखील - पण ती गेली नाही. अनंतच्या आईनंही त्याला म्हटलं, - 'उद्या गावी जायचंय, जा आपलं पुस्तक वाचत बैस.' ते ऐकून अनंत भलताच खूष झाला. त्या आनंदाच्या भरात त्यानं आपलं खेळणं थांबवलं - त्या बरोबरच वाचायचंही विसरून गेला. त्या संध्याकाळी तारक्कानं अनंताबरोबर खूप वेळ गप्पा मारल्या. अनंत तिच्या प्रत्येक बोलण्याला 'हूं-हूं' करीत राहिला. शेवटी तारक्कानं विचारलं - 'अंता, उद्या गावाला गेल्यावर फिरून पुन्हा कधी येशील ?'

'कां ?'

'पुन्हा कधी ये ना !' ती फक्त येवढंच बोलू शकली - पण कारण नाही सांगू शकली.

'सुट्टीत बाबांना विचारून येईन पण फार दिवस राहू शकणार नाही.' थोडा वेळ थांबून तो म्हणाला.

'चार दिवस राहून जाऊ शकतोस...' तारक्कानं अनंतचा हात धरीत म्हटलं. तिच्या स्वरात करूणा होती.

दुसऱ्या दिवशी सकाळी हूवण्णा न्यायला आला. तारक्काला सासरी जाण्यासाठी तयार होणं भाग पडलं. आळीतल्या सगळ्या बायका तिला निरोप देण्यासाठी तिची पाठवणी करण्यासाठी गोळा झाल्या. तारक्का नवी साडी नेसली, शेजारच्या पाच घरी गेली, सवाष्णींनी तिची फळातांदळानं ओटी भरली. सुंदराबाईनं तिला आत नेऊन फराळाला

बसवलं - पण तिच्य घशाखाली एक घास उतरेल तर शपथ! कसे तरी एक दोन घास घशाखाली घालून ती बाहेर आली. नंतर आईच्या सांगण्यावरून देवघरात जाऊन देवाला नमस्कार करून आली. त्यानंतर आईवडलांना आणि इतर वडीलधाऱ्यांना तिनं वाकून नमस्कार केला. जमलेली मंडळी तारक्काच्या गुणांची वाखाणणी करू लागले. तारक्काचं तोंड लाल झालं - डोळे आसवांनी भरून आले. जड पावलांनी ती घराबाहेर पडली.

साऱ्या बायका घोळक्यानं तिच्या पाठोपाठ गेल्या. सर्वात पुढे सासरा होता. पाच सवाष्णी केळ्याचे घड ठेवलेली ताटं घेऊन तिच्या समवेत चालत होत्या. पाच सहा पावलं पुढं गेल्यावर सुंदराबाई म्हणाली, 'हे घे पाणी जरा चूळ भरून टाक.' तारक्कानं मामीच्या हातनं तांब्या घेतला आणि चूळ भरून टाकली.

बायकांच्या घोळक्यातनं कोणीसं म्हणाली, 'गावात तर आहेस रोज आईवडील दृष्टीला पडतीलच की, कां उगाच आसवं ढाळत्येस ?'

रत्नव्वाच्या डोळ्यातही अश्रू उभे राहिले. जमलेल्या बायकांचेही डोळे आसवांनी डबडबले. मल्लनेही नेसत्या धोतराच्या सोग्यानं डोळे टिपले. हा वेळ पावेतो तारक्कानं आवरून धरलेला आसवांचा बांध फुटला - ती मामीला मिठी मारून हुंदके देत देत रडू लागली. हे सारं पाहून अनंताचेही डोळे पाणवल्या वाचून राहिले नाहीत. हूवण्णा मागे वळून पाहत कठोर स्वरात म्हणाला, 'तुला तिथं फाशी द्यायला काही कोणी घेऊन जात नाहीए, चल.'

'हसत हसत जायला हवं पोरी सासरी... पुराणातलं ऐकलं नाहीस - नवऱ्याबरोबर सीता कशी वनवासाला गेली ते ?' दूर उभी असलेली विधवा चांगलव्वा म्हणाली.

तारक्का पुढं गेली. बायकाही चार पावलं तिच्याबरोबर चालत गेल्या. तारक्कानं अडखळत अडखळत त्यांना थांबायला सांगितलं. तसं एक एक करून बायका पुढं जायच्या थांबल्या.

हूवण्णा गाठोडं उचलून पाचसहा पावलं पुढं झाला. फळाची ताटं घेतलेल्या बायकाही पुढं चालल्या होत्या. तारक्काही चार दोन पावलं पुढं गेली अन् म्हणाली, 'ये अनंत, चल बरोबर. नंतर परत ये.'

अनंत काही वेळ विचार करीत उभा राहिला. त्याच्या आईनं म्हटलं, 'आक्काच्या बरोबर जा ना.'

अनंत धावत धावत तारक्काच्या जोडीला येऊन मिळाला. काही वेळपर्यंत नणंद-भावजय तारक्काला जाताना पाहत उभ्या राहिल्या. तारक्कानंही त्या दृष्टीआड होइस्तो किमान दहावेळा तरी वळून मागं पाहिलं असेल. ती दिसेनाशी झाल्यावर या दोघी एक प्रदीर्घ श्वास घेत माघारी वळल्या.

रत्नव्वा अश्रू पुसत म्हणाली, 'आईचं घर सोडून ती आजवर कधी बाहेर गेली नाहीए.'

एक बाई म्हणाली, 'अगं, त्यात काय असं! ते काय कोणा परक्याचं घर थोडंच आहे ?'

'मुलगी मोठी हुषार आहे हो - अनंतासाठी किती जीव टाकते. जरा थांबून बरोबर घेऊन गेलीच की.' सुंदराबाईनं आपल्या तिथल्या चार दिवसाच्या वास्तव्यातला अनुभव व्यक्त केला.

'तिथं गेल्यावरही पोरीकडं कोणी बोट नाही दाखवू शकणार. सर्वांच्या बरोबर मिळून मिसळून गुण्यागोविंदानं राहणारी पोर आहे ती.'

'दुसरे ही समंजसपणं सांभाळून घेणारे हवेत ना ! ती तर सोनं आहे सोनं - बावनकशी...'

'अग जाऊदे ग, बाई- आपली सून आणि मुलगा कोणाला नकोशी का असतात. आता ती जरा फाटक्या तोंडाची जरूर आहे, उद्या जैनमंदिरात भेटू दे...मी समजावीन तिला की, आता सून आणि मुलगा करते सवरते झालेत, तू आता देवधर्मात-पूजापाठात मन गुंतव -' म्हाताऱ्या चांगलव्वानं आश्वासन दिलं.

सारी जण आपआपल्या घरी निघून गेली.

घटकाभरातच अनंत घरी पळून आला.

'सुंदराबाईनं विचारलं, 'कायरे अनंता, येवढ्या लौकर परत आलास ?' मग स्वत:शीच बडबडायला लागली- 'हा मुलगा एक मिनिट दुसऱ्याच्या घरी टिकेल तर शपथ !'

'आक्का आत गेली, मी तिथं थांबून काय करणार होतो ?'

'का तिथं भरमण्णा नव्हता ?'

'होता. ज्वारीच्या पोत्यावर बसलेला होता. तो माझ्याशी बोलला देखील नाही.' अनंतानं हात नाचवीत तोंड वाकडं करीत उत्तर दिलं.

'किती हरामी आहे हा !'

अनंताच्या बोलण्याचा आवाज ऐकून रत्नव्वा आतून धावत बाहेर आली. विचारू लागली,- 'दारात ओवाळायला कोण आलं होतं ?'

'चिमव्वा मामीच आली होती -' असं म्हणत, मल्लने नुकतंच दावं सोडलेल्या वासराला पकडण्यासाठी तो धावला.

त्याच दिवशी-दिवस ढळता सुंदरव्वाला धाडायसाठी तारक्काला बोलवायला मल्ल गेला. तारक्का सासूला विचारून घरी आली. ती पोहोचेपर्यंत गाडी निघायच्या तयारीतच उभी होती. गावी जायच्या उत्साहात अनंत आधीच गाडीत जाऊन बसला होता. सुंदरव्वा अद्याप आत घरातच हाती. तारक्का 'अंता, आत तर ये-' म्हणत घरात गेली.

तारक्का येताच सुंदराबाई 'थोडसं खाऊन घे' म्हणत तिला आतल्या खोलीत घेऊन गेली... आणि घरी घेऊन जाण्यासाठी घरगुती तुपात तयार केलेले लाडू तिनं तिला खायला दिले. तारक्कानं खायच्या आधी पुन्हा एकदा अनंताची आठवण केली.

'त्याचं काय घेऊन बसलीस-इतका वेळ तो खादाडतच होता. तू घे खाऊन.' सुंदरव्वा म्हणाली - तसं ती घाई घाईनं खाणं उरकून उठली.

'गावी पोहोचायला अंधार होईल -'असं टुमणं लावीत मल्ल एकसारखी निघायची घाई करीत होता. म्हणून सुंदराबाई घाईघाईनं पाच सहा जणांना भेटून गाडीत जाऊन बसली. गाडी निघणार तेवढ्यात तारक्कानं आपलं मन हलकं करावं यासाठी म्हटलं, - 'सकाळी जेवून जा म्हटलं, तर पळून आला, अनंत.'

सुंदरा आरामात बसत रत्नव्वाकडे पाहात म्हणाली - 'तुझ्या सासूच्या समोर तो काय जेवणार ?' हे वाक्य उच्चारताना तिच्या मुद्रेवर थोडसं हसू खेळून लुप्त झालं. जणू तिला म्हणायचं होतं तारक्काच्या कसं ध्यानात आलं नाही हे ?

मग स्वत:ला जरा सावरून घेत म्हणाली, - 'काही झालं तरी ते सासर होतं, बोलून चालून ही पडली सून, ही बिचारी त्याला बोलावून कसं काय जेवू घालणार! हिच्या सांगण्यानं काय... पोराला पकडून आणून आग्रहानं जेवायला बसवायला हवं हे तर खरं चिमव्वाला सुचायला हवं होतं. बिचारी काय करू शकणार... सध्या तिचा एक पाय घरात आणि एक बाहेर अशातली स्थिती! मी म्हणत होत्ये ते तिच्याविषयी... केस पिकलेत म्हणून का झालं रीतरिवाज म्हणून काही आहे की नाही ?' शक्य तेवढ्या संयमानं ती बोलत होती खरी - पण तरीही तिचं बोलणं भलतंच जळजळीत होतं.

या बोलण्यामुळं तारक्काचं मन भारी अस्वस्थ झालं. तिच्या मनात वेदनेची जणू एक तीव्र कळ उमटून गेली. ती काय म्हणून, का आणि कशी ते तिला उमगलं नाही. तिनं आपलं मन अन्यत्र गुंतवलं. ते विसरायचा यत्नही केला पण त्या वेदनेच्या विळख्यात गुरफटलेल्या अवस्थेतच ती सासरी जाऊन पोहोचली.

# 5

दुसऱ्या दिवशी त्यांनी गावभर केळी वाटली. सून घरी आली या आनंदाच्या प्रीत्यर्थ चिम्मव्वानं केळी कमी पडली तशी स्वत: बारा आण्याची केळी खरेदी करून घरोघर पोहोचती केली. येऊन जाऊन एकच तर मुलगा आहे. सणावाराला आमच्या घरी गावभरची केळी येतात. एक सोडून दुसऱ्याला काय म्हणून वाटू. मला कुठे अशा पाच सात सुना यायच्यात म्हणून पुढं मागं वाटायची संधी मिळणार आहे. मनातून असं सारं तिला वाटत होतं. जोडीनं खेळायला वहिनी मिळाली म्हणून अक्कातायीच्या आनंदाला पारावार नव्हता. तारक्का ज्या दिवशी घरी आली, त्या दिवशी दिवस ढळता आईनं तिला केळं खायला दिलं तसं तिनं आईला विचारलं - 'तारक्काला केळं नाही देणार ?'

चिम्मव्वानं तिच्यावर हात उगारीत रागानं म्हटलं, 'एक ठेवून देईन, तारक्का म्हणत्येस ? तुझ्या बरोबरीची का आहे ती ! वहिनी म्हण आणि असं म्हणायला तुला लाज वाटत असेल, तर आक्का म्हण. पुन्हा कधी असं म्हटलेलं ऐकलं तर जीभ हासडीन मी तुझी.'

अक्कातायी गप्प बसली, गाल फुगवून एकीकडे जाऊन बसली. चिम्मव्वानं तारक्कालाही केळं खायला दिले. तारक्का पडवीत गेली. तिच्या पाठोपाठ अक्कातायीही गेली. बाहेर दोघींनी मिळून केळी खाल्ली. नंतर अक्कातायीनं तारक्काला आपली खेळणी दाखवली. खेळायची उर्मी आतून एकसारखी उसळ्या मारीत होती पण विवेकानं तिनं ती दाबली. मी इथं सासरी खेळायला नाही आले हा विचार तिला विवेक शिकवीत होता. तिची आई आणि मामी यांनी दिलेल्या शिकवणीनं, केलेल्या हितोपदेशानं तिला प्रौढ बनविलं होतं. सारी खेळणी दाखवून झाल्यावर अक्कातायीनं तारक्काच्या तोंडाकडं पाहत आतुरतेनं विचारलं-'उद्या आपण दोघी खेळायचं ना ?'

तारक्कानं काही उत्तर दिलं नाही. बाहेरून आत जळण घेऊन जाता जाता चिम्मव्वा म्हणाली,'खेळायला ती काय तुझ्या एवढी लहान आहे होय ? तिला घरात स्वयंपाक वगैरे काही करायचाय की नाही ? उद्या तुझं लग्न झालं की, समजेल मग.' तिचं बोलणं संपतं न संपतं तोच तारक्का स्वयंपाक घरात गेली. तिनं सासूला विनयपूर्वक विचारलं, 'आई, रात्रीच्याला स्वयंपाकाला काय करायचं ?'

'भातासाठी आंधण ठेवलंय. झटकन तीन पाव तांदूळ निवडून घेऊन ये. चुलीवर हात तोंड धुवायसाठी पाणी तापत ठेव. हे आत्ता तुझे मामंजी येतील बघ. स्वयंपाक लौकर व्हायला हवा.' चिमव्वानं तिला बजावलं.

तारक्कानं साऱ्या गोष्टी लक्षपूर्वक ऐकल्या. चटदिशी वरण भात शिजवला. हातपाय धुवायसाठी पाणीही तापवून ठेवलं. तेवढ्यात हूवण्णा रात्रीच्या जेवणासाठी घरी आला. तो बाहेरनं येताच तारक्कानं त्याला हातपाय धुवायला पाणी दिलं. तो हातपाय धुवून येईस्तो तिनं त्याच्यासाठी पाट मांडला, ताट पाणी केलं. आणी पडवीत बसलेल्या चिम्मव्वाला-'आई' म्हणून हांक मारली. चिम्मव्वा तिथूनच म्हणाली 'का गऽ , तूच वाढ की....'

'अग पोरीचा हात शिंक्यापर्यंत कुठं पोहोचतोय ? तूच ये. तिथं बसून काय करतेयस ?' हूवण्णानं तिला हाक मारीत म्हटलं.

'भाकरीचं टोपलं शिंक्यावर आहे होय ?' असं म्हणत चिम्मव्वानं आत येता येता, 'उद्या जैनमंदिरात पूजा आहे ना! सारी सामग्री तयार ठेवायला नको ? म्हणून आपली मूठभर अक्षत निवडायला घेतली होती. मी का रिकामी बसले होती तिथं!' म्हणत तिनं हात धुवून भाकरीचं टोपलं शिंक्यावरून उतरवून हूवण्णाला जेवायला वाढलं.

'तर उद्या पूजा आहे ? नैवद्यासाठी केळ्याचा एक घड घेऊन जा तर मग.' हूवण्णा भाकरीचा तुकडा तोडता तोडता म्हणाला.

तेवढ्यात तारक्कानं सासूचं अर्धवट राहिलेलं काम पुरं करून टाकलं. नंतर घेऊन जाण्यासाठी ती वाती वगैरे वळत बसली.

दुसऱ्या दिवशी दुपारपर्यंत 'बस्ती'त पूजा वगैरे उरकून सासूसून दोघी घरी परतत होत्या. तेवढ्यात मागून कोणी तरी 'चिम्मा' म्हणून हाक मारली. चिम्मव्वानं वळून पाहिलं. 'बस्ती'कडून चांगलव्वा घाईघाईनं येत होती. हातात पूजेचं एक छोटसं तबक होतं. त्यात चांदीची दोन निरांजन होती. चांगलव्वानं जवळ येताच विचारलं, 'चरणामृत घेतलं नाही वाटतं ?

'का बरं ? पूजा केल्यावर चरणामृत घेतल्यावाचून परतेन होय ? लौकर जाऊन पुढं बसल्ये होते. चरणामृत घेतलं अन् निघाले. घरी खूप काम पडलंय. झालंच तर हे ही वाट पाहत असतील.' मग सुनेकडे वळून म्हणाली, 'तू हो पुढे....पुढे जाऊन जेवायला वाढ ह्यांना, ही मी आल्येच पाठोपाठ.'

'का वाढणार नाही. पोरगी हुशार आहे.' चिम्मव्वा म्हणाली, 'अजून अल्लड बाळी आहे. खायचं खेळायचं वय आहे. अजाण आहे अजून!'

थोडं थांबून विषय बदलून म्हातारीनं विचारलं,' आज तुमच्याकडची होती पूजा ?

'अशा विशेष पूजेला उसाचा रस भारी शुभकारक असतो.'

तिला मध्येच अडवीत म्हातारी म्हणाली-'अस्सं!'

'हो ना याच तिथीला श्रीयांस राजानं आदिनाथ स्वामींना उसाचा रस प्यायला दिला होता, म्हणून तर मी माझ्या मामांना निरोप धाडला होता की, कसंही करून एक चरवीभर ताजा रस पाठवून द्या. त्यांच्याकडे गुऱ्हाळ लागलंय ना.'

थोडं थांबून आवती भोवती अंगणात चार पावलं चालून गेल्यावर म्हणाली,'या मूर्खांना कुठच्या या साऱ्या गोष्टी माहीत असायला ? मामांनी हो नाही एका अक्षरानं उत्तर पाठवलं नाही.' मग गालावर बोट टेकवीत म्हणाली,'आता काय करावं बाई, अगदी विचारात पडल्यासारखं झाले. तेवढ्यात तुमचे भाऊ काल मिरजेला गेले होते, त्यांच्या करवी पाचसहा आंबे मागवून घेतले. आंबरसाचा नैवद्य दाखवल्यावाचून मला आंबरस खाता येणंही शक्य नव्हतं.' मग आकाशाकडे हात करीत म्हणाली,'देवाला काय डोळे नाहीत वाटतं ! आज सकाळीच मामांनी उसाचा रस धाडून दिला. अविचल मनानं भक्ती केली तर देव सारं काही तुमच्या पदरात घालतो पावतो.'

चिम्मव्वानं विचारलं,'आंबरस कोणी दिला होता ?'

'देवाच्या नावानं आणलेली फळं मी बाई कशाला ठेऊन घेऊ. त्या आंब्याच्या चांगला लोटीभर रस निघाला. तोच मी नैवेद्य म्हणून देवाला दिला, त्या शिवाय गौड पाटलांनीही नैवेद्यात आंबारस दिला होता.'

तेवढ्यात त्यांच्या घराच्या वाटा फुटल्या. चिम्मव्वा आपल्या घराकडे जाताना म्हणाली-'जा ताई, उन्ह झालंय, अजून जाऊन जेवायचंय तुम्हाला. उन्हाळ्याचे दिवस आहेत, जरा उशीर झाला की घास नाही घशाखाली उतरत. घासागणिक घोट घोट पाणी प्यावं लागतं.'

'काल शुक्रवारचा मलाही उपवास होता,' असं म्हणून चांगलव्वानं आपल्या उपवासाची कथा सांगितली. या सांगण्यामागचा हेतू स्पष्ट होता. अरे,एका दिवसाच्या उपासानं तुम्हा लोकांचे हे हाल, तर माझं काय व्हायला पाहिजे'?

चिम्मव्वा वळून म्हणाली,'किती उपवास करता तुम्ही. मोठी हिम्मत हं ! आठवड्यातनं तुमचे तीनचार दिवस उपवास होतातच होतात.'

'खाऊन-पिऊन काय करायचंय या देहाचं ? आज ना उद्या हा स्त्री देह नष्ट होणारच आहे. हा स्त्री देह मृत्तिकेसमान आहे. आणि आता त्याचा उपयोग तरी काय खाऊन पिऊन ?' असं म्हणत तिनं आपल्या उपवासाचामागचा हेतू स्पष्ट केला. तिच्या घशाला कोरड पडली होती, ओठही सुकले होते. थोडं थांबून घसा साफ करीत विचारलं-'तारा अष्टमी, चतुर्दशीचे उपवास करते का ?'

'तिनं व्रत घेतलंय - आजवर करत आलीय - पण चैत्रात आमच्याच्यानं कसं निभावणार ते ? शेतावर जावं लागतं रात्र अंधारून आल्यावर मग घरी परतणं होतं,

ह्या व्रतात पाणी गाळून प्यावं लागतं, धुतलेले कपडे नेसून जेवावं लागतं. शेतावर माठा - मडक्यातलं पाणी प्यावं लागतं. थंड, गरम - जसं जेवायला मिळेल तसं जेवावं लागतं, येवढ्यासाठी आमच्या घरी त्या साऱ्यांचं व्यवस्थित पालन होणं शक्य नाही' चिम्मव्वाच्या या बोलण्याचा एकूण रंगढंग असा दिसला की जणू ती तारक्काच्या माहेरच्या रीतिरिवाजाची थट्टाखोरी करत्येय. उपहासानं बोलतेय.

ते उमजून चांगलव्वा म्हणाली - 'काहीही असो, तू जिंकलीस हं चिम्मा... आठ दिवसात लग्न उरकून सून घरी घेऊन आलीस! तुम्ही शेतकरी कुणबी मंडळींना नरक चतुर्दशीचं काय एवढं मोठसं?' अगदी अंत:करणापासून म्हणून ... तिला असलं काही व्यक्त करायची मुळीच इच्छा नव्हती - परंतु चिमव्वाच्या आग्रहावरून तिला हे सांगणं भागच पडलं.

चिमव्वा फिरून तिच्यापाशी परत आली आणि काहीशा गर्वानं म्हणाली - 'त्यात अशी काय गोष्ट आहे? मुलगी सदैव आमचीच होती. तिच्या आकांडतांडवानं काय होणार होतं? माझा भाऊ थोडंच तिचं ऐकणार होता?'

'ते बरोबर आहे... पण तिच्याविषयी मनात अढी ठेवून तू पोरीला सतावू मात्र नकोस.'

'अग वेडे, मला काय येवढीही समज नाही होय?' कपाळ आक्रसत पुढे म्हणाली - 'रत्नव्वासारखी मी हलक्या कानाची नाहीए... मी कशाला तिचं बोलणं लक्षात ठेवू! काय फायदा काय त्याचा? माझ्या नात्यातली मी आणली, तेव्हा तिला मी अशी ठेवीन की रत्ना देखील नुसती पाहात राहील. माझ्या सुनेला मी कशाला सतावू!' इतकं सांगून झाल्यावर, 'भारी उशीर झालाय...' असं म्हणत ती तिथून निघून गेली.

रत्नाबाईच्या मनात काय आहे ते चिम्मव्वा ओळखून होती. लग्नाच्या आधीपासूनच ती हे जाणून होती की, 'एकुलती एक मुलगी आहे - तिचं लग्न आपसातच कोणाशी तरी लावून दिलं, तर ते सुखाचं होणार नाही.' असं आपल्या वहिनीच्या मनानं घेतलंय. पण त्या बरोबरच चिम्मव्वाला आतून याची चिंता होती की जर का या मुलीचं नात्याबाहेर दुसऱ्या कोणाशी सोयरीक झाली तर यापुढे आपला माहेराबरोबर कसलाही संबंध उरणार नाही. ह्या व्यतिरिक्त तिच्या मनात एक बलवत्तर इच्छा होती : 'आपल्या भावाला मुलगा वगैरे कोणी नाही - एकुलती एक मुलगीच काय ती आहे. तेव्हा पुढे मागे जेव्हा केव्हा भावाची जमीन - जायदाद वारसांहक्कानं मुलीची होईल तेव्हां ती नाहक दुसऱ्या कोणाच्या घशात का म्हणून जाऊ द्यायची?' ह्या सर्व कारणांमुळेच आपल्या मुलाच्या मनानं अंगापिंडानं तशी जरा थोराड असूनही तिनं तारक्काला सून करून घरी आणली.

महिना भरानं रत्नव्वा आपल्या मुलीला संक्रांतीत सणासाठी म्हणून माहेरपणासाठी आणायला गेली. तेव्हां इकडच्या तिकडच्या गोष्टी बोलून झाल्यावर चिम्मव्वा म्हणाली - 'मुलगी इथं राहिली काय अन् तिथं राहिली काय, सारखंच आहे. चार दिवस तिथं राहील चार दिवस इथं राहील-' मग आवाज बदलून - जरा वेगळाच सूर लावून म्हणाली, 'गावातल्या गावात मुलगी दिलीय म्हणून मनाला येईल तेव्हा तिला न्यायला येत्येस - तसं न्यायला घेऊन जायला काय कोणीही येऊ शकतो म्हणा.... आता ही तू आली आहेस, घेऊन चाललीयस; जर परगावी कुठं मुलगी दिली असतीस तर कसं शक्य झालं असतं हे? मुलगी दूर कुठं परगावी दिली असतीस तर तुमचं सुख दु:ख पाहायला कोण होतं? दुरून दुरून का ते तुमचा सांभाळ करू शकणार होते! आताची गोष्ट जरा वेगळी आहे. आता तूप सांडलं तरी अखेर खिचडीतच, अशातलीच गोष्ट ना?'

रत्नव्वा तिच्या या उद्‌गारांमागचा हेतू उत्तम प्रकारे उमगली अन् पटदिशी हसली. तिच्या हसण्यात केवढा उपहास होता, याची सहज कल्पना येण्यासारखी आहे. त्यावेळी तिच्या मुद्रेवर चिंतेचे सावटही आल्यावाचून राहिले नाही. ह्या भानगडीत पडून ती जर आपल्या पोरीला उद्या छळायला लागली तर कसं होणार? ह्या विचारानं तिच्या काळजाचा थरकाप उडाला. तिला माहीत होतं की आपली शेती-वाडी सारं काही आज ना उद्या मुलीच्याच वाट्याला जाणार आहे - ठरल्यातलीच गोष्ट होती ती - पण त्यांचंही अद्याप तसं काही वय झालेलं नव्हतं. अशा परिस्थितीत आजच ते सारं दुसऱ्याच्या नावानं करून देऊन पुढं हयातभर त्यांच्या कृपेवर अवलंबून राहणं योग्य होईल का?

'आम्ही तरी कुठं बाहेर शोधत होतो? ती जन्माला आल्यापासून... भरमाला द्यायच्या विचारात होतो - पण तुम्ही मंडळीच तर आमच्या मुलाला हे एवढं मिळतंय आणि तेवढं मिळतंय म्हणून नाचत होता. ते पाहून आम्ही मागे हटत होतो इतकंच?' गालावर हात ठेवून क्षणभर थबकून ती पुढं म्हणाली - 'आम्ही तर गरीब आहोत, बाई! सारी दोन नांगराची जमीन तर आहे आमच्यापाशी - तीही दुसऱ्याच्या नावानं करून दिली तर आम्ही उद्या कोणाच्या दाराशी आसऱ्याला जायचं? तसा प्रसंग ओढवला तर कोणी घोटभर पाणी देखील देणार नाही प्यायला! गूळ असेल तिकडेच मुंगळे धावणार!

हे बोलणं ऐकून चिम्मव्वा हुप्प करून बसली. तरीही ती म्हणाली, 'कशी ग वेडी तू - आता पासून म्हातारपणची चिंता करत्येस ती! मुलगी गावातल्या गावात आहे. वाघासारखा जावई मिळालाय - त्या शिवाय तुला तुझं माहेर आहे...'

'जो तो आपआपली काळजी करतो. खरकट्या हातानं कोणी कावळा हाकलत

नसतो... (हातातला घास सांडायची भीती असते) आक्का, माहेरी भाऊ आपला असला तरी भावजय थोडीच आपली असते? हातात दमडा असेल तर सारे आपले असतात, नाही तर कोणी ढुंकूनदेखील पाहणार नाहीत.'

बोलणं इथंच संपलं, पण विषय काही तेवढ्यावर संपला नाही. संध्याकाळी हूवण्णा जसा घरी आला आणि तंबाकू पीत पडवीत बसला तशी साहजिकच चिम्मव्वानं गोष्ट काढली. म्हणाली,-

'मुलीला घेऊन जायला रत्ना आली होती.'

'हो, संध्याकाळी शेतावर जाताना मल्लु भेटला होता. तिथं गवत कडब्याच्या चोऱ्या होतात म्हणून रात्रीच्याला राखणीसाठी रहावं लागतं म्हणत होता. म्हणूनच ती स्वत: आली असणार. कोणीही येवो त्यात काय असं?' तिथंच पडलेल्या झाडूच्या काड्या तोडून चिलमीत घालीत हूवण्णा म्हणाला.

'मी हेच म्हणत होत्ये, परंतु रत्नाला ते आवडलं नाही.'

'काय? तू काय म्हणत्येस ते नीटसं उमगलं नाही मला-' चिलमीत तंबाकू भरता भरता हूवण्णानं विचारलं.

'काही नाही, रत्नाला म्हणाले होत्ये: गावातल्या गावात मुलगी दिली आहेस, हवं तेव्हा तिला बोलवायला येऊ शकतेस. सुख दु:खात एकमेकांचं पाहावंच लागतं. उद्या म्हातारपणी हीच मुलगी पोटाला घालील.' असं म्हणत चिम्मव्वानं आतून निखारा आणला.

'हे असंच बोलता बोलता... त्यांना मुलगा बिलगा तर नाहीए कोणी, जेव्हा केव्हा होणार असेल तेव्हा होवो, पण सारं मुलीचंच होणार आहे.'

तिला मध्येच आडवीत आणि तोंडातनं धूर सोडीत हूवण्णानं तिला तिथल्या तिथं तडकावीत म्हटलं, 'काय वेडपट आहे ही...? अजूनही ते नवरा-बायको चांगले तगडे आहेत. तरूण आहेत. त्यांची शेतीवाडी, मालमत्ता मुलीकडे कशाला जाईल? त्याना अजून पोरंबाळं होणार नाहीत? शेतीवाडी त्यांची आहे - त्यानी हवं ते तिचं करावं... तिच्यावर तुझा डोळा कां? कशासाठी?'

त्या दिवशी रत्ना मोठ्या आतुरतेनं नवरा घरी परत येण्याची वाट पाहात होती. तो कधी परत येतोय आणि कधी आपण त्याला तारक्काच्या सासरी घडलेलं सारं सांगतोय असं तिला होऊन गेलं होतं. मुलीला बोलवायला गेलो असता तिथं जे बोलणं झालं, ते नवऱ्याला कशा पध्दतीनं सांगावं याचा तिनं कितीदा तरी विचार केला होता. इकडे मल्लु शेतावरून जो परत आला तो देखील काही विशेष सांगायला उतावळासा होऊनच. घरादारात पाऊल टाकताच तो रागेजून म्हणाला, 'आज चार दिवसापासून सांगतोय की गवत कडबा जातोय! पाहतो तो चौगुलेचा भीमप्पा साफ

करतोय तो ! एवढा थेरडा झालाय पण अशा चोऱ्यामाऱ्या करायची लाज नाही त्याला.' हातपाय धुवायला पाणी देता देता त्या तशा विमनस्क अवस्थेतही रत्नानं आश्चर्यानं विचारलं, 'कोणं चौगुल्यांचा म्हातारा भीमप्पा ?'

'मेव्हणा म्हणून हूवण्णाच्या भिडेखातर सोडून दिलं. दुसरा कोणी असता तर चोरल्या कडब्यासकट सरळ चावडीवरच घेऊन गेलो असतो.' असं म्हणत आपण भीमप्पाची काय म्हणून गय केली ते त्यानं स्पष्ट केलं.

रत्नव्वा शांतपणे म्हणाली, 'चावडीवर कशाला न्यायचं? तो मोठा कपटी आहे - चुलीत का जाईना ! कुळकर्ण्यांचं आणि त्याचं बरंच गूळपीठ आहे.'

'तो काय करील ? मी कोणाच्या सुतळीच्या तोड्यालाही निमताळा नाही; कोणाकडे कधी हात पसरायलाही जात नाही, म्हणून मला कोणाचंही भय नाही. पण काय करणार गावात मुलगी दिली आहे-आणि तेही कोणा परक्याला नव्हे, संबंधीच आहेत.' असं म्हणत तो पडवीत जाऊन बसणार तोच-

'बसताय काय, काळोख होतोय-चला उठा, जेवायला चला' म्हणत रत्नव्वानं त्याला जेवायला उठवलं. मल्लनं कपडे बदलून जेवायला बसता बसता मुलीला पाहून म्हटलं, 'कधी आली तारा बाळ ? मी येऊ नाही शकलो, सायंकाळी शेतावरही जायचं होतं ना.'

त्याच्या पृच्छेचं तारानं काही उत्तर द्यायच्या आतच रत्ना मुलीला बोलवायला गेल्यापासून जे जे काही घडलं ते सारं विस्तारपूर्वक सांगायला लागली. तसं मल्ल म्हणाला, 'तुम्हा लोकांचा या गोष्टीशी संबंध काय ? आज या गोष्टी बायका बायकातच आहेत, उद्या न जाणो तुम्ही लोकांनी पुरूषांच्या तोंडाला काळोखी फासली नाही म्हणजे मिळवलं ! एकदा का काळीज दुभंगलं अन् मनं विटली की संपलंच की सारं !'

मध्येच रत्नव्वानं रागानं मानेला हिसडा देत - 'सारं त्याच्याच नावानं करून द्या-माझं काय जातंय !' म्हणत हातातलं भाकरीचं टोपलं जमिनीवर आदळलं.

'मी कशाला त्याना द्यायला जाऊ ? ते काय आमच्या शेतीवाडीच्या भरवशावर बसलेत होय ? त्यांच्या जवळ रगाड आहे. मी एवढा खर्च करून मुलीचं लग्न केलंय. आपली शेतीवाडी देऊन जावयाला सावकार बनविण्यासाठी काही मुलगी दिली नाहीए.'

रत्नव्वा गप्प होती. तिच्या चेहऱ्यावर क्रोध होता. मल्ल पुढं म्हणाला, 'माझी मुलगी तिथं फार मोठं सुख भोगतेय म्हणून का त्यांच्या नांवानं करून देऊ ? उद्या तिची ऋतुशांती होईल-फल शोभन होईल. तिला चार पाच मुलं झाली, म्हणजे मग हवं तर त्यातल्या एखाद्याला आपल्याकडे आणून सांभाळू- कधी का होईना सारं त्यालाच मिळेल. आज आताच उगाच या गोष्टीची फुकटची चर्चा कशाला ? काय की एवढ्यासाठी - 'भाचीला सून करून घेऊन जाईन... भाचीला सून करून घेऊन

जाईन म्हणून धोशा लावल्यागत सारखी घोकत होती ?'

या बोलण्यानं कोणाच्याही मनाला समाधान लागलं नाही. रत्नाचं मन तर अधिकच उद्विग्न होऊन गेलं. म्हणून तिनं मनाशी विचार केला. काही का असेना, अखेर ते बहिण-भाऊ आहेत, मीच परकी आहे. मी कशाला उगीच मध्ये तोंड घालून वाईटपणा घेऊ ? उद्या माझ्यावर कोसळल्यावर मला एकटीलाच भोगावं लागणार आहे, यांचं काय ? अशा विचारांचं वादळ तिच्या मनात घोंगवायला लागलं. त्याच वेळी तारक्कानं, 'आई चल, आपणही बाबांबरोबर दोन घास जेवून घेऊ या -' असं म्हणताच वातावरणात शांतता पसरली.

आपल्याला मुलगा होईल अशी रत्नाबाईला अजूनही आशा वाटत होती. तिला असं वाटत होतं की, आपल्या नवऱ्याचीही मनोमन अशी खात्री आहे की आज ना उद्या आपल्या जीवनाच्या नंदनवनात मुलाचं मुखकमल उमलेलच उमलेल! पण नवऱ्याचं बोलणं ऐकल्यावर तिला वाटलं की या बाबतीत आपला नवरा पुरता निराश झालेला दिसतोय आणि म्हणून मग तिचं मन भरती ओहटीच्या कचाट्यात सापडलेल्या नावे प्रमाणे तडाखे खायला लागलं.

मल्लुची मानसिक स्थिती अशी नव्हती. तो सरळ साधा माणूस होता. रात्रंदिवस तो आपल्या शेतीवाडीत गढलेला असायचा. तो कृषी योगी होता. त्याचा जीवनविषयक दृष्टिकोन एवढाच होता की, 'देव दयेनं मुलीला चांगलं ठिकाण मिळालं आहे. माझ्या नशिबात तर मुलगा नाही. ती लौकर मोठी होऊन एक आई व्हावी. खूप आहे एवढं हे. नातवाला आणून वाढवता येईल.' एवढ्याचसाठी आपल्या मुलीची तारूण्याच्या दिशेनं होणारी वाटचाल पाहून तो मनोमन सुखावला होता. खूप खुषीत होता. तो देवाला नेहमी प्रार्थना करायची की, 'माझी मुलगी लौकर ऋतुमती होऊ दे- पुत्रवती होऊ दे!' तो याच शुभघडीची वाट पाहात होता. तारक्का जेव्हा जेव्हा त्याच्या पुढ्यात सलज्ज मुद्रेनं मान खाली घालून उभी राहायची तेव्हा तेव्हा त्याला वाटायचं की आता ती शुभघटिका फार दूर नाहीए.

त्याची जेव्हा केव्हा बहीण चिम्मव्वाशी गाठ भेट होई तेव्हां तो हसत हसत तिला हे सुनावल्या वाचून राहात नसे की, 'बघ आमची तारा अंगापिंडानं भरत चाललीय - मोठी होत्येय - त्या जोडीनं मुलानंही वाढायला हवं. त्याला नुसतं शेतीच्या कामाला जुंपू नकोस. रोज दोनदा दूध वगैरे प्यायला देत जा. भरमा लौकर तगडा व्हायला हवा. जवान व्हायला हवा. उद्या मुलगी मुलापेक्षा थोराड आणि उफाड्याची झाली असं व्हायला नको.'

पाच सहा महिने असेच सरले. एक दिवस चिम्मव्वा आपल्या नवऱ्याला म्हणाली, 'सण्वार सारे आटोपले, आता तरी ताराला घरी घेऊन या. आता मी किती दिवस

[illegible] अशाच उपसत राहू? मला वाटलं की पोरगी आली की कामाला [illegible]. चैत्रातही तुम्ही तिला घेऊन आला नाहीत...' हूवण्णालाही वाटलं की [illegible] जाऊन सुनेला घेऊन यायला हवं. त्याच दिवशी, दिवस ढळता ढळता तो [illegible] घरी 'दोन तीन दिवसात चांगलासा मुहूर्त पाहून मुलीला पाठवा' असं [illegible] म्हणून गेला. परंतु तो जेव्हा तिथं पोहचला तेव्हा एक घटना घडली होती. तारक्का [illegible]कटीच एका कोपऱ्यात बसली होती. तिचं तोंड उतरलेलं होतं आणि घरात कोणीही नव्हतं. हूवण्णानं विचारलं, 'घरात कोणी नाहीए का तारा ?'

[illegible] सासरे येताच नेहमी प्रमाणं त्यांना काही बसायला टाकायला लगबगीनं पुढं गेली नाही. बसल्या जागेवरूनच म्हणाली, 'नाही, ते लोक शेतावर गेलेत. काय काम होतं?' लाजेनं तोंड काही वर काढू शकली नाही. हूवण्णा तेवढ्या वरूनच सारं काही समजून चुकला.

'काही नाही'... असं म्हणून तो घरी परतला आणि बायकोला म्हणाला, 'पोरगी 'बाहेर'ची झालेलीशी वाटतं. त्याच्या बोलण्यात उत्साह होता.

'कधीची? मला तर काही पत्ता नाही. पत्ता असता तर बोलवायला गेलोच असतो कशाला'

'रत्नव्वा आणि बाकी सारे शेतावर गेल्यावर झाली असावीशी वाटतं. घरात दुसरं तिसरं कोणीच नव्हतं. पोरगी बाजूला एका कोपऱ्यात गुपचूप तोंड एवढंसं करून खिन्नशी बसलेली होती - म्हणून म्हणतोय.'

'तुम्हीही कशाचा काहीच अर्थ काढता. एवढ्यातच ती कशी बाहेरची होईल !'

'अगं, तिच्या बसण्या बोलण्याच्या पध्दतीवरून मला उमजणार नाही की काय ?

'असेलही म्हणा तसं !' मग थोडं थांबून म्हणाली, 'चला झालं हे छानच झालं म्हणा ! अगर चार दिवसांनी आपल्या घरी आल्यावर बाहेरची होती, तर तिला न्हाणवली म्हणून बसवायचे सारे सोपस्कार आमच्याच गळ्यात पडले असते. छान झालं, ती तिथंच आहे.'

'ते बिचारे काय बसविणार, त्यांचाही हात अडचणीतच आहे. लग्नाला अद्याप तीन वर्षही पूर्ण झाली नाहीत-' जांभई देत हूवण्णा म्हणाला.

चिम्मव्वानं एकदम तिखटपणे म्हटलं, 'हात अडचणीत असला म्हणून काय झालं ! या गोष्टी काय वारंवार करायच्या असतात ? या दिवसाची तर ते आज फार दिवसापासून वाट पाहत होते.'

हूवण्णानं विषय पुढं वाढविला नाही. मनोमन विचार केला, 'अरे बायकांच्या जातीला एकूण अक्कल कमीच असते !

संध्याकाळी रत्नव्वा शेतावरून परत आली. ती येईपर्यंत पोरगी महिन्याची होऊन

बाहेरची बसली होती. आल्या आल्याच रत्नव्वानं डोक्यावरची भाकर तुकड्याची टोपली उतरवून अंग धुतलं अन् चुलीला पेटार घातलं. झटपट जाऊन शेजार पाजारच्या चारपाच सवाष्णींना तारक्काला नहायला घालायसाठी बोलावून घेऊन आली. आतनं हळकुंडं काढून आणून कुटून वाटून वाटीभर उटणं तयार केलं. तेलाच्या बाटलीतनं एका वाटीत तेल भरून ठेवलं. तेवढ्यात आळीतल्या आयाबाया गोळा झाल्या. पाच सवाष्णींनी मिळून तारक्काला तेल लावून न्हाऊ घातलं-हळद लावली. तिला चौरंगावर बसवून न्हावुलीची गाणी म्हटली. त्या दिवशी घरात स्वयंपाक शिजवण्याची पध्दत नसल्यानं म्हाताऱ्या चांगलव्वानं शेवयाची खीर आणि भात रांधून आपल्या भाचीबरोबर धाडून दिली. इतर पाच सहा घरच्या मंडळींनीही जेवणाची ताटं भरभरून पाठविली. तो पर्यंत रात्रीचे तीन वाजले. रत्नव्वा म्हणाली, 'आज हे शेतावरच वस्तीला आहेत. आता निरोप तरी कोणा बरोबर धाडू या अशा अवेळी, काळोखही मिट्ट आहे. सकाळी हे घरी येताच यांच्या बरोबर चौगुल्यांकडे मिठाई धाडून देईन'.

तारा हलकेच म्हणाली, 'काल दिवस ढळता ढळता मामंजी आले होते-'

तेव्हा तर मग त्यांना ही गोष्ट समजली असणारच - असा मनाशी विचार करून अंथरूण पसरून रत्ना झोपली. त्या दिवशी बराच वेळ तिला झोप आली नाही. सारखा विचार करीत होती. 'पोरीला न्हाण आलं आहे. तिला न्हाणवली म्हणून बसवलं नाही तर लोक काय म्हणतील ? एकुलती एक लेक आहे. हल्लीच तर पोरीचं लग्न लावून दिलंय - हाती दमडा उरलेला नाही. ते लोक ही सारी वस्तुस्थिती जाणूनही थोडेच खूष होणार आहेत ? चिम्मी तर काय नेहमीच ढगात वावरत असते - स्वत:ला फार कोणी मोठी समजत्येय !' बराच विचार कर करूनही तिच्या मनाचा एक निर्णय होईना. अखेर तिनं मनाची समजूत घातली. परस्पर काय करायचं ते! हा विचार केला आणि ती स्वस्थपणे निद्रावश झाली.

तिकडे चिम्मव्वाने कोणी ना कोणी तरी सांगावा घेऊन येईल या अपेक्षेनं बराच वेळ वाट पाहत राहिली. पण निरोप सांगायला कोणीही आलं नाही अणि त्यापायी रात्रभर तिच्या डोळ्याला स्वस्थ डोळा लागला नाही. धड उजाडायच्या आतच उठून ती भावाच्या घरी गेली आणि विचारायला लागली, 'काल दुपारच्याला पोरीला न्हाण आलं. कोणी येऊन आम्हाला सांगायला नको होतं का हे ?'

'आम्ही तरी काय करणार वन्सं ? चैत्राचे दिवस आहेत. रोजच्या सारखं शेतावर गेलो होतो, दुपारी मुलीला पाळी आली. तिचे मामंजी येऊन पाहून गेले होते. आम्ही वाटेवर शेतातच काम करीत होतो. त्यांनी येऊन आम्हाला सांगायचं नव्हतं का ?' त्याचंच घोंगडं त्याच्या गळ्यात अडकवीत रत्नव्वा म्हणाली.

चिम्मव्वा जळफळली - म्हणाली, 'हुषार आहात हं मोठे सारे !'

तिला पुढे आणखी तोंड वाजवायची संधी न देताच रत्नव्वा म्हणाली, 'हा आत्ताच शेतावर निरोप धाडलाय, हेही कालपासून तिथंच आहेत, येतीलच आत्ता - आले की, भटजीना बोलावून मिठाई धाडू.'

'कां कशासाठी मिठाई धाडणार ? गावात सर्वांना हे समजलं नाही होय ?

थोडं थबकून ताराकडे टक लावून निरखून पाहात म्हणाली, 'पोरीला का असं बसवून ठेवलंयस ? चार जणींना बोलावून तिला तेलहळद लावून न्हायला घालता येत नव्हतं का ? न्हाण आल्यासारखी दिसतेय तरी का पोरगी ?'

'काल रात्रीच तिला नहायला घातलं. आम्हाला काय रीतभात माहीत नाही होय ? माझी लेक पहिल्यांदा महिन्याची झाली याचा मला आनंद होणार नाही होय ? काय माझ्या पदरी दहा बारा पोरं आहेत म्हणून मी आता कसं करू गऽ बाई म्हणून चिंता करू ?' जरा रागानंच रत्नव्वा म्हणाली.

'तर मग माझ्या पासून काय म्हणून ते दडवून ठेवलं ? वेळीच कळवलंत कां नाही ?' तिरस्कार दर्शवीत चिम्मव्वा म्हणाली.

'दाबून दडपून ठेवायला काय ते भांड्याचं तोंड थोडंच आहे ? गावातल्या गावात कोठली गोष्ट छपून थोडीच रहात असते ? समजा आज दडवून ठेवलं तरी उद्या तिला बाजूला बसवावंच लागेल ना ?'

'एवढ्याचसाठी चांगलासा मुहूर्त पाहून न्हाणवलीला मखरात बसवा, झालंच तर ताशे वाजंत्र्यांनाही बोलवा.'

'बसवायचं न बसवायचं माझ्या का हातात आहे, वन्स ? हे आल्यावरच नक्की ठरेल काय करायचं ते-!'

'यात एवढं विचार करण्यासारखं काय आहे ? ज्या गोष्टी करणं भाग असतं त्या कराव्याच लागतात- त्या टाळता थोड्याच येतात ? आमच्या घरी तिला न्हाण येतं तर आम्ही बसविली नसती कां ?' न राहवून चिम्मव्वा वरकरणी तोंडदेखली म्हणाली.

तिचं बोलणं तिच्याच गळ्यात अडकवीत रत्नव्वा म्हणाली, 'ती कुठेही झाली म्हणून काय झालं - दोन्ही घरं तर एकच आहेत ना ! तिथं नेऊन बसवा - आजकाल आम्ही ओढघस्तीत आहोत.'

चिम्मव्वा चिडून म्हणाली, 'जर तुम्हा लोकांच्या हातून होत नसेल तर सोडा, आम्ही बसवू. जावयाला काय देणार ?'

'देणं घेणं माझ्या हातात का आहे, वन्सं ? तुम्ही दोघं पाठीला पाठ लावून आलेले सख्खे बहिण भाऊ आहात. हे आले की यांचा हात पकडून विचारून घ्या - जावयाचा काय देणार म्हणून ?'

'जर तुझ्या हातात काही नाहीए, तर कशाला उगाच तोंड घेऊन बोलत्येस ?'

असं बडबडत रागारागानं चिम्मव्वा तिथून निघून गेली.

'[illegible] असं रागवता कशाला?... काय करायला हवं ते सांगा. जरा धीरानं घ्या; माझ्यावर रागावून उपयोग काय? मी पडले बाई माणूस.' सौम्य समजावणीच्या स्वरात बोलत बोलत [illegible] तिच्या पाठोपाठ दारापर्यंत गेली — पण चिम्मव्वानं मागं वळून देखील मागं पाहिलं नाही.

# 6

'बोहल्या सकट सारी तयारी झाली ?' असं विचारीत सुंदराबाईनं घरात प्रवेश करीत डोक्यावरची खाद्यपदार्थाची टोपली उतरवली.

आतनं घाईघाईनं बाहेर येत रत्नव्वानं टोपलीला हात लावीत 'ये ये सुंदरी; काय एकटीच आलीस ? रामण्णा नाही आला ? मुलगाही दिसत नाही...?' जरा उतरल्या चेहऱ्यानं एका दमात विचारलं. थोडं थांबून तिनं पुन्हा विचारलं, 'पाणी आणू प्यायला ?'

'नको आता-तहान नाहीए. मुलाच्या परीक्षेचा निकाल लागणार होता आज; म्हणून नाही आला तो.'

रत्नव्वा मध्येच म्हणाली, 'उद्या संध्याकाळी ओटी भरायचीय, ही गोष्ट मी आधीच निरोप पाठवून कळविली होती. दादा तसा लग्नालाही आला नव्हता. आताही आला नाही.' आणि साडीच्या शेवानं डोळे टिपीत म्हणाली, 'तो आम्हा गरिबांच्या घरी कशाला येईल, बाई !'

'नाही गं, ते उद्या सकाळीच येतील...: मुलाला सायकलवर पुढं बसवून येणार आहेत. जर आज आम्ही दोघंही येतो तर घर आणि दुकान दोन्ही कोणी सांभाळलं असतं ?' सुंदरव्वानं तिचं समाधान करीत म्हटलं.

'आता गाडी असतानाही आला नाही. समजत नाही उद्या मागाहून कसा येणार आहे ते! त्याला तर सदान् कदा घर आणि दुकान याचीच चिंता लागून राहिलेली. आमची काय पर्वा !' असं म्हणत रत्नव्वानं आपली नाराजी फिरून व्यक्त केली.

रामण्णा रत्नव्वाचा थोरला भाऊ होता, थोडा शिकला सवरलेलाही होता. ऐनापूर मध्ये त्याचं एक छोटंस किराणा मालाचं दुकान होतं. झालंच तर त्या जोडीला वाडवडलांकडून मिळालेली थोडी जमीनही होती.

शेतीतनं मिळणारं धान्यधुन्य आणि दुकानची कमाई यांच्या बळावर घर प्रपंचाचं मोठ्या मजेत भागत होतं. रत्नव्वा त्याची एकुलती एक बहीण होती. भाचीच्या लग्नालाही तो येऊ शकला नव्हता. फक्त बायको - मुलालाच काय ते त्यानं धाडलं होतं. यावेळी यायचा विचार होता. त्याला आणायला गेलेल्या गाडीनं त्यानं आपली पत्नी सुंदराबाईला धाडून दिलं होतं. हे सारं बोलणं त्या वेळचं आहे.

'नुसतं तोंड पाहायला तो उद्या सकाळी येणार आहे होय ? आता मी काय बोलू...?'

तेवढ्यात आतून तारक्का आली. म्हणाली, 'अनंत नाही आला ?'

सुंदराबाईनं वळून तिच्याकडं पाहिल. तिनं तारक्काला अडीच वर्षापूर्वी तिच्या लग्नातच काय ते पाहिलं होतं. मध्यंतरी गाठभेट अशी नव्हतीच. तेव्हाची ती मुग्ध बालिका आता राहिलेली नव्हती. तिच्या अंगप्रत्यंगातून आता नवतारूण्य डोकावू पाहात होतं. पूर्वी तिची अंगकांती लिंबासारखी तुकतुकीत होती. आता हळद लावल्यानं ती अधिकच रसरशीत झाली होती... कांतीमान झाली होती. स्त्री असूनही सुंदरव्वानं क्षणभर तिच्याकडे निरखून पाहिलं. म्हणाली, 'पोरी, केवढी ही हळद भरवलीयस ग अंगाला ? बाहेर जायला यायला कशी अगदी हलक्या हातानं लावायला हवी होती ?' मग थोडं थांबून तिची जरा थट्टा करीत हसत हसत म्हणाली, 'तुम्ही दोघा नवराबायकोनं मिळून रत्नव्वाला लुटायचं ठरवलंय की काय ?'

तसं रत्ना म्हणाली, 'आता तू आणखी काही बोलून विकतचं भांडण घेऊ नकोस, बाई; आधीच मी एक गोष्ट बोलून फुकाची वाईट ठरलेय !' तिच्या गळ्याला कोरड पडली होती.

'कां काय झालं ?' सुंदरानं कुतुहलानं विचारलं.

'काही नाही, मी म्हटलं लग्न आमच्या घरी लागलं - आता तुम्ही मंडळी ऋतुशांती तुमच्या घरी साजरी करा. जावयाला जे काही द्यायचंय - घ्यायचंय ते आम्ही द्यायघ्यायसाठी घेऊन येऊ. आता आमच्या गळ्याला आणखी फास लावू नका.'

मध्येच काहीशा उपरोधिक स्वरात सुंदरव्वा हात ओवाळीत म्हणाली, 'तुम्ही नवरा बायको नेहमी हे असंच बोलता - पण तसं मनातनं तर कधी एकदा मुलीला पाळी येतेय - आणि कधी एकदा तिला आपण न्हाणवली म्हणून बसवतोय याचीच तर वाट पाहात होता !'

'बसवायची इच्छा होती तर बसवलं नाही का ? आम्ही आपलं मुकाट्यानं होईल तो सारा खर्च सोसतोच आहोत - पण त्यांनी काही आपला हट्ट सोडला नाही.'

'पण यात हट्ट करण्यासारखं आहेच काय ?' मग थोडं थांबून म्हणाली, 'कुठेही का बसवेनात. जावई आणि मुलीला जे काही द्यायचंय घ्यायचंय, ते तर द्यावेच लागणार आहे. त्यात काय विशेष ? त्यावेळी उभ्या गावाला जेवण घातलं होतं...' मग नणंदेच्या मनात काय आहे हे तरी पहावं अशा विचारानं तिनं सहज आपला एक खडा टाकून पाहात म्हटलं, 'काहीही असो लेकीला अन् जावयालाच तर मिळणार आहे सारं अखेर !'

'मी काय म्हटलं ? लेकीसाठी हे करणं नव्हतं ?' मग ताराकडे पाहून म्हणाली, 'काय बाळ तारा ?'

रत्नव्वा मनातल्या मनात म्हणाली, 'सारे असंच म्हणतात. हिच्या नवऱ्यानं आमच्यासाठी काय केलंय ?' स्वत:च्या संतापाला प्रयासानं आवर घालीत म्हणाली,

'आम्ही येवढ्याचसाठी म्हणत होतो की बुवा एवढा चैत्र हातात चार पैसे आले की मग करावं, या विचारानं आम्ही पुढं ढकलू पाहात होतो-' काही बोलायचं म्हणूनच ती हे बोलली - मनापासून मात्र तिला काही बोलावसं वाटत नव्हतं. त्याबरोबरच तिला हे ऐकवल्यावाचून काही ती राहिली नाही. म्हणाली, 'घ्यायसाठी प्रत्येकाचा हात पुढे असतो. एक साडी दिली तर दोन मागतात, पण आम्हाला कोण काय देतो ?'

सुंदरव्वाचं तोंड जरा काळवंडलं. तरीही म्हणाली, 'ज्याच्या नशिबात जेवढं आहे, तेवढं तो घेतो. हिच्या भाग्यात आहे, तर हिच्यासाठी करा.' नंतर म्हणाली, 'आपल्या भाग्यात नव्हतं' मग जरा विषय बदलीत म्हणाली, 'पांढरं फटफटायच्या आधी खायचं हे सारं करून बांधून घेतलं होतं, बराच वेळ झालाय, जरा हे सोडायला हवं म्हणजे हवा तरी लागेल....'

'सोडायला यात आहे तरी काय ? घरात तर नुसता गोंधळ घातलाय जसा. स्वयंपाक घरात काम करणाऱ्या नोकरांना देऊन टाक.'

'काय मनाला येईल ते करा...' म्हणत तिथंच पसरलेल्या कांबळ्यावर 'आई गं' म्हणत सुंदरानं अंग टाकलं.

'आई गंऽ करायला काय झालं ? काही गडबड वगैरे ? दिवस बिवस गेलेत-किती ?' तिच्याकडे निरखून पाहत रत्नव्वानं विचारलं.

सुंदराबाईनं जरासं लाजून तिचं बोलणं ऐकून घेत म्हटलं, 'काही नाही, असाच गर्भ राहतो, कधी कधी, दोन दोन महिने.'

'या वेळी सारं व्यवस्थित होईल ........ पूर्ण दिवस भरतील. पाच सहा वर्ष झाली ती मुलगी गेल्याला. होऊन न होऊन सारखीच !' असं म्हणत ती आत गेली आणि काहीसं आठवून पुन्हा बाहेर येत 'दुपारच्या चहाची सवय आहे तुला. आज चहा मिळाला नसणार नं ?' म्हणत आत गेली आणि आत काम करणाऱ्या एका नात्यातल्या मुलीला म्हणाली, 'एक दोन कप चहा कर ग पोरी.'

'नाही, असं काही नाही. वाटेत सुरूगुप्पी हॉटेलात बसय्यानं मी नको नको म्हणत असतांनाही एक कप चहा प्यायला दिला होता मला.' पण तिचं मन आणखी एक कप चहा प्यायला आसुसलं होतं. म्हणून थोडं थांबून म्हणाली, 'हॉटेल मधला चहा काय चहा म्हणायचा, नुसतं गरम पाणी !

तेवढ्यात आतून हळदीची वाटी घेऊन एक मुलगी आली आणि पलंगावर बसलेल्या तारक्काचा हात हातात घेऊन त्याला हळद माखीत म्हणाली, 'तुझ्या मामीकडून तर हळद लावून घे.'

आतून रत्नव्वा म्हणाली, 'ह्या एवढ्या दशम्या पंचम्या घेऊन कशाला आलीस-आंच

यायचं होतंस. एवढं सारं करून आणायची काही गरज होती का ? मग थोडं थांबून, 'तांदळाचं पीठही वेगळं आणलंस ?'

'हे ही तिथूनच करून आणायचा विचार होता म्हणून तांदूळ निवडून साफ करून दळून आणले. पण हे म्हणाले, हे इतकं सारं तू इथनंच कशाला करून घेऊन जात्येस ? तिथं चार सहा माणसं आहेत करणारी. तू हे असंच घेऊन जा बरोबर. काय करायचं असेल ते तिथं करून घ्या. इथंही तर करणं होतंच म्हणून आले झालं बरोबर घेऊन.' म्हणत तांदळाचं पीठ घेऊन यायचं कारण तिनं सांगितलं.

संध्याकाळ होता होता घरी येणाऱ्यांची नुसती रीघ लागली. कोण जेवलंय आणि कोण उपाशी आहे याचा पत्ताच लागत नव्हता. तारक्काचा ओटी भरण्याचा विधी उद्याच साजरा व्हायचा होता. म्हणून गावातल्या ज्यांनी कोणी तारक्कासाठी अद्याप फराळा आरळाचं धाडलेलं नव्हतं, ते आज आता धाडीत होते. मल्ल गावात सर्वांचा आवडता होता. गावात कोणाच्याही का घरी लग्न असेना, मल्ल आपल्या शक्यतेनुसार आहेर धाडल्या वाचून राहत नसे. म्हणून ह्या पाचसहा दिवसांपासून पीठ म्हणा, धान्य म्हणा वा फराळा आराळाच्या खाद्यपदार्थांच्या रूपानं म्हणा लोक एकसारखे त्याच्या घरी भेटी धाडीत होते.त्याला माहीत होतं की उद्या जेव्हा ओटी भरायचा विधी होईल, तेव्हा गावातले सारे लोक फळं,कपडे वगैरे भेटीदाखल आणल्या दिल्यावाचून राहणार नाहीत. येवढ्यासाठी दुसऱ्या दिवशी साऱ्या गावाला जेवण घालणं आवश्यक होतं. ह्या साऱ्यापायी खर्च आपल्या आवाक्याबाहेर जाईल या जाणीवेनं फलशोभनाचा (गर्भदानाचा) हा सारा सोहळा आपल्या घरी साजरा होऊ नये, अशी मल्लची इच्छा होती. यजमानाच्या मनात असा विचार उभा राहिला,तर इतरांना त्याची कसली काळजी पर्वा ? अशा प्रसंगी अगदी चांगल्या पोक्त प्रौढ वडीलधाऱ्यानाही आतून वाटत असतं की, इथं चांगला दोन दिवस ठिय्या ठोकून, खाऊन पिऊन आरामात आपली जबाबदारी डोक्यावरनं उतरवावी; मुलांना चांगलंचुंगलं गोडधोड खायची इच्छा असते, आणि बायकांना नित्यनूतन वस्त्र प्रावरणं लेवून मिरवण्याची. अशा प्रकारे साऱ्या घराच्या आनंदाला पारावार नव्हता.

पुसट अंधार पसरत चालला होता. रत्नव्वा अजूनही गल्लीतली जी कोणी मंडळी जेवायला आलेली नव्हती त्यांना बोल बोलावून जेवायला घालण्यात गढलेली होती. बाहेर वाजंत्र्यांना जेवण धाडण्याचं कामही तिच्याकडेच होतं. तेवढ्यात फलशोभनाची गाणी गाणाऱ्या पाच सहा बायका येऊन ठेपल्या. त्यांनाही त्यांनी वरकरणी दाखविण्यापुरतं कितीही नको नको म्हटलं तरी तिनं आग्रहानं जेवायला घातलं. हे चाललं असतानाच बाहेर काम करीत असलेल्या बसप्पाला व्याही मंडळींना गाणी ऐकण्यासाठी बोलावून आणण्यासाठी पिटाळलं. ह्या गडबडीतच तवनप्पा गुरूजींना आपली कामं उरकून घेण्याची

[illegible]

[illegible] अोंडं थांब [illegible] करून [illegible] त्याचं सगळं आहे... [illegible] कधी का होईना. पण शेवटी [illegible] सुनेसाठी अशी तशी साडी कशाला आणील [illegible]

‘हक्कानुसार द्यायघ्यायला हवं. त्याला कोण ना म्हणतेय.’ चिम्मव्वा पुढं होत म्हणाली.

‘यात हक्काचा प्रश्न येतोच कुठं ? एकाला एक भांडं हे लागायचंच. एकमेकांशी मिळतं जु[illegible] वागलं पाहिजे.’ नंतर ताराकडे हात दर्शवित म्हणाली, ‘सोन पुतळी सारखी मुलगी [illegible] याहून आणखी चांगलं सोनं कोण देईल तुम्हाला ?’ असं म्हणून वादंग तिथंच [illegible] तानं सावरून घेण्याचा प्रयत्न केला.

‘ते तर आहेच, पण चार [illegible] येण्यासारखी काही वस्तू जावयाला द्यायला नको काय ? काहीही का [illegible] आटोपतं घेत ‘अंधार व्हायला लागलाय,’ म्हणत चिम्मव्वा तिथून निघून गेल[illegible] बरोबरच गाणी गायला आलेल्या बायकाही उठून चालू लागल्या.

काळोख पडला, लोकांची बडबड.... आरडा ओरडाही कमी झाला. त्या वेळी

बाहेर मल्ल उद्या कोणा कोणाकडे कसल्या कसल्या कामाची जबाबदारी आहे ते समजावून सांगत होता. गाणाऱ्या बायकाही पानसुपारी घेऊन निघून गेल्या. रत्नव्वानं, 'उद्या एक दिवस जरा लौकर आलात तर कामं वेळेवारी मार्गी लागतील', असं बजावून आपलं काम पुरं केलं.

'चांगली चार गाणी आठवून या. तीच तीच जुनी नकोत. दुसऱ्या गावचे लोकही येणार आहेत.' सुंदरव्वानं सांगितलं. नंतर तारक्काकडं वळून म्हणाली, 'तूही आता जाऊन झोप. उद्या रात्री बराच वेळ जागत बसावं लागेल. आपल्या पतिराजांना पाहण्यासाठी.'

तारक्काला चौरंगावरून उतरता उतरता हे सांगितल्यावाचून रहावलं नाही. ती म्हणाली, 'अनंतावाचून घर कसं सुनं सुनं वाटतं!'

दुसऱ्या दिवशी सकाळी रामप्पा अनंतासह येऊन पोहोचला. आपल्या भावाला पाहताच रत्नव्वाची अर्धी काळजी दूर झाली. तिनं विचार केला भाऊ आता सारं सांभाळून नेईल. तिनं त्याला हात तोंड धुवायला पाणी दिलं. फराळा बिराळोचं काही खायला दिल्यावर प्यायला कपभर चहा दिला. नंतर माजघरात बसून बहीण भावांनी आरामात जरा वेळ गप्पा गोष्टी केल्या. शेवटी रत्नव्वानं आतून कपड्याचं एक गाठोडं आणून भावासमोर ठेवलं आणि ते सोडत म्हणाली, ' तू बाजारहाट करतोस. पाहा बरं ह्या कपड्यांची किंमत साधारण किती असेल ती....'

रामप्पानं कपडा हातात घेऊन खालीवर करून पाहिलं, म्हणाला 'सत्तर पंचाहत्तरच्या आसपास होईल.'

त्यानं केलेला किंमतीचा अंदाज जवळपास बरोबर होता. म्हणून तिनं अंगावर घ्यायचं उपरणं दाखवीत म्हटलं, " हे पंधरा रुपयाला घेतलंय". त्यानंतर तिनं चार अंगठ्या काढून भावाच्या हाती दिल्या. रामप्पानं अंगठ्या हातात घेत विचारलं, 'चार कशासाठी केल्या ?'

'दोन बनविल्या असल्या तर मोठ्या झाल्या असत्या. मुलाची बोटं अद्याप तेवढीशी टणक नाहीत. पेलल्या नसत्या त्याला त्या. तीन बनवणं निषिध्द म्हणून चार केल्या.' रत्नव्वानं चार अंगठ्या का केल्या त्याचं स्पष्टीकरण केलं.

रामप्पानं उपाय सुचविला, 'ठीक आहे,प्रथम तीन दे. तेवढ्यावर तो खूष झाला नाही, तर मग चवथी दे.'

'आता तुम्ही आलात आम्ही सुटलो. हे सामान आहे आणि तुम्ही आहात. जावयाला हवं तसं खूश करून पाठवान् काय !'

'खूश करायला काय ? एवढं मिळाल्यावर खुशीत नाचत नाही जाणार ? इथं हा कोण असा मोठा इनामदार लागून राहायलाय आखडायला ?'

रत्नव्वाला भावाचं बोलणं बरोबर वाटलं, तरीही 'त्याच्या आईच्या उड्या बाबा फार मोठया आहेत.' म्हणत आत जेवणाच्या व्यवस्थेत गुंतलेल्या सुंदराला म्हणाली, 'भाऊसाठी वेगळं कर जेवायला, हे जेवण जाणार नाही त्याला.'

काहीशा आढ्यतेनं रामप्पा म्हणाला, 'माझ्यासाठी वेगळं काय म्हणून ? आहे ते चालेल मला. सगळ्या गावच्या लोकांहून माझं जेवण वेगळं कशाला बनवायचं ? कार्य घरात काय हे बरं नाही दिसत !'

तसं नाही. काही गौड मंडळीही जेवायला येतील. आतही आठ दहा माणसांचा स्वयंपाक हाईल.'

याच वेळी हूवण्णा चौगलेही आपले भाऊबंद, नातेवाईक आणि मित्रांना व्याह्यांच्या घरी दुपारच्या जेवणाचं निमंत्रण करीत फिरत होता. त्याच्या बरोबर यांच्यातर्फे निमंत्रण करायला अनंत गेला होता. अनंत चांदूरहून येताना तारक्काबरोबर खूपखूप गप्पा गोष्टी करायच्या, तिला खूपशा गोष्टी ऐकवायच्या ह्या उत्साहानं आला होता. पण त्याची निराशा झाली. ह्यावेळी तारक्का पूर्वीसारखी नव्हती. नेहमी गंभीरशी बसलेली असायची. ती अनंताशी स्नेहभावानं वागत नव्हती अशातली गोष्ट नव्हती. तिला अनंताविषयी खूप प्रेम होतं. अनंताशी खूप बोलावं असं मनातनं तिला कितीही जरी वाटत असलं तरी तोंड उघडून ती त्याच्याशी बोलू शकत नव्हती. आता तिचे आईवडील तिला 'मोठी झालीय' असं म्हणत. फार बोलली नाही तरी त्याच्या खमीसाला कुठं बटन टाच, कुठं आतून त्याचं नवं खमीस त्याला आणून दे; कुठं त्याला जेवायला वाढ याद्वारे ती त्याच्याविषयी वाटणारी ममता व्यक्त करीत असे.

दुपारी सर्व मंडळी मल्लुच्या घरी भोजनास आली. त्यात एक काय तो चौगुल्यांचा भीमप्पा तेवढा आलेला नव्हता. तूप वाढताना रत्नव्वानं हे पाहिलं. तिचा मुद्रेवर क्षणमात्र काळजीची कळ उमटून गेली. तिनं हूवण्णाला हाक मारून विचारलं, 'भीमप्पा दिसत नाहीए तो कुठं ?'

तो म्हणाला, 'तो शेतावर गेला होता मागाहून येईल.'

'गेल्या बरोबर त्याला जेवायला धाडून द्या, विसरायचं नाही.' विहीण प्रत्येकाकडे किती जातीनं लक्ष पुरविते, याचा मनोमन विचार करून तिची दक्षता पाहून तो चांगलाच प्रभावित झाला.

हे लोक जेवायला आले तेव्हा भरमप्पा तिकडे घरी एकटाच होता. जावई होता ना ? तो मुहूर्तानंच सासऱ्याच्या घरी जाऊ शकत होता. म्हणून घरी एकटा बसला होता. तेव्हा भीमप्पा खाकत खोकत हलकेच आला. भीमप्पाला पाहून आश्चर्यानं भरमानं विचारलं, 'काका, तुम्ही जेवायला कसे काही नाही गेलात ?'

'मला शेतावरून यायला जरा वेळ झाला, सगळे गेलेत वाटतं ? जाऊ देत' न जायसाठी त्यानं प्रथमपासूनच ठरवून ठेवलेली सबब सांगितली.

त्याच्या मनातला एकूण भाव न उमगून भरमा म्हणाला, 'अजून जेवायला बसले देखील नसतील, तुम्हीही जा-'

'जाऊ दे रे आता, गेल्यासारखंच तर आहे-' कांबळ्यावर बसत भीमप्पानं त्याला आपुलकीनं विचारलं, 'तुझा मामा तुला काय काय देणार आहे, बाबा ?'

भरमानं वळून त्याला विचारलं, 'त्या बाबतीत काही बोलणं-बिलणं झालं नाही की काय ?'

'बोलणं बिलणं केलं नाही म्हणून काय झालं ? पाचसहा तोळे सोनं नाही घालणार ? चार तोळ्याचं कडं आणि एखाद्या तोळ्याची अंगठी बनविली नसेल की काय ?' फक्त अंगठ्याच तेवढ्या बनविल्या आहेत हे माहीत असूनही भीमप्पा म्हणाला.

'तेवढं तर घालोत...'

'कसा खुळा रे तू? मी ऐकलंय की कडे बनविलेत-' थोडं थबकून कपाळाला आठ्या घालीत म्हणाला, 'नुसत्या अंगठ्या घातल्या की लगेच उठू नकोस चौरंगावरनं-' मग हळूच हसत, 'असा जावई' आणि 'असं घर मिळाल्यावर सात-आठ तोळे फार झाले होय ? बाहेरची एखादी मुलगी केली असती तर दहा तोळे सोनं घालून वर पुन्हा हात जोडून समोर उभे राहिले असते!' भीमप्पानं अशा अनेक अनुचित गोष्टी त्याच्या कानी भरविल्या.

काकाच्या या गोष्टी ऐकून भरमाच्या आनंदाला पारावार उरला नाही. त्याची कळी खुलली. प्रथम त्याची कल्पना होती की चरितार्थ व्यवस्थित चालावा. खायप्यायला पुरेसं व्हावं इतपत त्यांच्यापाशी आहे. आता त्याला हेही उमगलं की त्याचं घराणंही मोठं आहे. गावात त्यांची मोठी वट आहे - प्रतिष्ठा आहे. मामाहूनही त्यांचा योग्य सन्मान व्हायला हवा आणि होईलही. हेच विचार त्याच्या हृद्‌पटलावर उमटत होते. धूर्त भीमप्पानं ते ओळखून म्हटलं, 'ओटी भरण्याच्या वेळी मी सांगेन त्याप्रमाणे वागायचं - सारं काही व्यवस्थित होईल.'

तेवढ्यात लोक जेवण आटोपून परतायला लागले. हूवण्णानं भीमप्पाला पाहताच विचारलं, 'तुम्ही जेवायला गेला नाहीत, भीम ? तुमच्या घरी दोनदा गेलो होतो - तुम्ही घरी नव्हता. रत्नानं तुम्हाला बोलावलंय - जा जेवून या.'

'काही गरज नाहीए. जेवण झालंय असंच समजा. आत्ता आलो. आणि इथं भरमण्णा बरोबर गप्पागोष्टी करीत बसलो'.

'असू द्या - इथंच जेवतील. भरमासाठी त्यांनी हे ताटभर जेवण धाडलंय - तो थोडंच ते सारं खाणार आहे ?' असं म्हणत चिम्मव्वानं भीमप्पाला जेवायला बोलावलं.

लोकांच्या जेवणाखाणात, दिवस सरला हे अनेकांच्या ध्यानीही नव्हते. भटजींनी 'सर्वजण जरा घाई करा - मुहूर्ताला आता फक्त एखाददुसरी घटका राहिलाय...' असं पुन: पुन्हा टोकल्यावर लोक घाईघाईनं एकएक उरकायला लागले. नोकर चाकरांची जेवणंखाणं तर होतच राहणार. वाजंत्र्यांना जेवायला घालून जावयाला बोलावून घेऊन यायच्या तयारी लागावं असं ठरलं. मल्लनं नोकरीकरवी घोडी आणवून घेतली. भटजी आणि काही बुजुर्ग मंडळी जावयाला घेऊन येण्यासाठी गेले.

आत मुलीला नटवून थटवून चौरंगावर आणून बसवायला रत्नव्वानं आपल्या भावजयीला सांगितलं; तसं गाणाऱ्या बायकांना बोलावून आणण्यासाठी गड्याला पिटाळण्यात आलं. एक दोन माणसं बसायसाठी सतरंजी अंथरायला लागले. आतून ओटीचं सामान आणि जावयाला करावयाच्या आहेराच्या वस्तू बोहल्यावर आणून ठेवायसाठी भटजींनी घाई सुरू केली. नंतर त्यांनी समयात तेल वगैरे भरून ठेवायला सांगितलं. एवढ्यात वेणीत फुलं माळून तारक्का गुपचूप बोहल्यावरच्या चौरंगावर येऊन बसली. इकडे गाणाऱ्या बायकाही येऊन ठेपल्या. दोन मोठ्या मुली येऊन तारक्काच्या कानात हळूच तिनं कुठल्या बाजूला अन् कसं बसायचं ते सांगून गेल्या. रामप्पा जरीचा रूमाल बांधून आणि कोट घालून साऱ्या व्यवस्थेची पाहणी करीत पडवीत येरझारा घालत होता. जे काही होतंय ते सारं पाहण्यासाठी अनंत तारक्काच्या जवळ बसायसाठी बोहल्यावर एक कोपरा पकडून बसला. सुंदरव्वानं एकवार मुलाला सांगून पाहिलं की, 'अरे, इकडे ये - तिकडे कुठं बसायला निघालास ? तिचा नवरा येईल हा एवढ्यात...'

एकदा सांगूनही अनंत आला नाही तेव्हा, 'काय ती तुझी बायको आहे - इतकं खेटून बसायला ?' सुंदरव्वानं हसत हसत थट्टेनं म्हणत पुन्हा त्याला लाडानं जवळ बोलावलं.

अनंत काहीशा उद्धटपणे म्हणाला, 'आता बसलो म्हणून काय बिघडतंय विशेष ?'

'उध्दट कुठला, हाक मारली तरी येत नाही !' म्हणत सुंदरव्वा गप्प बसली.

तेवढ्यात वाजत गाजत जावयाला आणण्यात आलं. पोरासोरांनी आधी पासूनच आपआपल्या जागा नीट धरून ठेवल्या होत्या. मोठी माणसं योग्य तिथं आपआपल्या जागी जाऊन बसली. भरमप्पा तारक्काच्या डाव्या बाजूला बोहल्यावर जाऊन बसला. त्यानं पुढ्यातल्या तबकात मांडून ठेवलेल्या आहेराकडे लक्षपूर्वक पाहिलं. जवळच्या नात्यातल्या एका सवाष्णीनं तारक्कासाठी आणलेली साडी आणि तिच्या ओटीचं सारं सामान बोहल्यावर आणून ठेवलं. तसं भटजी म्हणाले, 'आत जा-मुलीची साडी बदलून घेऊन या.'

सुंदरव्वानं पुढे होऊन साडी हातात घेतली आणि गॅसबत्तीच्या प्रकाशात साडी वर खाली करून पाहिली. घडीचा एक कोपरा उलगडून पदराचे नीट निरीक्षण केल्यावाचून ती राहिली नाही. तारक्का हळूच उठून आत गेली. भरमानं आपल्यासाठी आणलेल्या

वस्त्र प्रावरणाकडे काळजीपूर्वक पाहिलं आणि नंतर भटजींच्या तोंडाकडे पाहू लागला. जावयाच्या मनातलं काय ते ओळखून भटजी म्हणाले.

'एवढंच नाही - आणखीही बऱ्याच गोष्टी यायच्यात. तू आतापासूनच उगाच घाबरून जाऊ नकोस!'

तिथं चक्कर टाकीत रामप्पानं तीन अंगठ्या काढून भटजींच्या हाती दिल्या. तेव्हा भटजी, 'हे पाहिलंस? अंगठ्याही आल्यात - एकदम तीन!' असं म्हणत ते त्याला त्या घालू लागले. भरमानं बोट पुढं केलं नाही. जवळच बसलेल्या भीमप्पाकडं एक वार नजर टाकली. तेवढ्यात भटजी त्याची जरा थट्टा करीत म्हणाले,

'आता कशाला घालील तो - बायको आल्यावर घालील.' नंतर बायकांकडे वळून म्हणाले, 'अरे तुम्ही लोक असे चुपचाप काय बसलात? फलशोभनाचं (गर्भादानाचं) एखादं गाणं बिणं तर म्हणा!'

गायच्या तयारीतच असलेल्या दोघीजणी गोड गळ्यानं गायला लागल्या, दोघी जणी त्यांच्या सुरात सूर मिसळून त्याना साथ देऊ लागल्या.

गाणं संपलं. गाणं ऐकण्यात मग्न होऊन गेलेल्या लोकांनी जेव्हां भरमाकडे पाहिलं, तो कल्पना नाही तारक्का कधी येऊन बसली ते! त्या बायकांनी दुसरं गाणं सुरू केलं. लोक वाटच पाहत होते गाणं कधी सुरू होतंय याची - पण तेवढ्यात भटजींनी मध्येच त्याना थांबवीत म्हटलं, 'मुहूर्ताची वेळ टळून चाललीय. प्रथम ओटीत फळं भरा मग उठवू. नंतर अगदी उजाडे पर्यंत जरी गात राहिलात तरी आपल्याला कोणी ना म्हणणार नाही!'

चिम्मव्वा तिरस्कारयुक्त स्वरात म्हणाली, 'ओटीत फळं भरायच्या आधी जावयाचं समाधान तर कराल?'

भटजी म्हणाले, 'सुरूवातीपासून माझा प्रयत्न चाललाय पण माझ्याच्यानं नीटसं जमत नाहीए हे-'

नंतर रामप्पानं जावयाला चार समजुतीच्या गोष्टी गोडी गुलाबीत सांगून चवथी अंगठीही दिली --पण भरमाचा राग काही ओसरला नाही. तेव्हा रत्नव्वा स्वत: पुढं होत, 'आता काय हे येवढ्यावरच सारं झालं संपलं असं थोडंच आहे होय? आता मुलं बाळं व्हायचीत - तेव्हाही द्यावंच लागणार आहे ना...' असं म्हणत जावयाला पुढची आशा दाखविली.

मुलगा कुठं सासूच्या बोलण्याला न बधो अशा विचारानं चिम्मव्वा म्हणाली, 'तेव्हाचं तेव्हा पाहता येईल, आताचं काय ते बोला?!'

पुरूषांच्या घोळक्यातनं मल्लू म्हणाला, 'कधी का होईना, पण आहे ते सर्वस्वी सदासर्वदा त्याचंच आहे.'

इतकं होऊनही जावयाचा राग उतरला नाही. तसं एका वडिलधाऱ्या वृध्दानं उठून, 'बोलणं संपलंय, आता विधी पूर्ण करा.' मल्लनं, 'हं आता राग करायचा नाही. गुरूजी, आपण आपलं काम पुढं सुरू करा. भरमा, हं तयार हो बघू-' म्हणूनही भरमावर त्याचा काही परिणाम झाला नाही. 'बाळा, ही गोष्ट एवढी ताणण्यात अर्थ नाही. आणखी बऱ्याच गोष्टींचा विचार करावा लागतो-' वगैरे नानाविध प्रकारे त्याला समजुतीच्या गोष्टी सांगूनही काही लाभ झाला नाही.

शेवटी हूवण्णानं एक शब्द उच्चारताच भटजींनी ताराची ओटी फळांनी भरून विधी पूर्ण केला. मग चिम्मव्वानं मुलाच्या ओटीत फळं घालायला सांगितलं नाही. तिच्या मनानं घेतलं की, माझ्या मुलाला साजेसा मानपान करणी झाली नाही. व्यवस्थित आहेर केला गेला नाही. जी वस्त्रं दिली जात आहेत त्यानं फार तर वरपूजा झाली एवढंच मानता येईल.

# 7

तारक्काला पतिगृही येऊन सहा महिने लोटले होते. पहिल्यांदा आली तेव्हा सासूनं दर्शविलेली माया-ममता, प्रेम आता उरलेलं नव्हतं. हे पाहून हूवण्णा मनोमन कष्टी झाला. त्याला वाटायचं की काही काळानं आपल्या बायकोचं मन ठिकाणी येईल. तिचा राग निवळेल. पण जसजसे दिवस सरू लागले तस तशी त्याची आशा निराशेत परिणत झाली. आता नुसतं गप्प राहू काम भागणार नाही या विचारानं एक दिवस त्यानं चिम्मव्वाला हाक मारून म्हटलं, 'तारा मोठी झालीय. लग्न होईपर्यंत लहान वाटत होती. गर्भादानानंतर ती मोठी झालीय. मुलगाही मोठा होतोय - वाढीला लागलाय.'

चिम्मव्वानं त्याला पुढं बोलू दिलं नाही. रागानं कपाळाला आठ्या घालीत ती म्हणाली, 'तुम्ही सुनेला डोक्यावर चढवून ठेवलंय. पोरीच्या जोडीनं तिला जेवायखायला घातल्यानंच ती ही अशी अंगापिंडानं थोराड झालीय ना? तिच्या शेजारी पोरगा उभा राहिला तर तिच्या मानानं हा एवढासा दिसतो!'

'आता हे कशाला सांगत्येस उगाच? ही सोयरीक करायला आधी तुला सांगितलं होतं कोणी? तेव्हा म्हणायचं होतंस ना, की मुलगी मुलाच्या मानानं बरीच थोराड वाटते म्हणून?' हूवण्णानं प्रश्नाच्या मुळालाच हात घातला.

चिम्मव्वा म्हणाली,'मी केलंय आणि ते निस्तरायला माझी मी आहेच की. तुम्ही सुनेची एवढी ही तरफदारी कशासाठी करताय?'

थोडा वेळ विचार करून हूवण्णानं विचारलं,'घरात हे सारे जण तुझ्यासारखेच तिच्याशी वागत राहिले तर ती इथं कशी टिकणार आहे?' चिम्मवानं त्याच्या ह्या प्रश्नाला काही एक उत्तर दिले नाही.

मुलगी घरात एकटीच आहे असं पाहून चिम्मव्वानं तिला जवळ बोलावून घेत समजावलं,'आज पासून तू तारक्काच्या बरोबर जेवायला बसायचं नाही.'

आईचं हे बोलणं ऐकून ती बिचारी एवढीशी पोर अचंब्यात पडली. सहज कुतूहलानं तिच्या तोंडून प्रश्न उमटून गेला:'का बरं?' 'तिच्या बरोबर जेवण्यानं खाणाऱ्याला दृष्ट लागते, आणि पोटात दुखायला वगैरे लागतं.' मुलीचा त्या इतक्याशा सांगण्यावर विश्वास बसला नाही, तिला ते खरं वाटेना म्हणून कुतुहलानं तिनं विचारलं,'कोण म्हणतं असं?

चिम्मव्वाचा आवाज एकदम बदलला तशी पोरगी घाबरली. अक्कातायी तशी अजूनही

लहान मुलगीच होती. तिला आणखी अधिक काही विचारायचं धैर्य झालं नाही, तिन्ही सांजा व्हायला अद्याप थोडा वेळ होता, तेव्हा चिमव्वानं मुलीला हाक मारून जेवायला वाढलं. त्यानंतर त्या सर्वांनी आपली जेवणं उरकली. तारक्कासाठी एका ताटात नुसती कोरडी भाकरी वाढून ठेवली. बाकी अन्न आवरून बाजूला झाकूनपाकून ठेवून दिलं. तारा कामावरून परत आल्यावर ती म्हणाली, 'आत जाऊन जेवून घे.' आणि पडवी कडे निघून गेली.

तारक्का रोजच्याप्रमाणे 'तू नाही का जेवणार, अक्का' असं म्हणत आत गेली. तिनं काही उत्तर द्यायच्या आधीच चिम्मव्वा कठोरपणे म्हणाली, 'ती जेवलीय. तू जेवून घे. ताट वाढून ठेवलंय तुझं.' तारक्का यावर अधिक काही बोलली नाही, ताटात जे काही वाढून ठेवलं होतं ते कसंतरी घशाखाली घालीत राहिली. त्या दिवशीचं सासूचं वागणं तिला काहीसं विचित्रच वाटलं. याहूनही तिला अधिक दुःख याचं झालं की, आजवर असं एकट्यानं तिला कधी जेवावं लागलं नव्हतं. त्या दिवसापासून तारक्कावरच्या घरकामाचा बोजा आपला रोजच्या रोज वाढतच गेला. रोज पहाटे चार वाजता उठून ज्वारी दळावी लागायची. नंतर झाडलोट सडासंमार्जन वगैरे करून स्वयंपाकाला लागावं लागत असे. स्वयंपाक आटोपल्यावर जे आणि जेवढं ते खाऊन सासऱ्यासाठी न्याहारी बांधून घेऊन शेतावर जाणं. तिथं सासरा सांगेल ती कामं करावी लागत. घरात दारात पाऊल टाकताच 'ही काय यायची वेळ ?' अशी कुत्सित मुक्ताफळं सासूच्या मुखातनं बाहेर पडत ती निमूटपणे पचवून पाणी भरायच्या कामाला जुंपून घ्यावं लागे. घराच्या वापरासाठी लागणारं सारं पाणी भरून झालं की संध्याकाळचा स्वयंपाक करता करता सकाळसाठी ज्वारी निवडून पाखडून साफसूफ करून ठेवावी लागत असे.

तेवढ्यात सासरे शेतावरून कुठे परत येतात न येतात तोच सासू त्यांना जेवायला वाढायला आत जायची. जाता जाता हिला हुकूम असायचा : 'गोठा झाडून घे. शेण शेणकुराचं पाहा !' त्यानंतर रात्रीच्याला सासूनं जे काही चार तुकडे ताटात वाढून ठेवले असतील ते कसे बसे घशाखाली घालून घरात कुठं तरी एका कोपऱ्यात पडून रहावं लागत असे. ही होती तिची एकूण दिनचर्या !

तारक्का याविषयी कोणाकडे ब्र देखील न बोलता सारं काम उपसत राहिली. आपल्याला सोसावं लागणारं दुःख आणि उपसावे लागणारे कष्ट याची कोणाला कधी गंधवार्ता लागू दिली नाही. आणि सांगणार तरी कोणाला ? एक वेळ तिला आपल्या आईला सांगावसं वाटलं परंतु लगेच तिला आपल्या मामीचा उपदेश आठवला :'एकाच गावात आहे यासाठी सासरच्या गोष्टी माहेरी येऊन सांगायच्या नाहीत.' अशा प्रकारे आणखी काही दिवस गेले. शेवटी या नीरस जीवनाचा अगदीच उबग आला की डोळ्यावाटे टिपं काढून ती आपलं मन हलकं करायचा प्रयत्न करायची.

एक दिवस संध्याकाळी तारक्का गोठा झाडीत होती. काही काळ झाडून झाल्यावर हातातला खराटा बाजूला टाकीत ती आपल्या हाताचे तळवे पाहून रडायला लागली. तिच्या डोळ्यातून दोन अश्रू बिंदू तिच्या तळव्यांवर टपकन ओघळून पडले. जेणू काही ते तिच्या तळव्यांना लागलेली घाण पुसू पाहत होते. तेवढ्यात गुरांना गवत घालायला म्हणून भरमा तिथं आला. त्याला पाहून तारक्का एकदम दचकली. तिनं झटकन खराटा उचलून हातात घेतला. घाबरून गेल्यामुळं तिचं कपाळ घामानं डबडबलं. कसं तरी ती आपली झाडत राहिली. भरमा संकोचल्यासारखा होऊन आत आला, गुरांना गवत घालता घालता व्यस्त मनानं विचारलं, 'काय झालंय ?'

तारक्कानं झाडणं थांबवीत मान वर करीत हलकेच 'काही नाही' म्हटलं आणि पुन्हा झाडायला लागली.

'डोळे लाल कशानं झाले ?'

तारक्का भीतभीत म्हणाली, 'हाताचा फोड फुटला. शेण काढताना आग आग झाली.'

भरमा जवळ येऊन म्हणाला, 'बघू दाखव !' तारक्कानं दाखवलं नाही. भरमानं फिरून विचारलं, 'काय झालं ?'

'शेतात शाळू कापता कापता हाताला फोड आले....' हे सांगताना तिचे डोळे अश्रूंना वाट करून देण्यास अधीर झाले होते.

'बाबा तिथं नव्हते ? काय ?' आपले वडील आपल्या पत्नीला एवढे कष्ट कधी देणार नाहीत हे भरमा जाणून होता. आई करीत असलेला तिचा छळ आणि तिच्यावर सदान् कदा वाहत असलेली शिव्यांची लाखोटी त्याच्या चांगल्या परिचयाची होती, पण त्या बाबतीत काही करायचं सामर्थ्य त्याच्यात नव्हते. आईच्या आज्ञेनुसार वागणं त्याला भागच पडत होतं.

तेवढ्यात पडवीतनं चिम्मव्वानं विचारलं, 'भरमू तिथं काय करतोस रे ?' तिचं कर्कश ओरडणं कानी पडताच ते दोघं थरथर कापायला लागले. सुकल्या गळ्यानं भरमा म्हणाला, 'काही नाही आपलं गुरांना गवत घालीत होतो. आणि एवढं म्हणत तो झटदिशी पडवीत गेला.

हूवण्णा रात्री शेतावर गेल्यावर घरात हे भांडण माजलं. या दोघांचं गोठ्यातलं बोलणं चिम्मव्वा लपून ऐकत होती. मुलानं बायकोशी बोलणं तिच्या दृष्टीने घोर अपमान होता. तिनं भरमाची चांगलीच खरड काढली आणि तारक्काला नाही नाही ते कुजकट नासकट बोलबोलून घायाळ करून सोडलं. त्या दिवशी तारक्का जेवली नाही की सासूनंही तिला जेव म्हणून म्हटलं नाही. आई जवळ पास कुठं नाही असा मोका साधून अक्का ताईनं विचारलं, 'जेवणार नाहीस, वहिनी ?'

तारक्कानं भूक नाही म्हटल्यावर ती डोळ्यातनं दोन टिपं काढीत गप्प बसली. याहून अधिक ती काही करू शकत नव्हती.

या भांडणाचे वृत्त शेजाऱ्या पाजाऱ्यांकडनं तारक्काच्या आईपर्यंत जाऊन पोहोचलं. तिनं आपल्या नवऱ्याला पोरीला चार दिवसांसाठी घेऊन यायसाठी धाडलं. पण त्यांनी सांगितलं, 'चैत्रकाळ आहे, घरात तिची जरूर आहे.'

दोन तीन दिवस गेल्यावर रत्नव्वानं शेताच्या वाटेवर थांबून लेकीकडून सारी हकिगत विचारली. तारक्कानं आवती भोवती पाहिलं आणि कोणी नाही असं पाहून आईच्या पुढ्यात आसवं ढाळीत थोडक्यात साऱ्या गोष्टी सांगितल्या. पोरीच्या डोळ्यात पाणी पाहून रत्नव्वा स्फुंदून स्फुंदून रडली. त्या संध्याकाळी रत्नव्वाला वाटलं आपला वेळ जाता जात नाहीए. ती मनाशी विचार करीत होती, 'एकुलती एक मुलगी आहे, दहा नांगरांचे शेतीवाले आहेत, आपल्या नात्यातलेच आहेत. अशा विचारानं खूप खर्च सोसून लग्न केलं, तर पोरीचे हे हाल होताहेत !' ती अत्यंत चिंतित झाली.

रात्री रत्नव्वानं पोरीची सारी परिस्थिती नवऱ्याला सांगितली. ती ऐकून मल्ल ही मनातनं दुःखी झाला. एक वेळ त्याला वाटलं, की बहिणीला सांगावं पोरीला असा त्रास देऊ नकोस. पण त्याच्या विवेकबुध्दीनं त्याला असं काही करू दिलं नाही. त्यानं विचार केला, आपल्या सांगण्यानं उलटं लेकीचा छळ आणखीच वाढायचा. काही काळानं चिम्मव्वाला अक्कल येईल. थोडं शहाणपण सुचेल. पण मनोमन त्याला बहिणीचा राग आल्याविना राहिला नाही.

अशा प्रकारे काही दिवस गेले. तारक्का सासरी कष्ट उपसतच होती. हे इकडे आपल्या घरी दुःखी होते.

वर्षभरानं उन्हाळ्याच्या सुट्टीत अनंत मामाच्या घरी आला तेव्हा तारक्का ही माहेरी आलेली होती. दोघांच्यात गप्पा गोष्टी झाल्या. बोलणं झालं. अनंत फारसं काही बोलला नाही. सांगायसारखं काही नव्हतंही. तारक्कानं सासरच्या साऱ्या गोष्टी सांगून आपलं मन हलकं केलं. त्या ऐकताना अनंताच्या तोंडून 'हाय !' असा दुःखोद्गार निघून गेला. चार दिवस दोघांनी एकमेकांच्या संगतीत काढले. आवडत्या वस्तू करून खाल्ल्या. तारक्का सासरी गेली. जायच्या वेळी ती खूप रडली. आता अनंताच्यानंही नुसतं गंभीर, नुसतं तटस्थ रहावेना, खूप आवरले तरी दोन आसवं डोळ्यात तरारून आलेच. तारक्काची अवस्था आठवून तो कष्टी होत होता.

या खेपेस आपल्या गावी परतल्यावरही अनंताला पुनः पुन्हा तारक्काची आठवण येत राहिली. त्यानं दोन तीनदा आपल्या आईला तारक्काच्या सासूच्या वागण्याच्या गोष्टी सांगितल्या देखील. परंतु तेवढ्यानं त्याच्या मनाचं समाधान झालं नाही. अभ्यासात गढलेला असतानाही तारक्काचं कारूण्यानं ओथंबलेलं बोलणं त्याच्या कानात गुंजत

राही. त्याच्या इवल्याशा कोमल मनावर तिची मूर्ती कायमची कोरली गेल्यासारखं झालं होतं. तीन वर्ष उलटले. अनंत कधी कधी चांदूरला यायचा. तेव्हा तारक्काही माहेरी यायची. आता अनंतचा स्वभाव बदलत चालला होता. त्यात पहिल्या सारखा हट्टीपणा राहीला नव्हता. तारक्काच्या परिस्थिती विषयी साऱ्यांना उत्सुकतेनं विचारायचा आणि ते सारं उमजून विलक्षण कष्टीही व्हायचा. आता तो काहीसा मोठा झाला होता. कोणाशी किती आणि कसं बोलावं याची त्याला आता चांगली समज आली होती. दुसऱ्याचं सुख दु:ख जाणून त्यात सहभागी व्हायचं आणि शक्य झालं तर त्याना सहाय्यीभूत होण्याचा गुण शिक्षणपरत्वे त्याच्यात अंकुरित होऊ लागला होता. एकदा सारे जण असेच बसले असताना रागानं त्याच्या तोंडातून निघून गेलं.'बघतोच तुझी सासू कशी आहे ती ?' तसं सर्वांना मिळून त्याला शांत करणं भाग पडलं. त्यामुळे तारक्काही आपल्या पाठीशी कोणी तरी आहे या जाणीवेनं मनोमन सुखावून गेल्यासारखी झाली. आता तो पहिल्या सारखा खेळाबिळात वेळ दवडत नसायचा. चांदूरहून येतांना दोन तीन चांगली पुस्तकं घेऊन यायचा. तारक्काला त्यांतल्या गोष्टी वाचून दाखवायचा. कधी आपण वाचलेल्या सीता सावित्रीच्या कथा तो तिला सांगायचा. अनंताच्या तोंडून त्यांच्यावर गुदरलेली संकटं आणि त्यांना भोगावं लागलेलं दु;ख क्लेश ऐकून तारक्का आपलं दु:ख विसरून जाई.अशा प्रकारे तिचं मन शांत करतांना तो हे ही जाणून असे की तारक्कानं आपल्या नवऱ्याचं मन जिंकलं पाहिजे. त्याची मर्जी संपादन केली पाहिजे.

ह्या वेळी दिवाळीची सुट्टी लागली तसं अनंताचं मन आत्याच्या घराकडे ओढ घेऊ लागलं. रत्नव्वानंही दिवाळीच्या सणात आपल्याकडे यायसाठी त्याला निरोप धाडला होता. अलीकडे काही सणवार असला की रत्नव्वा अनंताला अगत्यानं बोलावून घ्यायची.

अनंताला चांदूरच्या आत्यानं यायसाठी बोलावणं धाडलं होतं तरीही त्याच्या आईनं काही त्याला धाडलं नाही. ती म्हणाली,'दिवाळी इथंच करून जा नंतर हवं तर जाऊन चार दिवस तिथं राहून ये. घरी आपल्या इथं नाभूचा वाढदिवस ही साजरा करायचाय.'

नाभू - नाभिराज अनंतचा धाकटा भाऊ होता. ह्या आधीच्या त्याच्या दोन्ही वाढदिवसाना अनंता घरी नव्हता. तेव्हा अनंत कुठं ना कुठं तरी दुसरीकडे राहिला होता. म्हणून मग आईच्या सांगण्यानुसार चार दिवस घरी राहून सण वगैरे सारं उरकूनच तो चांदूरला गेला.

तिकडे रत्नव्वाची प्रकृती बरी नव्हती. सणासाठी अनंताची वाट पाहून पाहून ती थकली. अखेर लेकीसमोर तिच्या तोंडून सहज निघून गेलं की, 'अनंत काही आता येत नाही !'

तारक्कानं विचारलं, 'मीही माहेरपणासाठी येणार आहे हे अनंताला कळविलं होतंस

ना ?' तारक्काचा आजवरचा अनुभव असा होता की आपण येणार आहोत असं कळलं की अनंत हमखास येणारच !

तिचा अनुभव कधी कुठं खोटा का ठरणार होता ? एक दोन दिवसात अनंत येऊन थडकलाच ! तो आला तेव्हा आत्यांची प्रकृती बरी नव्हती, त्यामुळे त्याच्या उत्साहावर कांहीसं विरजण पडल्यासारखं झालं. त्याला वाटलं होईल दोन तीन दिवसात बरी-पण तो आला त्याच्या दुसऱ्याच दिवशी ताप चांगलाच चढला. चार दिवस होऊन गेले तरी ताप उतरायची लक्षणं दिसेनात तशी सारी घाबरून गेली. शेजारच्या गावाहून डॉक्टर आणून प्रकृती दाखविली गेली. डॉक्टर म्हणाले, 'विषमज्वर आहे, पण घाबरायचं काही कारण नाही.'

अनंत आणि तारक्का मोठ्या तत्परतेनं तिची सेवा शुश्रूषा करू लागले. ऐनापूरलाही निरोप धाडला गेला. रामण्णाही एक दिवस येऊन बहिणीला पाहून गेला. जाताना अनंताला म्हणाला, 'रत्ना चांगली बरी होऊन हिंडाय फिरायला लागल्यावर तू परत ये. भले मग चार दिवस शाळा बुडवावी लागली तरी हरकत नाही. मल्लप्पा एकटा बिचारा तरी काय काय करील, शेताचं पाहील की घरचं पाहील ?' मग तारक्काकडे वळून म्हणाला, 'मुलगी गावातच अशा विचारानं दिली की ताराचे सासू सासरे येत जात राहतील. हिच्या प्रकृतीची काळजी घेतील - पण आता तसली काही आशा अपेक्षा ठेवण्यात अर्थ नाही. ते आपले परक्यासारखे येतात आणि टाकणं टाकल्यासारखं पाहून जातात. निदान.तू तरी चार दिवस इथं राहून वेळच्यावेळी तिचं औषधपाणी सांभाळ. तिला इच्छा होईल, ती मागेल ते स्वतःच्या हातनं रांधून तिला खाऊ घाल-तिचं पथ्यपाणी, हवं नको व्यवस्थित सांगाळ.' असं सारं समजावून सांगून तो घरी परत गेला.

चौदा दिवसांनंतर रत्नव्वाचा ताप उतरला. अनंताच्या सेवाशुश्रुषेमुळे ती पुढे सहा दिवसातच बिछान्यात उठून बसू लागली. परंतु अद्याप ती बरीच अशक्त होती. आता तापाचं भय नव्हतं. मल्लला शेतीवाडी आणि गुरांना पाणी दाणा वैरण ही सारी कामं एकट्यालाच सांभाळावी लागत, त्यामुळे तो सकाळ संध्याकाळ थोडावेळच रत्नव्वाच्या अंथरूणाशी येऊन बसू शकायचा. बाकी सारावेळ तारक्का आणि अनंतच रत्नव्वाच्या बिछान्याशी बसून असत. अनंत सांगेल त्याप्रमाणे मोसंब्याचा रस काढून पाजणं, चहा करून देणं ही तारक्काची कामं होती. घरच्या स्वयंपाकपाण्याचं काम शेजारीण येऊन करून जायची. आई बरी झाल्यावर गेल्या दोन तीन दिवसांपासून तारक्काच अनंतासाठी भात शिजवायची. बाकी स्वयंपाकाची जबाबदारी तिच्यावर नसल्याने तिला विशेष असे काम नसायचे. इकडच्या तिकडच्या गोष्टी करीत ती आईच्या अंथरूणाशीच बसून असायची. एक दिवस रत्नव्वाच्या बिछान्याशी बसून तारक्का म्हणाली,'अनंत इथं राहिल्यामुळे तुझी काळजी छान घेतली गेली. नाही तर आम्हा गावंढळांना कसली

आलीय कशाची माहिती ? काही तरी गरम करायचं आणि छातीवर बांधायचं एवढंच आमचं ज्ञान !' असं म्हणून तिनं अनंताकडे करूणापूर्ण दृष्टीने पाहिलं.

अनंताकडे कृतज्ञतेनं पाहत रत्ना म्हणाली, 'जन्मदात्या परमेश्वराला काय उमेद आशा नसणार ? दर वर्षी सणासाठी यायचा ह्या वेळेला तर सण झाल्यावर आला. यावेळचं त्याचं येणं असं होतं की जणू काही माझी काळजी वहायलाच त्याला बोलावून घेतलं होतं.... !'

'मी तर काही केलं नाही बाबा. सारं काम तारानंच केलं. मी तर डॉक्टरने सांगितल्याप्रमाणे काय करायचं ते दाखवून देत होतो. एक दिवस तर आख्खी रात्र ती जागत राहिली. ते तर माझ्याच्यानं झालं नाही.' अनंत तोंडानं हे बोलला पण अंतर्यामी त्याला आपण केलेल्या कामाचा अभिमान होता.

तारक्का म्हणाली, 'राहू दे हं; त्या रात्री तू देखील कितीतरी वेळ जागत राहिला होतास.'

रत्नव्वा त्या दोघांकडे काहीशा आश्चर्ययुक्त नजरेनं पाहत राहिली. आपल्या आजारपणात हे सारं काही घडलं याची तिला मुळी कल्पना नव्हती. आता तिला सांगून सुध्दा विश्वास वाटत नव्हता की ती दोन तीन दिवस बेशुध्दावस्थेत होती. एकदा ती अशीच बसली असतांना,तिला पाहायला म्हणून भरमा आला. तारक्का झटशी उठून लाजून मान खाली घालून दूर उभी राहिली. तरीही तिच्या दृष्टीत नवऱ्याला 'यावं' असं सांगण्याचा भाव व्यक्त होत होता. अनंताशी विशेष परिचय नसल्यामुळे असेल वा इतर काही कारणामुळे असेल तो जरा दूर बसायला लागला. तसं रत्नव्वा म्हणाली, 'असा दूर कां बसतोस ? जवळ ये !'

अनंतानं विचारलं, 'पाचसहा दिवस झाले....इकडे आलाच नाहीत ते, भरमण्णा ?'

त्याच वेळी तारक्कानही डोळे वर करून त्याच्याकडे पाहिलं, त्या पाहण्यातही तोच प्रश्न होता.

'आज चार दिवस झाले शेतावरच होतो.' मामुलीसं उत्तर देत भरमा गप्प बसला.

ते ऐकून रत्नव्वाच्या तोंडून एक दीर्घ निश्वास बाहेर पडला.त्या बरोबरच तिच्या तोंडून सहज निघून गेलं, 'त्याचे आईवडील विचारपूस करून जात होते. त्यानं कशाला यावं ?' जावयाला बरं वाटावं म्हणून ती हे म्हणाली खरं, पण तिच्या ह्या उद्‌गारात त्याला उद्देशून मारलेला एक छुपा टोमणाही दडलेला होता.

भरमा थोडा वेळ तसाच स्वस्थ बसून राहिला, नंतर त्यानं विचारलं, 'आता कशी काय आहे प्रकृती ?' आणखी जराशानं, 'निघतो मी आता.' असं म्हणत तो उठून चालू लागला. आईनं नजरेनं खुणावतच नवऱ्याला निरोप देण्यासाठी तारक्का त्याच्या

पाठोपाठ माजघरात गेली. पण भरमानं साधं वळून देखील पाहिलं नाही. तारक्का फिरून पुन्हा खोलीत परत आली.

तसं रत्नव्वा अनंताला सांगायला लागली, 'मुलगा भोळा आहे, तोंड उघडून घडा घडा बोलणं जमत नाही त्याला. तुझ्यासारखं कुठं जात येत नाही. सांगितलं तेवढं काम करून टाकायचं आणि पडून रहायचं!'

'आपल्या आई बरोबर तो जे काही बोलतो तेवढं ते पुरेसं नाही वाटतं?' असं म्हणत तारक्का हसली. त्या हास्यात लाज होती, त्याहूनही अधिक व्यथा होती. कदाचित थोडं बहुत हास्यही अनुस्यूत असेल. तिनं अधिक काही बोलून दाखवलं नसलं तरी तिच्या त्या हसण्यातनं एक भाव स्पष्ट होत होता 'या प्राण्याला बायको म्हणजे काय याची कल्पना देखील नाही. बायकोचा अर्थ काय हे ही साधं त्याला ठाऊक नाही!'

तिच्या या भावनेपुढे तिचं जीवन सुधारण्याचा अनंताचा सारा प्रयास निरर्थक वाटायला लागला.

पुढे चारपाच दिवसानंतर आपल्या गावी परत जायची तयारी करीत अनंत आत्याला म्हणाला, 'आता मी येतो.'

रत्नव्वा प्रेमानं म्हणाली, 'ये हं, बाळ.'

नंतर तारक्काकडे वळून अनंत म्हणाला, 'आक्का, जातो मी आता. तू पंधरावीस दिवस आणखी रहा. आत्याची तब्येत चांगली सुधारली की मगच जा.' मग आत्याकडे वळून म्हणाला, 'त्याचं बोलावणं आलं तरी ताराला धाडायचं नाही.'

रत्नव्वा म्हणाली, 'एवढ्यात कोण धाडतंय तिला? अजूनही माझ्याच्याने चुलीपुढे बसून काही करवत नाही. आरामात जाईल ती महिन्याभरानं.'

अनंत जायला निघाला तारक्का त्याला बाहेरच्या फाटकापर्यंत पोहोचवायला गेली. अनंत वळून म्हणाला, 'आता तू थांब तारा. आजोबा आले की सांग त्यांना. म्हणावं उन्ह होईल म्हणून मी जरा लौकर निघालो. तसं शेतावर जाताना सांगितलं होतं मी त्यांना, की आज जातोय म्हणून...' त्यानंतर तो निघून गेला.

तारक्का काही बोलायच्या मन:स्थितीत नव्हती. तिचे डोळे आसवांनी भरून आले होते.

# 8

तारक्कानं आता सोळावं पुरं करून सत्राव्यात पदार्पण केलं होतं. पहिल्या खेपेस ती बाहेरची झाली त्याला आता चार वर्ष उलटले होते. बाळपण सुखात, लाडाकोडात गेल्या कारणानं ती बाराव्या वर्षीच ऋतुमती झाली. आजकाल सासरी दुःखाकष्टात आयुष्य जात असले तरी तिच्या अंगप्रत्यंगातून सौंदर्य ओसंडत होतं... पण तिच्या मुखावर मात्र सदैव उदासिनता पसरलेली असायची. घरप्रपंचातील हौस मौज, सुख आनंद तिच्या भाग्यात नव्हता. ती ही तिकडे फारसं लक्ष देत नव्हती. आपण बरं अन आपलं काम बरं अशी वृत्ती तिनं अंगी बाणवली होती. सासू सासऱ्यांबरोबर ती कामापुरतं तेवढं बोलायची. येरव्ही गप्प बसून असायची.

आणखी एक गोष्ट इथं सांगणं आवश्यक आहे. भरमा तारक्काला लहान होईल या विचारानं चिम्मव्वानं लेकाला खूप खाऊ पिऊ घालून वाढवलं होतं. तो ही बिनधास्त खाऊन पिऊन चांगला धष्ट पुष्ट झाला होता. बोलून चालून खेडूत पोराची ज्वानी ती! तो एकटा कोणाच्या मदती शिवाय ज्वारीचं पोतं गाडीतून उतरवून पाठीवर तोलीत दडादडा घराच्या पायऱ्या चढून जात गात नेऊन ठेवायचा एवढं पुरेसं नाही काय! तो भर ज्वानीत आला होता. वयानुसार त्याचं मनही दांपत्य सुखाला आसुसलं होतं. एवढ्यासाठी तो हल्ली तारक्काकडे आशाळभूतपणे पाहत रहायचा. कोणी नाही असं पाहून तो तिच्याशी दोन शब्द बोलायला मिळावेत यासाठी धडपडायचा.

भरमाच्या बापाला ही गोष्ट माहीतं नव्हती अशातली काही गोष्ट नव्हती. तो वारंवार पत्नीला तोंडावर म्हणायचा,'बरोबरच्यांना नातवंड झालीत!' त्यावर चिम्मव्वा तोंड आवळून म्हणायची,'तुमच्या घरी झाली नाहीत या गोष्टीची तुम्हाला चिंता लागलीय नव्हे?' ते ऐकलं की हूवण्णा गप्प बसायचा. आपल्याला नातवंडे व्हावीत अशी चिम्मव्वाला इच्छा नव्हती अशातलाही भाग नव्हता. पण तिचं अंतर्मन तिला सांगायचं,' आता जर तारा गरोदर राहिली तर तिचं महत्व वाढेल. रत्नाचं नाक वर होईल. त्यानंतर त्यांची शेती-वाडी आम्हाला मिळायची आशाच करायला नको.' ही बलवत्तर भावना नातू व्हावा या आकांक्षेस दूर सारीत होती. एवढ्याचसाठी ती मुलगा आणि सून यांच्या दांपत्य जीवनाबाबत भलतीच सावध असायची.

आज महिनाभरापासून भरमा शेतावर झोपत असे. गायी म्हशी पण तिथंच बांधत

असत. साफसूफ करून शेण्या लावण्यासाठी तारक्काला रोज सकाळी तिथं जावं लागायचं.

तिथं पेरूची झाडं होती. फुलझाडंही छान बहरली होती. साऱ्या चांदुरमध्ये त्यांच्या मळ्यातलं पेरूचं झाड सर्वात मोठं होतं. त्याच्या फळांनाही एक विलक्षण गोडी होती. आठवड्यातं एकदा पेरू उतरवून ठेक्यानं विकून टाकीत. घरातले नोकरचाकरही मनसोक्त खात, परंतु चिम्मव्वा कधी एक पेरू तारक्काला द्यायची नाही. त्याच्या चवीची वाखाणणी मात्र ती तिच्यासमोर संधी सापडेल तेव्हा मुद्दाम करायची. ती ऐकून तारक्कानं लालचावं, चोरून पेरू काढावा आणि तिची चोरी पकडून आपण तिचे चांगले वाभाडे काढावेत हा त्यामागे तिचा अंतस्थ हेतू असायचा. तारक्का काही तिची ही हौस पुरी करायला संधी देणारातली खचितच नव्हती. यदाकदाचित पेरू खायची इच्छा झाली तर ती नदीवर जाताना आपल्या आईला सांगायची. आई दुकानातनं पेरू विकत आणून तिला वाटेतच खायला द्यायची. आईनं विकत आणून दिलेले पेरू खाऊन तारक्का तृप्त व्हायची.

ही गोष्ट एक त्या मायलेकी सोडून तिसऱ्या कोणाला माहीत नव्हती. इकडे भरमाच्या मनात हे सलायचं की हे एवढे हक्काचे घरचे पेरू असून आपल्या बायकोला पेरू खायला मिळत नाहीत. आणि आईनं तिला कधी पेरू खायला दिला नाही. तो यासाठी आईचा राग रागही करायचा. पण आई समोर त्याचं काही एक चालायचं नाही. आई नसताना तारक्का जेव्हा सकाळची शेतावर यायची तेव्हा तिला पेरू द्यावासा त्याला वाटे. पण तारक्का एकटी सापडायची नाही, आक्कातायीही सदा तिथं तिच्या आगे मागे असायची. त्यामुळे त्याचा नाइलाज होई. तारक्काला पेरू देणं जमत नसे. यदाकदाचित तिनं आईला जाऊन सांगितलं तर ?

ह्या आठवड्यातही पेरू उतरवले गेले. गेल्या आठवड्यापेक्षा थोडे जास्तच उतरवले गेले. पण ह्या वेळी ठेक्यावर खरेदी करणाऱ्यांपैकी कोणी फिरकलेच नाही. पेरू तसेच्या तसेच दोन दिवस घरात पडून राहिले. शेवटी गावात ज्वारीच्या बदल्यात ते खपवायची जबाबदारी आक्कातायीवर येऊन पडली. तिच्या बाबतीत हे काही नवं काम नव्हतं. यापूर्वीही तिनं कैकवेळा अशा पध्दतीनं पेरू विकले होते.या परिस्थितीनं भरमाला एक संधी प्राप्त करून दिली. दुसऱ्या दिवशीच भरमाच्या कल्पनेचे वारू खूप दूरवर उधळले. उद्या बहीण पेरू विकायला जाईल. अशा कामासाठी आई आपल्या बायकोला कधीही बाहेर धाडू शकणार नाही. ती एकटीच सकाळी इथं येईल. तेव्हा मी तिच्याशी बोलायला कशी काय सुरूवात करायची... काय बोलायचं तिच्याशी ? बोलू काय ?.... काय बोलावं बरं ? तो दुसऱ्या दिवशी सकाळी लवकर उठला. सारी झाडं धुंडाळून अगदी वर शेंड्याला लागलेल्या पेरूतनं दोन तीन सुरेख पेरू घेऊन आला. मग विचार करू लागला. आता हे पेरू तिला द्यायचे तरी कसे! बरं आपण दिले पेरू पण ती घेईल का ते ? तो अशा बाबतीत फारसा हुशार नव्हता. स्वत: आपण हातानं तिला ते द्यायचं

धाडसही त्याच्यात नव्हतं. शेवटी त्याला एक उपाय सुचला. केर भरायच्या टोपलीपाशी त्यानं ते पेरू दडवून ठेवले. त्यानं विचार केला की टोपली उचलता उचलता ती ते पेरू खात्रीनं उचलून घेईल. ती ते घेऊन खायला लागली, की आपण तिच्याशी बोलायचा प्रयत्न करायचा. मनानं तो इतका भिडस्त होता. संकोची होता.

पेरू तर त्यानं त्या टोपलीमागे दडवून ठेवले. पण नंतर त्याच्या मनात अशी शंका उभी राहिली की, मी इथं असलो तर ती माझ्या देखत काही पेरूला हात लावणार नाही. आता यासाठी काय बरं युक्ती योजावी? आता एवढ्यात ती येईलच. तेव्हा आपण सरळ पाणी आणायचं निमित्त करून इथून सटकावं हे बरं. एकदा हा विचार पक्का होताच तो घागर घेऊन नदीकडे चालता झाला. डोक्यात विचार चक्र सुरू होतं; आपण परत येईपर्यंत तिनं पेरू घेऊन खायला सुरूवात केली देखील असेल. आपण आलो की ती घाबरेल. मग मी म्हणेन - घाबरू नकोस मी तुझ्यासाठीच ठेवले होते. तेव्हा ती किती खूष होईल. कल्पना नाही काय म्हणेल ती? त्या दिवशी कामाला बायको नव्हे, आई आलेली होती. ते पाहून भरमा निराश झाला. त्याहीपेक्षा अधिक तो घाबरला. टोपलीच्या आडोशानं ठेवलेली फळं चिम्मव्वानं पाहिली होती. अक्कलेत ती मुलापेक्षा कमी नव्हती. लेकाची योजना ती समजून चुकली. तिचे डोळे लालीलाल झाले. 'घागर घेऊन नदीवर गेलाय. येऊ देच त्याला, चांगली कान पकडून अक्कल शिकवते त्याला...' असा विचार करून ती त्याची वाट पाहत थांबली.भरमा दूर कुठे दृष्टीला पडतो न पडतो तोच तिनं आवाज चढवून रागानं विचारलं, 'इथं पेरू कोणी ठेवलेत?'

भरमा काही विचार न करताच म्हणाला, 'कुठं? मला नाही माहीत' बोलताना त्याचा आवाज कापत होता.

'तुला कसं माहीत असेल? जे करायचं असेल कर... त्या वेडीचं डोकंच भारदवते...' ती जे तोंडाला येईल ते बडबडत सुटली. भरमानं एका शब्दानंही तिला प्रत्युत्तर केलं नाही. परंतु तो मनाशी विचार करू लागला, 'यात माझा दोष आहे? मी माझ्या बायकोशी प्रेमानं वागलो तर त्यात हिचं काय जातं? असं होतं तर मग माझं लग्न तरी कशासाठी केलं होतं...?' आज त्याचं काळीज एका अनिर्वचनीय उदासीनतेनं भरून आलं होतं. दातानं गवताची काडी कुरतडत तो गुपचूप उभा राहिला. चिम्मव्वाच्या मुखातनं शिव्याशापांची वृष्टी अविरत चालूच होती. आईचे हे प्रलाप फार काळ त्याच्याच्यानं ऐकवले गेले नाहीत. एका विलक्षण दुःखानं तो निद्ध झाला. तिथून निघून जावं असं त्याच्या मनानं घेतलं. एक एक पाऊल उचलीत तो गुरांच्या गोठ्याकडे गेला. गोठ्याच्या दाराशी जरा वेळ उभा राहिला. तरीही आईचं वाकृताडन आपलं अखंड चालूच होते. काय करावं काही भरमाला उमगेना. तो हळूच गायीपाशी गेला. नकळत त्याचा हात

गायीच्या मऊ मुलायम देहावरून फिरू लागला... तसाच तिच्या गळ्यावरूनही फिरत राहिला. गायीनं तोंड फिरवून भरमाच्या खांद्यावर मान टाकली. तिचं तोंडही त्यानं गोंजारलं. अचानक एकाएकी त्याच्या मनात प्रेम उचंबळून आल्यासारखं झाले, कदाचित मुका घ्यायची इच्छा झाली असावी. त्याच्या अंतर्यामी जे उचंबळून आलं होतं ते त्याचा हात व्यक्त करीत होता. त्याला त्याचा अर्थ उमगला नाही. आज त्याच्या मनात अशी भावना का बरं उद्‌भवतेय ? (आईचा राग का बरं येतोय ? या गोष्टींचं त्याला आकलन का बरं होत नव्हतं ? कां समजत नव्हत्या त्याला त्या ?) माझ्या एका स्वाभाविक इच्छेच्या पूर्ततेत आई असा खोडा कां घालतेय ? आडसर काय म्हणून होतेय ? यातलं काही एक त्याला उमगत नव्हतं - समजत नव्हतं. एक अव्यक्त आणि स्पष्ट वेदना त्याचं काळीज कुरतडत होती. कोण जाणे गाईला सोडून तो कधी दूर निघून गेला. शरीरात एक प्रकारची कसकस ... एक प्रकारची अस्वस्थता जाणवत होती.

भरमा अहेतुकपणे गोठ्याच्या एका कोपऱ्यात गेला. तिथं ठेवलेल्या ताज्या गवताच्या ढिगल्यावर लोळण घ्यावीशी त्याला वाटलं. तो गवतावर पसरला, कुशीला वळला. गाय हंबरली. ते ऐकून एक वासरू खडबडून उठलं आणि अंग ताणून खुंट्याला बांधलेलं दावं तोडायसाठी झटवा घ्यायला लागलं. भरमा गुरांना चारा घालून पसरून बसला होता. चिम्मव्वा गुरांना चारा घालायसाठी आत आली, कठोरपणे म्हणाली, 'असं भूत लागल्यासारखं कां बसलायस ? गुरांना चारा घाल. त्यांना तिथनं हटव. बायकांनी कुठवर रोज रोज़ हे करीत रहायचं!' अन् मग गाईला गवत घालून ती धार काढायला बसली. भरमानं उठून अंगाला आळोखे पिळोखे देत जांभई दिली. गुरांखालचा कचरा बाजूला काढीत बाहेर गेला. चिम्मव्वानं दूध काढून झाल्यावर म्हटलं, 'भरमा, दूध प्यायचं असेल तर घे पिऊन. मी घरी जातेय. पोरीनं काय काय काम केली असतील कोण जाणे! तुम्हा लोकांच्या हरकामासाठी आम्हाला डोके फोड करावी लागते. तुला अन् तिला कशाची काही चिंता थोडीच आहे. उद्या आम्ही मेल्यावर कसा काय प्रपंच कराल आणि कसं काय जगाल कोण जाणे!'असं काही बाही ती बडबडत राहिली. भरमानं उदासपणे आत जाऊन दूध घेतलं. त्या दिवशी त्याला दूध बरं लागलं नाही.

चिम्मव्वा घरी गेल्यावर तो गवत गोळा करून आणायला गेला. मन उद्विग्न होतं. पेरूच्या झाडावर पोपट मजेत उडत होते. वाऱ्याच्या झुळकी बरोबर रोपं डुलत होती. या निसर्ग सौंदर्यात त्याला एक अभाव, एक अपूर्णता जाणवत होती. गवताचा भारा बांधून डोक्यावर घेऊन तो उठू पाहात होता. तेवढ्यात पायात कसलीशी काटेरी वेल अडकली तसं चिडून विळ्यानं ती तोडायचा त्यानं प्रयत्न केला पण तुटली नाही. डोक्यावरचा भारा उतरवून त्यानं पायात अडकलेली ती वेल सोडवली आणि गवत घेऊन गोठ्यात गेला; भारा टाकून घरी जायला निघाला. चारसहा पावलं [illegible] पुन्हा परतला

आणि भारा सोडून त्यातलं थोडं थोडं गवत गुरांपुढे टाकून पुन्हा चालू लागला. सूर्य हळू हळू वर चढत होता. उन्हं वाढत होतं.

भरमा घरी पोहचला. घरात चिम्मव्वाच्या जिभेचा पट्टा सुरू होता. तो बाहेरच उभं राहून ऐकू लागला.

'एवढी वाढलीयस एवढं समजू नये तुला ? अक्कल कुठं गेली होती शेण खायला ? जेव म्हटलं की बसून लगेच चट चार भाकऱ्या फस्त करत्ये. आता तुला आणखी किती समजावून सांगावं लागणार आहे! दर वेळी आरडा ओरड करीन तर कसं काम भागेल ? आपलं घर... आपला प्रपंच इकडे लक्ष नको का द्यायला ?'

आतून हूवण्णा म्हणाला, 'आता काय झालंय... जाऊ देना !'

'हे अशानंच तुम्ही तिला डोक्यावर चढवून बसवलं आहे. माझी बायको, माझी बायको म्हणून त्यानं तर बायकोला डोक्यावरचं घेतलं आहे. आता घर कसं चालणार. घरचे रीतिरिवाज शिकवायची आवश्यकता नाही की काय ?'

'नंतरही आमच्या डोक्यावरच रहाणार आहे ? कसंही आपलं आपण पाहून घेतील ! जोवर आपण आहोत तोवर निभावून घ्यायचं झालं...'

'पण कामं तर व्हायला हवीत ना ? आता गुरूजी आले तर काय सांगू मी त्यांना ? एक भाकरी बाजूला काढून ठेवण्यात तिच्यावर असं कोणतं मोठं संकट कोसळलं होतं ?'

भरमा सारं काही उमजला. वडील जेवायला आले असतील. आपल्या बायकोनं देवाच्या नैवेद्याची भाकरी आधी वेगळी काढून न ठेवताच त्याना सरळ जेवायला वाढलं असणार. यासाठी एवढा हा आईच्या जिभेचा पट्टा चालला असणार. तो हळूच आत गेला - तसं चिम्मव्वानं आपलं तुणतुणं पुन्हा सुरू केलं. कडाडली, 'हा तरी काय ? यानं बायकोचं तोंड कधी पाहिलं होतं की नाही कोण जाणे, सारखा सारखा आपला तिच्या पायात घुटमळत असतो. उद्या ती त्याच्या डोक्यावर चांगली मिरी वाटील तेव्हा कळेल मग याला काय ते !'

भरमानं उद्विग्नतेनं विचारलं, 'काय झालं ?'

'व्हायचंय काय ? घरचे रीतिरिवाज सारे गेले चुलीत. आता आम्ही शुद्ध धनगर झालोत धनगर ! देवाच्या नैवेद्याची भाकरी बाजूला काढून ठेवायचं माहीत नाही होय हिला ?'

'एखाद दिवशी राहून गेलं म्हणून काय बिघडलं ? पीठ घालू-'

भरमाचं एवढं बोलणं पुरेसं होतं. चिम्मव्वाला भांडण हवंच होतं. सकाळी पेरू दृष्टीला पडल्यापासूनच तिच्या जिवाची नुसती लाहीलाही होऊन गेली होती. अशी संधी सापडल्यावर तिला आणखी काय हवं होतं ? 'अरे ! हे पोरटं आईला तोंडावर सांगाय इतपत शेफारलंय होय ? थांब, त्याला वेळीच ठेचला पाहिजे.' तिनं मनाशी विचार

केला. या सर्व कारणांनी तिला भांडायला उद्युक्त केलं, प्रोत्साहित केलं. नंतर भयंकर भांडण झालं. घरात कोणीही अन्नाला शिवलं नाही. तारक्का उपाशी पोटीच सासऱ्याबरोबर शेतावर कामाला गेली. भरमा आल्या पावली परत गेला. चिम्मव्वा तोंडावर पांघरूण घेऊन पडून राहिली.

तो दिवस असाच गेला. संध्याकाळी एकेकाला उठवून जेवायला घालण्यात अक्कातायी थकून चूर झाली.

भरमाचं तारक्काला देण्यासाठी पेरू काढून ठेवणं, त्यावरून घरात भांडण होणं, सर्वांनी उपाशी रहाणं वगैरे सर्व गोष्टी दोन तीन दिवसांनी शेजाऱ्यांकरवी रत्नव्वाच्या कानी पोहचल्या. या सर्व गोष्टी ऐकून तिला एकाच वेळी संतापही आला आणि आनंदही वाटला. जावयाच्या मनात तारक्काला पेरू खायला द्यावसं येणं हे तिच्या आनंदाचं कारण होतं. आता तिच्या अंतर्यामी लेकीच्या भावी जीवनाविषयी काहीशी आशा निर्माण झाली... उभारी वाटू लागली. तिनं विचार केला, आता जावयाचं मन जिंकायला हवं. जर तो एकटा माझ्या पोरीच्या पाठिशी उभा राहिला तर मग यातल्या कोणीही कितीही जीव खाल्ला, तर काहीही होणार नाही. 'देवा, धर्मराजो - कृपा कर... भरमप्पाला एवढं शहाणपण दे! पाच रूपयाची घंटा विकत आणून तुझ्या दारी बांधीन...!' असं म्हणून प्रार्थना करू लागली. दुसऱ्या दिवशी जावयाला देण्यासाठी घरात लाडू-करंज्या वगैरे गोडधोडाचं बनविलं. त्या दिवशीच दुपारची भरमाच्या शेतावर जायच्या वाटेवर त्याची येण्याची वाट पाहत उभी राहिली. तो दृष्टिला पडताच 'भरमा' म्हणून हाक मारली.

भरमाला ती हाक ऐकू आली असणार, पण न ऐकल्यासारखं करीत तो पाच सहा पावलं तसाच पुढं गेला. सासूनं त्याला आजवर अशी कधी हाक मारली नव्हती. हाक मारून बोलवावं एवढी आतमीयता वाटावी असं त्याचं वागणं चालणंही नव्हतं. हाक मारलीय की नाही, अशा शंकेनंच तो पुढे गेला. तसा तो स्वभावानं संकोची होता. त्याचा हा संकोची स्वभावच त्याला घातक ठरला नव्हता काय ? रत्नव्वा जरा थबकली. तिच्या मनात कुठं तरी एक जराशी निराशेची लहर तरंगून गेली. असं असूनही तिनं त्याला पुन्हा हाक मारली. यावेळी मात्र भरमानं वळून मागे पाहिलं. रत्नव्वा काहीशा विनयानं काहीशा प्रेमभरानं चार पावलं पुढं जात म्हणाली, 'घरी तर ये जरा, बाबा.'

'या वेळी काय काम आहे ? पुन्हा कधी तरी येऊन जाईन...'

रत्नव्वानं आग्रह करीत म्हटलं, 'पुन्हा कधी येणार... आताच चला ना..' रत्नाच्या मागोमाग भरमा तिच्या घरी गेला. गल्लीतल्या एका म्हातारीनं त्या दोघांना जाताना पाहून विचारलं, 'फार दिवसांनी सासूच्या घरी आलायस तो भरमा ?'

त्यावर रत्नव्वानं उत्तर देत म्हटलं, 'तो हा असाच शेतावर जात होता. मीच म्हणाले चार करंज्या तर खाऊन जा. आणि घेऊन आले झालं!' मग ती त्याला आत घेऊन

गेली. तिथं पाट मांडून त्याला बसवलं आणि एका ताटात चार लाडू अन् चार करंज्या वाढून आणून ते त्याच्या पुढे ठेवलं.

भरमा म्हणाला, 'हे एवढं कशाला ? हे आत्ता आत्ताच तर जेवलोय, भूक नाही खरंच.'

रत्नव्वा म्हणाली, 'खा..खा.. हे काय फार झालंय होय ?' मग जरा थांबून म्हणाली, 'घरात काही गोडा धोडाचं केलं, की तुम्हाला टाकून काही खायला जीव होत नाही. मन तुमच्याकडे ओढ घेत असतं. पण काय करू, तुझ्या आईला हे समजतच नाही. म्हणून आम्हा लोकांना तुम्हाला बोलवायची भीती वाटते. पण आज मन रहावलंच नाही. म्हणून बोलावलं.' त्याचं मन रहावं यासाठी ती हे बोलली.

भरमा गुपचूप पुढ्यातलं खात होता. वाटत होतं की जणू काही तो कुठल्या तरी विचारात हरवल्यासारखा झालाय. पुढे मग रत्नव्वाच म्हणाली, 'पोरगी तुझ्या हाती सोपवलीय, बाबा. तुझ्या शिवाय तिला कोण आहे ? तिच्या हातून काही चुकलं माकलं तर तू तिला संभाळून घ्यायला हवंस.'

'सांभाळून घ्यायची काय गोष्ट ? मला काय तिची गरज नाही होय ?' लज्जेमुळे पुढे आणखी काय बोलावं हे त्याला उमजेनासं झालं. अखेर थोडा काळजीच्या स्वरात म्हणाला, 'पण माझ्या म्हातारीची समज काही औरच आहे. आता काय तिला समज येणार म्हणा ? घरात सारे जण तिच्या पायी मेटाकुटीला आहोत. हैराण होऊन गेलेत.'

'ठीक आहे तिलाही सांभाळून घ्यायला हवं, अखेर आई आई ती. पण तुम्ही दोघं एकमेकांना धरून व्यवस्थित रहाल, तर तिचं चिडचिडणं माझ्या पोरीचं काही एक वाईट करू शकणार नाही समजलं ?' असं म्हणत रत्नव्वानं आतून आणखी दोन लाडू आणून त्याच्या ताटात वाढते.

आता भरमा काहीसं मनमोकळेपणानं बोलायला लागला म्हणाला, 'या साऱ्या गोष्टी मी समजू शकतो. पण करणार काय ? घरात आईनं आमचं जगणं असं काही करून सोडलंय की वाटतं चांगलंच कात्रीत सापडलोय आपण !... कालची गोष्ट ऐकली नाहीत आपण. फालतू गोष्ट हो... चार पेरू पिकले म्हणून तिच्यासाठी काढून ठेवले, तर त्यावरून हे भांडण ! संध्याकाळ पर्यंत घरात कोणाच्या मुखाला अन्न लागलं नाही की पाण्याचा थेंब कोणी घेतला नाही. हा नुसता वनवास !'

'काही हरकत नाही. नशिबात दुःख असेल तर ते भोगणं भागच आहे. पण तुम्ही आता मोठे झालात. तुम्ही आपलं बरं वाईट काय याचा नीट विचार करून वागा-सारं कांही व्यवस्थित होईल. तुम्ही पूर्वी सारखे आता लहान राहिला नाही आहात. दुसऱ्या कोणाचं वा आईचं तुम्ही ऐकू नये असं मी मुळीच म्हणणार नाही. पण तुम्ही एका

गोष्टीचं सदैव भान ठेवून वागायला हवं. ती म्हणजे तुम्हा नवरा बायकोत जे एक रेशमी बंधन निर्माण झालं आहे ती रेशमी लग्न-गाठ या जन्मात काही सुटणार नाही.' रत्नव्वानं या सर्व गोष्टी मोठ्या विनयानं सांगितल्या. तिला माहीत होतं की आजवरचा सारा दोष आपल्या जावयाचाच आहे. पण त्या बरोबरच तिला ह्याही गोष्टीची जाणीव होती की हा दोष त्याला दाखवून देताना नरमाईनंच वागलं पाहिजे. तो उगाच बिथरेल असा वावगा एकही शब्द बोलून यात उपयोगाचं नाही. अन्यथा या दोघांचं आता कुठं जरासं मनोमिलन घडू पाहत आहे तिला निष्कारण तडा जायचा. त्यांच्यात फुकाचा अंतराय निर्माण व्हायचा! याचेही भय तिच्या मनाला होतेच. म्हणून ती पहिल्यापेक्षाही अधिक नम्रतेनं सद्‌गदित कंठानं म्हणाली, 'पोरा, माझ्या पोरीला तू एका पायानं लाथ मारलीस, तर दुसरा पाय धरून ती तुझ्या बरोबर आयुष्य निभावून नेईल. आयुष्याच्या अंतापर्यंत एक तुझ्याशिवाय तिला दुसरं आपलं म्हणायला असं आहे तरी कोण ? असे, ती बिचारी तर पाळीव कुलंगी कुत्री सारखी आहे. तुला सोडून ती जाईल तरी कुठं ?'

सासूचं बोलणं ऐकून भरमाचे डोळे उघडले. आज त्याला समजलं की आपली सासू आपल्यावर किती माया करतेय ते. क्षणभर त्याच्या मनात येऊन गेलं की, आपण त्यावेळी भीमप्पाचं ऐकलं हे चुकलंच. आपल्या मित्रांचं सासरी जाणं आणि मजेत राहणं वगैरेही त्याच्या ध्यानी होतं. अशा प्रकारे रहायची इच्छा त्याच्या मनाला झाली, परंतु आईचा अडथळा त्याच्या लेखी लक्ष्मण रेषा होती. ती पार करण्याचे साहस त्याच्यात नव्हते आणि म्हणूनच दुःखद मनानं तो आजवर या जाळ्यात अडकून पडला होता. खाणं आटोपताच भरमा जायला निघाला तसं डोळ्यात पाणी आणून रत्नव्वा म्हणाली, 'आम्हाला तरी आणखी दुसरं कोण आहे ? ती एक पोर तेवढी आहे. आणि तू मुला सारखाच आहेस!' शेतावर पोहोचेपर्यंत त्याच्या मनात याच गोष्टी एक सारख्या पिंगा घालीत होत्या पुनः पुन्हा येत होत्या.

त्या दिवशी संध्याकाळी कोणीतरी चिम्मव्वाच्या कानी घातलं की, भरमा आपल्या सासूच्या घरी फराळा आराळासाठी गेला होता आज! हे ऐकून चिम्मव्वा तर प्रथम आश्चर्यचकितच झाली, पण खुबीखुबीनं एक एक विचारीत या बातमीत जरूर काही तथ्य आहे तिनं ताडलं. मनात कुठली पण वरकरणी तसं काही न दर्शविता त्या बाईला म्हणाली, 'काही हरकत नाही. बकरा चरला, तर त्यात फायदा धनगराचाच आहे.' पण तिच्या मनात विचाराची एक वावटळ उठल्यासारखी झाली. 'पोरगा तिथं गेला होता, माहीत नाही अशा प्रकारं किती वेळा तो तिकडे गेला असेल, कोण जाणं! माझ्या पाठीला थोडेच डोळे आहेत ? म्हणून तो काल अशा प्रकारे वाद घालीत होता. आजवर त्यानं कधी उलटून उत्तर वगैरे दिलं नव्हतं मला-वाटतं की, सासूच्या चिथावणीनं तो असलं काही तोंड वर करून बोलायला लागलाय!' बराच वेळ ती यावर उपाय

शोधत राहिली-मग स्वत:शीच पुटपुटली: नुसत्या भांडणानं काही तो वळणावर नाही यायचा.

संध्याकाळी चिम्मव्वानं जेवायसाठी गोडाचा सांजा केला. भरमा शेतावरून कुठं परत येतो न येतो तोच त्याला हातपाय धुवायसाठी गरम पाणी दिलं आणि जेवायला बसवलं. तो बसताच त्याच्या पुढ्यात बसून वाढता वाढता मोठ्या प्रेमानं म्हणाली, 'गावातले लोक मोठे वाईट आहेत, बाळा. आम्ही आमच्या घरात हसून खेळून आनंदानं राहातो - सहन होत नाही ते त्याना.'

भरमाला भूक नव्हती, हळू हळू जेवत होता. चिम्मव्वाचं चालूच होतं, 'तू माझा एकुलता एक मुलगा आहेस. आम्ही चार जण तुझ्या भरवशावर जगतो आहोत. कोणी काही खायला प्यायला न घालो एवढ्यासाठी कोणाकडे काही खायचं बियचं नाही हं, बाळा!'

भरमा विचार करीत करीत जेवत होता. आईनं आजच हा विषय का काढावा-असं काही कां बोलावं हे तो बरोबर उमजला. त्यायोगे तो काहीसा घाबरलाही. आपल्या आईच्या समोर काही बोलायचं... आपल्या मनातलं तिला काही स्पष्ट समजावून सांगायचं धैर्य त्याच्यात नव्हतं. चिम्मव्वानं आपलं बोलणं चालूच ठेवलं, 'का गप्प का बसलास ? भूताबितानं तर पछाडलं नाही ना ? माझं म्हणणं ध्यानात आलंय की नाही ?' तिनं रागानं नाराजीच्या स्वरात विचारलं.

'समजलं-' भरमा हळूच पण ठामपणे म्हणाला.

तेवढ्यात आईनं तोंड वळवून विचारलं, 'समजलंय...तर मग आज का गेला होतास ? खायला ? ती तुझ्यावर करणी करील... तुला भ्रमिष्ट करून सोडील - म्हणजे मग तू त्यांच्या दाराशी जाऊन कुत्र्यासारखी शेपटी हलवीत घुटमळत उभा राहायला लागशील. माहीत नाही त्या माय-लेकी कशा आहेत ते ? 'त्रिया-चारित्र्या'*त अगदी निपुण आहेत.'

हे बोलणं भरमाला आवडलं नाही. त्याच्या डोळ्यासमोर सासूची प्रेमळ मूर्ती उभी होती. 'अग राहू दे. तुझं सदान्कदा काही ना काही सांगणं असतंच. कावीळ झालेल्याला सारं काही पिवळंच दिसतं. तुझाही असलाच एक वेडेपणा आहे झालं...' भरमा हे तर बोलून गेला, पण नंतर त्याच्या मनात आलं. 'आईच्या समोर मी असलं काही बोलायला नको होतं; ती एवढं हे धरून भांडायला उठू शकेल!' आईशी भांडायची त्याची इच्छा नव्हती. परवाच्या भांडणानं जे मन:स्वास्थ्य नष्ट करून टाकलं होतं ते अद्याप थाऱ्यावर आलं नव्हतं-शांत झालं नव्हतं. आताचं भांडण जर टळलं, तर फिरून कधी असा भांडणाचा प्रसंग येऊ देणार नाही' असं मनाशी म्हणत त्यानं जीभ चावली.

* त्रिया - चरित्र : पुरूषाला भुरळ घालून बनविण्याची स्त्रीची चलाखी

'हो बाबा' कपाळ बडवीत ती म्हणाली, 'हे माझं नशीब आहे. तू तरी त्याला काय क़रणार ? नवसा सायासाचा तू माझा एकुलता एक मुलगा आहेस. जन्मात कधी आजवर तू मला उलटून बोलला नाहीस. आणि आज असं तोंड टाकून बोलायला लागलास. माहीत नाही काय खायला घातलंय. कोण जाणे काय पोटात गेलंय तुझ्या ते ?' मग तोंड एवढसं करीत, आसवं ढाळीत दीनवाण्या स्वरात म्हणाली, 'दुपारी फूस लावून घेऊन गेली होती ना ?'

कोठल्याही बाबतीत गुणदोषांचा सारासार विचार करून काही ठोस निर्णय घ्यायचं सामर्थ्य... निश्चित निष्कर्षाप्रत येण्याचं सामर्थ्य भरमात मुळातच नव्हतं. तो आपला सरळमार्गी होता. बाळपणापासूनच तो सर्वस्वी वडिलधाऱ्यांवर विसंबून राहूनच जगत आला होता. आईच्या या बोलण्याचा त्याच्या मनावर भलताच प्रभाव पडला. हा वेळ पावेतो सासूविषयी वाटणारा सहानुभूतीचा कढ आईच्या दिशेनं वळला होता. आई त्याच्या जीवनाचा आधारस्तंभ होती. तिचा दीनवाणा स्वर ऐकून भरमाचं काळीज भरून आलं. सासूनं आजवर कधी बोलवलं नाही. आजच का बोलावून असं खाऊपिऊ घातलं ? नको नको म्हणत असतानाही दोनदा ताटात लाडू आणून वाढले. तिनं आई म्हणाली तसं त्यात काही घातलं बितलं तर नव्हतं ! अशा प्रकारे सासूच्या प्रेमाविषयी त्याच्या मनात संशयाचे तरंग उठायला लागले. या नवतारूण्यामुळे तारक्काविषयी त्याच्या मनात जे एक नैसगिक आकर्षण निर्माण व्हायला लागलं होतं, ते सासूनं काही तरी खायला बियला तर घातलं नसेल या भयानं कापरासारखं पार उडून गेलं. आणि म्हणूनच तारक्काकडे ओढ घेऊ पाहात असलेल्या आपल्या मनाला त्यानं प्रयास पूर्वक आवर घातला.

# 9

चार महिने झाले हूवण्णानं अंथरूण धरलं होतं. चार दिवस बरा असायचा, तर चार दिवस पुन्हा आजारी हलकासा खोकला अधून-मधून ताप यायचा. हाता पायाचे सांधे दुखत. खाण्यावर वासना नसायची, भूक लागत नसे. अशा प्रकारे हळूहळू तो अशक्त होत चालला होता. दोघा तिघा भटक्या गवळ्यांकडून त्यानं औषधही घेतलं होतं. त्यांनी अर्धे पैसे आगाऊ घेऊन औषध दिले. आणि बाकी पैसे नंतर बरं वाटल्यावर येऊन घेऊन जाऊ असं सांगितलं होतं. परंतु ते आपले उरलेले पैसे वसूल करायसाठी काही पुन्हा फिरकले नाही. त्यामुळे त्यांच्याकडे पुढं काही चौकशीही तो करू शकला नाही. हूवण्णा दिवसेंदिवस अशक्त होत गेला पण त्याच्या अंतर्यामी आपल्याला फिरून कधी शेतावर जायला मिळेल याची आस लागून राहिलेली असायची. कधी कधी त्याच्या मनात विचार यायचा, 'माझं तर सारं छान पार पडलं. नातवा बितवाचं तोंड पाहिल्यावर परमेश्वर मला आपल्या पायाशी घेऊन जाता तर किती बरं झालं असतं!' त्याने आपली ही मनीषा कितीदा तरी चारचौघात बोलून दाखविली होती.

मगदुमच्या रत्नव्वाला हूवण्णाच्या ह्या इच्छेचा पत्ता लागला होता. म्हणून तीही आपल्या नवऱ्याच्या मागे लागली होती. ती म्हणाली, 'हूवण्णाला आता पुन्हा भेटायला जाल तेव्हा ही गोष्ट काढा. पोरीला न्हाण आलं त्याला पाच वर्ष झालीत. दिव्यात जळणाऱ्या वातीसारखी ती जळत्येय. अद्यापपर्यंत तिला नवऱ्याबरोबर एकत्र झोपायलाही धाडलं नाही. माहीत नाही तुमचा काय विचार आहे तो? तुमचं तिच्याकडे तिळभर तरी लक्ष आहे की नाही कोण जाणे? तुमच्या बहिणीला याच्याशी काय कर्तव्य? तीही तुमच्याच सारखी. एकाच राशीचे तुम्ही! तिला काय माहीत पोरी कसं आयुष्य कंठतात ते? निदान तुम्ही हूवण्णाकडे तरी हा प्रश्न काढाच.' मल्लच्या मनालाही मुलीची चिंता लागून राहिलेली होतीच. पण उघड उघड असं काही बोलून दाखवायला तो स्त्री थोडाच होता. ?

एक दिवस तो हूवण्णाला भेटायला गेला. चिम्मव्वा जवळपास नव्हती. संधीचा फायदा घेत तो म्हणाला, 'तुम्ही दिवसेंदिवस हे असं अशक्त होत चाललायत तुमच्या डोळ्यादेखत जर घरात नातवंडे खेळती, तर तुम्ही/लौकर बरे होता. तुमच्या जिवाला तेवढाच आराम मिळता!'

हूवण्णानं त्याचं म्हणणं मान्य करीत म्हटलं, 'मुलाचं लग्न होऊन पाचसहा वर्ष झालीत. त्याच्या बरोबरीच्याना एक-एक दोन-दोन मुलंही झालीत. आमचं तर नशीबच दळभद्रं आहे झालं!'

'नशीब तरी काय करील. मुलांना का जन्मावसं वाटत नाही, पण...'

या बोलण्याचा गर्भितार्थ ध्यानी येताच हूवण्णाच्या विषादयुक्त मुद्रेवर हास्याची एक सौम्यशी लकेर तरळून गेली. त्या हसण्यात केवढं प्रगाढ दु:ख दडलेलं होतं, ते मल्लही समजू शकत होता. याचा अर्थ असा नव्हे की हूवण्णाला ही गोष्ट समजत नव्हती, परंतु त्याची बायको ते मान्य करणार नाही. तिची समजूत काढता येणंही शक्य नव्हतं. तिला या बाबतीत काही पटवून देणंही कठीण होतं तसं आता अंथरूण धरल्यावर तिचा विरोध होण्याचीही शक्यता नव्हती. तो सांगू लागला. 'तारक्का गरोदर आहे हे माझ्या कानी पडल्यावर, मी जरी मेलो तरी मला आनंदच वाटेल. पण ती...'

हूवण्णा आणखीही काही बोलून गेला असता, परंतु हा वेळ पावेतो दारा आडून त्यांचं बोलणं गुपचुप ऐकत उभी असलेली चिम्मव्वा झटदिशी पुढे आली आणि म्हणाली, 'आम्ही कसे दिवस काढतोय ते आमचं आमच्या जीवाला माहीत. पण यांचं डोकं मात्र भलतीकडेच भरकटत असतं. जळलं मेलं! इथं काळजी पायी आम्ही आमच्यातच मरतोय. माझा तर रात्रंदिवस डोळ्याला डोळा लागत नाही, पण यांना....'

बायकोचं बोलणं ऐकून हूवण्णा गप्प बसला. त्याचा चेहरा कोमेजला. मल्लचंही तोंड उतरलं. तरीही तो म्हणाला, 'याची आम्हालाही चिंता आहे, घरावर आपत्ती कोसळता कामा नये. म्हणून तर आम्ही म्हणत होतो की, घरात नातवंडे खेळायला हवीत.'

'हां मुलं होतील. काय त्यांना रस्त्यावरनं धरून का आणायचं! हे दिसत नाही? यांनी अंथरूण धरलंय. खळ्याला आग लागली तर ती विझवायचं सोडून बी पेरायचा मुहूर्त विचारला जातोय?'

बोलणं तिथल्या तिथंच खुंटलं, पण विषय काही तिथंच संपला नाही. दुपारी मुलगा जेव्हा जेवायला आला तेव्हा चिम्मवा म्हणाली, 'आज तुझा सासरा तारीच्या बाबतीत बोलायला आला होता.'

भरमानं आश्चर्यानं विचारलं, 'तिच्या बाबतीत काय?'

'पोरीला अजून मुलं नाही झाली?'

मध्येच कुतुहलानं भरमानं म्हटल, 'कोण म्हणत होतं?'

'आणखीन कोण म्हणणार...' थोडं थांबून, 'हे तर पडलेत असे बिछान्याला खिळून-पण त्याची त्यांना काय फिकीर? काहीही नाही, जसं यांनी अंथरूण धरलं तसं हे आपले धरूनच चाललेत की, हे घर जणू त्यांचच झालंय. आनंदानं सुखावून तुझी सासू ही अश्शी फुगलीय!' हातानं दर्शवित चिम्मव्वा म्हणाली.

तिच्या ह्या असल्या बोलण्यानं भरमा उदास झाला. म्हणाला, 'आमचे बाबा आजारानं बिछान्याला खिळले तर त्याना कसला काय आनंद...?'

'अजून बच्चा आहेस तू. तुला अजून समजतंय. तो तर रोज तंबाखू प्यायचं निमित्त करून येतो अन् काहीना काही कानी भरवत असतो.'

'का ?' भरमानं अज्ञान पांघरीत विचारलं.

'सारं काही समजेल तुला. मी कशाला बोलू ? तू काय आता दूध पिता कुकुलं बाळ आहेस होय ?' मग थोडं थांबून 'तू त्यांच्या बोलण्याकडे मुळीच लक्ष देऊ नकोस.' चिम्मव्वानं ती गोष्ट अधिकच गूढ रंगवीत म्हटलं.

'नीट स्पष्ट करून सांग ना काय ते- असं कोड्यात बोलत राहिलीस तर कसं समजणार मला ?' भरमानं चिडून विचारलं,

'बिछान्यावर धाडा... एकत्र...' तेवढ्यात तारक्का आत आली, म्हणून विषय बदलीत म्हणाली, 'सारं माझ्यावर घालताहेत. तुला काय ? मोठा झालायस, बायको आलीय. म्हातारीची आता कशाला परवा करशील ?

भरमा जेवण उरकून बाहेर निघून गेला. तारक्काला या बोलण्यांचा भाव ध्यानी आला नसेल अशातली गोष्ट नव्हे. ती उकिरड्यावर केर टाकायला म्हणून गेली तेव्हा संधी साधून रागानं म्हणाली, 'आई, बाबा मामंजींना पाहायला वारंवार कां कशासाठी येत असतात ?'

रत्नव्वा गप्प राहिली. तारक्का फिरून म्हणाली, 'येऊन दोनचार इकडच्या तिकडच्या गोष्टी करून जात नाहीत. दरवेळी माझ्याविषयी काहीना काही बोलणं उकरून काढतात. आता कोणाला हवंय ते सुख ? कार्यप्रसंगी ते जेव्हा रागारागानं मंडपातून उठून गेले, तेव्हाच मी उमजले की माझ्या आयुष्यात सुख नाहीए. तुम्हा लोकांच्या आपआपसातल्या काही ना काही बोलण्यामुळे का काही घडणार आहे ? भाग्यात जे काही लिहिलेलं असतं ते कधी खोटं थोडंच होणार असतं ?'

रत्नव्वाला जणू वीजच कोसळलीयसं वाटलं. तिला वाटलं होतं की, आपल्या नवऱ्यानं हूवण्णाला सांगितल्यानं गोष्ट मार्गी लागेल. काही तरी घडेल. पण त्याचा हा परिणाम झालेला पोरीच्या तोंडून ऐकून ती हताश झाली. ती चिंतामग्न झाली. तिच्या मनात आलं. मुलीच्या सुखासाठी म्हणून जे काही करायला जाते, ते असं नेमकं उलटच का होऊन बसतं ? दुसऱ्या कशाचा काही प्रभाव तर नव्हे ? दक्षिणा देऊन गुरूजींना विचारून पाहावं का ? पण तिनं मुलीकडे मात्र यातलं काही एक बोलून दाखविलं नाही.

हा विचार रत्नव्वांच्या मनात पहिल्यांदाच येत होता अशातली गोष्ट नाही. या आधीही तिनं अनेक ज्योतिष्यांना विचारले होते. पैसेही खर्च केले होते. कधी कधी असा कोणी

भेटला तर त्याला पैसे देऊन त्याच्या कडून ताईत मंत्रवून घेऊन तो लेकीच्या गळ्यात बांधायची. चिम्मव्वाच्या दृष्टीला असा एखादा ताईत पडलारे पडला की, मुलाला सांगून ती तो तोडून फेकून द्यायला लावायची. असा प्रकार दोन तीन वेळा झाल्यावर तारक्कानं ताईत वगैरे गळ्यात बांधायचं सोडूनच दिलं. तारक्का समजून चुकली होती की या ताईतामुळे सासूची आपल्यावर मर्जी बसण्याऐवजी उलट तिच्या इतराजीलाच आपल्याला तोंड द्यावं लागलंय. परंतु रत्नव्वा अशा प्रकारच्या प्रयत्नांबाबत तशी अद्याप निराश झालेली नव्हती. तिनं शेजारच्या गावी जाऊन तिथल्या एका मांत्रिकाला या साऱ्याचं कारण काय आणि त्यावर उपाय काय म्हणून विचारलं. तो म्हणाला, 'मागील दारी 'करव्वा' आहे. तुमचे पूर्वज वर्षातून एकदा तिची पूजाबांधून तिला साडीचोळी नेसवीत झालंच तर चार शेर भाताचा नैवेद्य तिला दाखवीत. ती तुझ्या मुलीच्या मागे लागलीय. तूही त्या आईजगदंबेला अमावस्येला काळी साडी नेसव... तिची यथासांग पूजा कर. तसं केलंस तरच तुझ्या मुलीला सुख लागेल.' म्हणून मग रत्नव्वानं अमावस्या जवळ येताच देवीच्या पूजेची तयारी केली.

ते पाहून मल्ल सहजगत्या म्हणाला, 'हूवण्णा आजारी आहे. न जाणो चिम्मा उद्या असं न म्हणो की, हे सारं माहीत असतानाही आम्ही इकडे जाणून बुजून पूजेचा घाट घातलाय... मौज मजा करतोय!'

रत्नव्वा समोर पोरीच्या हिताव्यतिरिक्त दुसरी कुठली गोष्ट मुळी नव्हतीच. पण कोणी साधु मांत्रिकानं या गोष्टीचा उल्लेख केला नव्हता तेव्हा ही पूजा आपण आवश्य करायचीच करायची असं ठरवून टाकलं होतं. म्हणून ती म्हणाली, 'त्यात काय आहे? ते काय आज थोडेच आजारी पडलेत? ते आजारी पडलेल्याला चार सहा महिने होऊन गेलेत. ते आजारी पडलेत म्हणून घरातल्यांनी कायं खाणं पिणं अजिबात वर्ज्य केलंय होय? हे आता पंधरावीस होतील ते तर आता काठीच्या आधारानं हिंडू फिरूही लागलेत. मी पूजा केली तर त्यात त्याचं काय जातंय?'

त्यावर मल्ल गप्प बसला. घरात देवीची पूजा आहे असं सांगून तो लेकीला चार दिवसांसाठी घरी घेऊन आला. तारक्कानं माहेरी येताच ऐनापूरला मामी आणि अनंताला बोलावणं धाडलं. पण त्यांच्यापैकी कोणीही आलं नाही. त्यानी निरोप धाडला की येते चार सहा दिवस घर सोडता येणार नाही-पण अमावस्येला सकाळचेच येऊन पोहोचू.

एक दिवस दुपारी पाणी आणायला म्हणून चिम्मव्वा नदीवर गेली असता तिथं तिला चांगलव्वा भेटली. काही तरी बोलणं काढायच्या हेतूनं तिनं विचारलं, 'काय ग चिम्मव्वा - पाणी आणायचं काम तुझ्यावर आलय वाटतं?'

'ती महाराणी माहेरी गेलीय, तेव्हां दुसरं मग कोण आणणार? तिला काय? ती तर लग्न करून आली अन् गादी बळकावून बसलीय. घरदार सांभाळता सांभाळता

आमच्या डोक्याचे केस झडलेत. आता कष्ट उपसण्यावाचून... झिजण्यावाचून चालण्यासारखं नाहीए.' हे सारं बोलण्यामागे चिम्मव्वाचा उद्येश इतकाच होता की म्हातारीनं जाऊन हे रत्नव्वाला सांगावं.

चांगलव्वानं चिम्मव्वाच्या बोलण्याकडे दुर्लक्ष्य करीत आपण आधीपासून सांगायची ठरविलेली गोष्ट सांगायला लागली. म्हणाली, 'माहीत नाही काय काय चालवलंय यांनी ? आपल्या धर्मशास्त्रात काय अशा देवतांची पूजा करण्याविषयी काही सांगून ठेवलंय ? 'इल्लेव्वा', 'करेव्वा' सारख्या मिथ्या देवी देवतांच्या पूजेनं काय कुठं पोरीचा घर-संसार उभा रहाणार आहे होय ?'

चिम्मव्वा सारं उमजली तरीही तिच्या जरा जवळ सरकून कुतुहलानं विचारू लागली, 'कोणाचा घर-संसार काय करणार आहेत ?'

'आणखी कोणाचा, तुझ्या सुनेचाच तर ! त्यांचं डोकं ! तिचा घर प्रपंच फळाफुलाला यावा म्हणून तर तुझी विहीण देवीची पूजा करणार आहे. कोणाला तरी विचारून आलीय. माहीत नाही कसली काय देवी आहे ही ? भूतासारखं रात्रीचं जेवण घालणार आहेत म्हणे. माहीत नाही त्यापायी किती अनाचार.. केवढी हिंसा होणाराय ती ! होऊं दे ! दिवसा उजेडी नाही का हे सारं करता येत ?' असं म्हणत चांगलव्वा चालती झाली.

चिम्मव्वाच्या मनात एकवार विचार आला की घरी जाऊन हे सारं नवऱ्याला सांगायला हवं-पण नंतर विचार केला की, समजा सांगितलं आपण त्याला, तरी त्यावर तो तरी काय करणार ? म्हणून मग गप्प बसली.

अमावस्येला सकाळी सकाळीच स्वयंपाकाची तयारी सुरू झाली. त्या दिवशी आणलेलं पाणी स्वयंपाकासाठी साठवून ठेवलं गेलं. रत्नव्वा झटदिशी बाजारातनं मसाले आणि पूजाअर्चेसाठी लागणाऱ्या वस्तू विकत घेऊन आली. त्या दिवशी पाच शेराचा स्वयंपाक शिजवायचा होता. शेजारच्या दोघी तिघी बायका स्वयंपाकासाठी आल्या होत्या. त्यांनी न्हाऊन, धूतवस्त्र परिधान करून सोवळ्यानं स्वयंपाक करायचा होता. सासरी काम करून करून लेकीचं आधीच भुस्कट पडलं होतं म्हणून रत्नव्वानं तिला कामाला हात लावू दिला नाही. तरीही ती घरातली लहान मोठी कामं उरकीतच होती. तेवढ्यातल्या तेवढ्यात ती पुनः पुन्हा दाराशी जाऊन कोणाची तरी येण्याची वाट पाहात थांबत हाती. दिवस जसजसा वर खायला लागला तसतशी तिची व्यग्रता अधिकच वाढत गेली. थोड्या वेळानं एक बैलगाडी दाराशी येऊन थांबली. तारक्का धावतच गाडी पाशी गेली. सामान उतरवून घ्यायसाठी म्हणून मल्लूही गेला. गाडीत एकट्या फक्त सुंदरव्वालाच पाहून निराशेनं तारानं विचारलं, 'अनंता नाही आला ?'

गाडीतनं उतरता उतरता सुंदरव्वा म्हणाली, 'त्याची परीक्षा जवळ आलीय ना; म्हणून नाही आला, बाळ.'

तारक्काचं तोंड खर्रकन् उतरलं. ती अनंताची वाट पाहत होती. आशा फलद्रूप न झाल्यानं तिचं काळीज भरून आलं.

त्या दिवशी दिवस ढळता ढळता मल्लु हूवण्णाला भेटायला गेला अन् म्हणाला, 'आज रात्री पूजा आहे कसंही करून या आणि थोडा प्रसाद घेऊन जा-'

'आता काय द्यायचं घ्यायचंय ? कशासाठी सारं हे ? माझं आणि तुमचं घर काय वेगळं आहे होय ? बाकी इतर सारी मंडळी येतीलच म्हणा.' तंबाकूचा झुरका घेऊन चिलीम मल्लुच्या हाती देता देता हूवण्णा म्हणाला.

'जास्तीचा आग्रह करीत नाही मी थोडा वरण-भात खाऊन जा. थोडा रूचीपालट होईल. मी स्वत: तुम्हाला सावकाश सांभाळून घेऊन जाईन आणि जेवायला बसवीन. बरं काही कुठं फार मोठं दूर जायचंय अशातलाही भाग नाही.'

'ठीक आहे. बघतो. सारी कामं उरकून घ्या-' हूवण्णा म्हणाला. नेमकं त्याच वेळी चिम्मव्वा बाहेरून आली. जराशा रागानंच म्हणाली, 'काही जायची गरज नाही, आणि कशासाठी जाणार ? बरीचशी गौड मंडळी बोलवतात. समाजातली माणसंही बोलवत असतात. अद्याप त्या कोणाकडं गेला नाहीत. परवा गौड पाटलानं खूप जबरदस्ती करून पाहिली, तरीही गेला नाहीत. त्यांनी हे एवढं परातभर जेवण घरीच धाडून दिलं. मी ते देखील तुम्हाला खाऊ दिलं नाही...' हे सारं ऐकविण्यामागे तिचा हेतू आपल्याला किती लोकांची सहानुभूती आहे हेच दर्शविण्याचा होता.

ते ओळखूनच मल्लु म्हणाला, 'त्यात काय ताई, जिथं चार माणसांबरोबर तुमचे अगत्याचे संबंध असतात, तिथं ते धाडणारच प्रेमानं. आम्हीही तुमचं जेवणं घरी वाढून पाठविलं असतं. पण देवीचा प्रसाद आहे तो. घराबाहेर कोणाला धाडणं निषिद्ध आहे. येवढ्याचसाठी भोजनाचं आमंत्रण करायला मुद्दाम आलोय. घरी नेऊन प्रसाद खायला घालावा यासाठीच बोलवायला आलोय.' एवढं बोलून साऱ्या घरादाराला आमंत्रण करीत आणि हूवण्णाला पुन्हा एकवार यायचं बजावीत मल्लु आपल्या घरी निघून गेला.

मल्लुची पाठ वळताच चिम्मव्वानं हूवण्णाला रागारागानं फैलावर घेत म्हटलं, 'कोणी नुसतं बोलवायचा अवकाश.. लगेच झालेच तय्यार, जसं काही यांना घरात खायलाच मिळत नाही. दुसऱ्याच्या घरी जेवून घेऊन अंथरूण धरलंत, तर इथं तुमची सेवा-शुश्रूषा करायला आम्ही भक्कम आहोत, असं धरून चाललात की काय ? आज चार महिने झाले तुमच्या आजारपणाच्या खस्ता काढता काढता - आणि तुमची सेवा शुश्रूषा करता करता इथं माझ्या कमरेचा काटा ढिला होऊन गेलाय.'

हूवण्णा कण्हत कण्हत डोळ्यात पाणी आणून म्हणाला, 'आज चार दिवस होतील पायानं चालवतच नाही. खोकला वाढलाय.. जर बरं वाटलंच तर जाऊन खाऊन येईन दोन घास प्रसाद. उद्या पुन्हा कधी काही का मी जाऊ शकणार आहे कुठं जेवायला ?

तुझं माहेर आहे. तू आज नाही तर उद्या जाऊन जेवून येऊ शकशील.'

'हो माहेर आहे. ते तर माझ्या वैऱ्यांचं घर होऊन बसलंय. मी मेल्यावर त्यांच्या मुलीला सुख लागणार आहे. ते तर त्याचीच वाट पाहतायत. माझं माहेर तर मला कधीच मुकलंय' म्हणत चिम्मव्वानं बोटं मोडली. 'निर्वंश, निर्वंश होवो मेल्यांचा!' असा आणखी वर शापही दिला.

सूर्यास्त होता होता स्वयंपाक तयार झाला. मल्लनं करेव्वाला काळी साडी नेसवली. ओटीत तांदूळ घातले. तिच्या पुढ्यात वस्त्र अंथरून त्यावर भात आणि पुरणपोळीची चळत रचली. लिंबू कापून दोन बाजूला दोन फोडी ठेवल्या. नंतर उदबत्त्या लावून नारळ फोडला. रत्नव्वानं आई अंबे, माझ्या पोरीचा उद्धार कर. आमचे सारे अपराध पोटात घाल क्षमा कर... असं पुटपुटत देवीला नमस्कार केला. लेकीला हाक मारून तिला साष्टांग नमस्कार घालायला लावला. मल्लनही देवीला साष्टांग नमस्कार घातला. त्यानं मनोमन प्रार्थना केली की, पुढल्या वर्षापर्यंत माझ्या पोरीच्या घरी पोर खेळायला लागलं, तर मी पुन्हा तुला साडी नेसवीन. तोवर काळोख पडून दोन एक तास लोटले होते.

मल्ल मोहल्ल्यात मंडळींना जेवायला बोलवायला गेला. पुरूषांची पंगत जेवून उठल्यावर मल्ल हूवण्णाला बोलावून घेऊन आला. दोघं बरोबरच जेवायला बसले. हूवण्णाच्या तोंडाची चव जरा बदलली म्हणून तो थोडा अधिकच जेवला. जेवताना तो पुनःपुन्हा म्हणत होता, 'मग काय झालं? मरायचं तर आहेच! पाच सहा महिने होतील. गुळाचं तोंड पाहिलं त्याला. हे आजच प्रथम खातोय.'

ह्यावर रत्नव्वानं त्याला प्रोत्साहित करीत म्हटलं, 'काही होणार नाही. देवीचा प्रसाद आहे. सारं तिच्यावर सोडून द्या. सारं काही ठीक होईल.' म्हणून हूवण्णा रोजच्या पेक्षा जरा जास्तच जेवला.

रत्नव्वा त्या दिवशी चिम्मव्वाला बोलवायला गेली. बाहू पकडून तिला जेवायला चलण्यासाठी खूप आग्रह केला. परंतु ती गेली नाही. ती म्हणाली, 'घरच्या सर्वांनीच जेवायला यायची काय गरज आहे, काही लग्न बिग्न थोडंच आहे कोणाचं? सासरा अन् सून दोघंही गेलेत की, तेवढं ते पुरेसं नाही? तिनं भरमालाही रोजच्या पेक्षा जरा लवकरच जेवायला घालून शेतावर धाडलं होतं. त्यानंही जेवायला जाण्याबाबत फारसा उत्साह दाखविला नाही.

पुढला एक महिना हूवण्णा कण्हत कुथत राहिला. नंतर कार्तिकातल्या पावसाच्या गारठ्याच्या तडाख्यात सापडून पुन्हा अंथरूण धरलं. 'व्याह्याच्या घरी पुख्खा झोडून आलात न? बरोबर आजारपण घेऊन आलात? चिम्मव्वानं दहादा ऐकवलं. ती फक्त हूवण्णालाच हे ऐकवून गप्प बसली नाही. सूनेलाही आडून आडून टोमणे मारायला

तिनं कमी केलं नाही. ती कुत्सितपणे म्हणायची, ' ज़ेवायला बोलवून काय खायला घातलं कोण जाणे! चार दिवस यांचं सुखानं रहाणं काही तुम्हा लोकांच्यानं काही धड बघवलं नाही.'

असलं काही कुजकं नासकं ऐकावं लागलं की तारक्काच्या डोळ्यांना टचकन् पाणी यायचं. व्यथित मनानं ती रात्रंदिवस परमेश्वराची प्रार्थना करायची, 'हे आई अंबे, हे प्रभु, आमच्यावर निष्कारण हा लाजिरवाणा ठपका येईल. यातनं आम्हाला सोडव... आमचा सांभाळ कर. मामंजीना एकवार यातनं बरं कर...' परंतु हूवण्णाच्या प्रकृतीच्या एकूण लक्षणावरून ह्यावेळी तो पावसाळा तरी पार करू शकेल किंवा काय याची शंकाच वाटत होती.

जस जसा हूवण्णाचा आजार बळावत चालला तसतसा चिम्मव्वाच्या मनातला संशय वाढत गेला. तिला वाटलं, आपल्या नवऱ्याला ह्यांनी काही तरी केलंय! जोवर तो आहे तोवर माझं चालू शकेल. त्याच्या मागे मला कोण विचारणार आहे ? असा विचार मनात आला रे आला की तिचा संशय अधिकच दृढ व्हायचा. म्हणून एक दिवस ती ज्योतिष-मंत्रतंत्र वगैरे जाणणाऱ्या एका भिक्षुकाकडे विचारायला गेली. या भिक्षुकाचं नाव होतं देवेन्द्र. तो दुपारची वामकुक्षी आटोपून नुकताच उठला होता. चिम्मव्वानं दारात पाऊल टाकताच त्यानं हसून तिचं स्वागत केलं. 'ये चिम्मव्वा.. फार दिवसांनी आलीयस ती ?'

चिम्मव्वा आत येत म्हणाली, 'गुरूजींकडे काही काम असलं, तरच येणं होतं. नाही तर कशाला यायचं ?' नंतर ओसरीत येत म्हणाली, 'जरा पंचाग तर काढा.'

देवेन्द्रनं आतून पंचागाचं गाठोडं आणलं आणि तिच्यापुढं ते ठेवीत ओठातल्या ओठात काही मंत्र वगैरे पुटपुटायला लागला. चिम्मव्वानं पुढं होत दक्षिणा ठेवली आणि नमस्कार करून काहीशी मागे सरकत जवळच बसली. मग थोडं थांबून गुरूजीनं पंचागाच्या गाठोड्याची गाठ सोडताच म्हणाली, 'नीट व्यवस्थित विचार करून सांगा, भाऊ हात जोडते. माझा घरधनी जसा मगदूमच्या घरी जेवून आला तसा तेव्हा पासून त्याचा आजार एकसारखा बळावतच चाललाय. जरा पाहून सांगा-तिथं त्यांनी त्याला काही खायला बियला तर घातलं नसेल ?'

देवेन्द्रनं तिचं सारं म्हणणं लक्ष्यपूर्वक ऐकलं. तीन चार वेळा कवड्या खुळखुळावून दान काय पडतंय ते पाहिलं. काही गणित मांडून हिशोब केला. शेवटी चिम्मव्वाच्या हातात गवताची एक काडी देत ती पोथीत कुठं मनाला येईल तिथं खुपसून ठेवायला सांगितली. चिम्मव्वानं मोठ्या श्रद्धेनं आणि भक्तिभावानं ती गवताची काडी पोथीत एके ठिकाणी खुपसून ठेवली. गुरूजींनी ते पान उघडून पाहिलं. नंतर थोडा विचार करून म्हटलं, 'कोणी सवाष्णीनं केलंय' चिम्मव्वाचा तर्क खरा ठरला. तिनं गुरूजींच्या सांगण्याला

भक्तिभावानं मस्तक हलवित प्रतिसाद दिला. नंतर गुरूजींना हळूच विचारलं, 'यावर काही तोडगा आहे का ? सांगा ?'

देवेन्द्रनं काही विचार करून कपाळाला आठ्या घालीत फासा फेकता अन् म्हणाला, 'काढता येईल. पण त्यासाठी खर्च करावा लागेल.'

'खर्चाच्या बाबतीत तुम्ही मुळीच काळजी करू नका. कितीही का होईना, तो मी करीन, तुम्ही ते करा.'

'यात करायचं काय ? शास्त्रोक्त विधी करून ग्रहांची शांती करीन. इतरांसारखं काळी साडी नेसवा, देवीची पूजा करा. रात्री लोकांना जेवायला घाला. असल्या गोष्टी मला येत नाहीत अन् माहितही नाहीत. सरळ पद्मावतीची प्रतिष्ठापना करून ताईत बनवून देईन. तो हूवण्णाच्या उजव्या दंडाला बांधायचा. बस संपलं काम.'

चिम्मव्वानं पुन्हा एकवार हात जोडून विनंती केली, 'एवढं करून टाक भाऊ. हवं तर एखादा रूपया आणखी घे.'

'तू मुळीच काळजी करू नकोस कसली. मी सारं पाहून घेईन. त्याचा केसही वाकडा होणार नाही. तू पूजेचं सामान घेऊन ये- आणि तेही तुझ्याच्यानं होण्यासारखं नसेल तर तू कोणा बरोबर तरी सव्वादोन रूपये धाडून दे मला. मी सारं काही करीन.'

'रूपये आणून देत्ये.' म्हणत चिम्मव्वा उठून उभी राहिली, तसं आतून देवेन्द्रच्या बायकोनं तिला हाक मारली, 'ये चिम्मा आक्का, आत ये.'

'निघत्ये आता रात्र होईल.'

'होऊं दे-त्यात काय असं; घरात सून आहे, पाहून घेईल.' तिला जरा डिवचण्याच्या स्वरात गुरूजीची बायको मरू देवी म्हणाली.

चिम्मव्वा आत जात म्हणाली, 'हो-हो ना घरातली कामं सून करणार आहे ! सांगितल्या वाचून कोणी आपल्या आपण काम नाही करत. त्यांना सांगण्यापेक्षा आपणच केलेलं बरं.'

'नाही तर काय आज कालच्या मुली करतात तरी काय. मी शेजार पाजारच्या सुना पाहात नाही की काय ? तुमचीचंच तेवढं काय घेऊन बसलात ?'

'साऱ्या सारख्याच. आमच्या तरी भाग्यात हवं ना-' चिम्मव्वानं मध्येच आपलं म्हणणं मांडलं.

मरूदेवी गालावर बोट टेकवीत आश्चर्ययुक्त स्वरात म्हणाली, 'हूं-अग वेडे, तुम्ही लोक आहात जुन्या जमान्यातले तुम्हाला काय माहीत ? फक्त एवढंच म्हणत रहायचं. नशिबात नाही अन् नशिबात नाही !' थोडं थबकून म्हणाली, 'होय ग चिम्मा, तुझ्या विहिणीला उभ्या गावात कोणी शास्त्री-पंडित मिळाला नाही होय, दुसऱ्या गावी जाऊन पूजेचं वगैरे विचारून आली ते ? असं झालंच तरी काय तुझ्या सुनेला ?'

चिम्मव्वा काही सांगणार तेवढ्यात मरूदेवी पुन्हा म्हणाली, 'जे काही करायचं ते केलं, पण गावातल्या कोणा ब्राह्मणाला जेवायला बोलवायचं नव्हतं!' मग पुन्हा हात नाचवीत म्हणाली, 'सोडा हो-आम्ही तरी कुठं अशा अर्ध्यारात्री कशाला कोणाकडे जेवायला जाणार होतो. माझे यजमान-सूर्यास्तानंतर तोंडात पाण्याचा थेंब देखील घेत नाहीत.'

तिनं ही गोष्ट एवढ्यासाठी चिम्मव्वाला ऐक दिली की, तिला उगाच वाटू नये की, मगदुमनं आपल्याला जेवायला बोलावलं नाही म्हणून आपल्या मनात काही राग वगैरे आहे.

'तुम्हाला बोलवलं नव्हतं?' तोंड उघडून जरा थांबून म्हणाली, 'मी स्वतः तरी कुठं गेले होते? तीन-तीनदा बोलवायला आले होते-' चिम्मव्वानं आढ्यतेनं सांगितलं.

मरूदेवी म्हणाली, 'गेली नाहीस? छान झालं. जाऊ दे, जो जेवायला गेला त्याला काय सुख लागलं!'

# 10

लोक नुकतेच हूवण्णाचा अंत्यसंस्कार आटोपून परत आले होते. सकाळची वेळ असल्याकारणानं खूप लोक अंत्यविधीसाठी जमले होते. भरमा स्फुंदून स्फुंदून रडत होता. त्याच्या दंडाला धरून मल्लूनं त्याला हळूच घरात आणलं. मरताना हूवण्णाला जिथं झोपवलं होतं ती जागा शेणानं सारवून घेतली होती. तिथं एक घडा पाणी भरून ठेवला होता. जी मंडळी अंत्यसंस्कारासाठी शवयात्रेबरोबर स्मशानात गेली होती त्यानी तिथून येताना बरोबर आणलेले खडे आणि दर्भ त्या घड्यात टाकून आपआपल्या घरी परतले. चिम्मव्वा बाहेर पडवीत बसली होती. रत्नव्वा तिथं तिच्या शेजारीच तिला सावरून धरीत बसली होती. जवळच एका कोपऱ्यात तारक्का बसली होती. अक्कातायी कुमारिका असल्यानं तिला सूतक नव्हतं, म्हणून ती आत घरात बसली होती. एक दोघी शेजारणी घरातली कामं मार्गी लावण्यात गुंतल्या होत्या. त्याना मदत करण्यासाठी काही हवं नको पाहण्यासाठी अक्कातायी तिथं थांबून राहिली होती.

भरमानं घरात पाऊल टाकताच चिम्मव्वानं हंबरडा फोडला, 'जाळून खाक करून आलास पोरा आपल्या वडिलांना... अरे माझ्या राजा माझं कुंकू पुसून टाकलंस; माझं सौभाग्य नष्ट केलंस... माझा अलंकार... माझा आनंद... सुख-शिणगार कुठं दडी मारून बसलाय... कुठं लपलाय!' मग जरा श्वास घेऊन-'देवा-परमेश्वरा! ही अवकळा आणून सोडलीस तू माझ्यावर... ही अवस्था करून टाकलीस तू माझी !!' असा आक्रोश करीत ती धाय मोकलून रडू लागली.

रत्नव्वानं तिच्या पाठीवरून मायेनं हात फिरवीत तिला जवळ ओढून घेत स्वत:ची आसवं पुशीत तिला धीर देत.. तिचं सांत्वन करीत म्हणाली, 'हं पुरे आता-सावर स्वत:ला. आता कितीही रडलं, आक्रोश केला.. कंठ शोष केला तरी एकदा गेलेलं माणूस परत का येणार आहे? कुठून येणार तुझा राजा आता? तुझं सुख तुझी सत्ता सारं काही तो होता... त्याच्या बरोबर जे गेलं ते आता परत कसं येणार? खूप रडलीस... छाती पिटलीस... डोकं बडवून घेतलं तरी त्याचा आता काय उपयोग आहे? तो तर अशा मार्गानं गेलाय की जिथनं कोणीही परतत नसतं.'

'अगं आई गऽऽ गेलास ना माझ्या राजा... राजारे... अग आई गऽऽ'

कोणी थोरली की धाकटी जाऊ आतून येत तिचं सांत्वन करीत म्हणाली, 'तो तर

गेला - त्याची तिथंही जरूर होती, गेला. ज्यांची इथं जरूर नाही त्यांची तिथंही नाही, अशाना मरणही नाही.'

रत्नव्वा, 'हो, माझ्या व्याह्याची सर्वांना गरज होती. परमेश्वरानं त्याला आणखी चार दिवस काही जगू दिलं नाही.' मग खिन्नपणे मस्तक हलवीत म्हणाली, 'सूनबाईला दिवस गेलेत असं एकवार या कानांनी ऐकूदे - असं म्हणत म्हणतच तर त्यांनी प्राण सोडला !'

चिम्मव्वा रत्नव्वाहूनही अधिक जोर जोरानं आक्रोश करीत रडायला लागली. तिथं जवळच बसलेली तारक्काही मुसमुसून रडत होती. या लोकांसारखं हंबरडा फोडून रडायला तिला येत नव्हतं - म्हणून तिच्याकडे लोकांचं लक्ष कमी होतं. येणारे चिम्मव्वापाशी जाऊन तिचं सांत्वन करीत. देवेन्द्र गुरूजीची बायकोच तेवढी तारक्कापाशी गेली आणि तिरकसपणे म्हणाली, 'हं आता पुरे झालं हे रडणं गागणं - जे होतं ते भल्यासाठीच होत असतं !'

तारक्का मूकपणे हमसा हमशी रडायला लागली. अशा बोलण्याला काय उत्तर द्यावं हे तिला उमगेना... एवढा तिला शोक अनावर झाला होता. पण चिम्मव्वानं या बोलण्याचा अर्थ बरोबर ओळखून, 'तिच्या तर मनासारखंच झालंय, ताई. या लोकांनी त्याला काही खायला घातलं - माझे तर पार हातपायच मोडल्यासारखे होऊन गेलेत -' असं म्हणत हा मोठ्ठा गळा काढून रडायला लागली. रत्नव्वा घाबरली. तिनं चिम्मव्वाचं सांत्वन करीत क्षणभर मनाशी विचार केला. तिला वाटलं की तारक्का आक्रोश करून रडत नाहीए म्हणून चिम्मव्वा हा असला घाणेरडा ठपका आमच्यावर ठेवतेय. थोड्या वेळानं तारक्कापाशी जाऊन तिची हनुवटी धरीत म्हणाली, 'आता कुठून येणाराहेत तुझे मामंजी ! आता कोण तुला तारा म्हणून मायेनं हाक मारील. आता कोणाचं अंथरूण घालशील रोज ?' अशा प्रकारे तिनं लेकीला रडायला धड़ा शिकवला. तसं काही बायका तिच्याकडेही गेल्या.

दुपार झाली. शेजाऱ्यांनी दही आणलं अन् जेवायसाठी उठवलं-तसं रडणं गागणं अधिकच वाढलं. हात धरून उठवल्यावर जेवायला जाऊन बसले. नंतर उन्ह झालं तसं येणारे जाणारे कमी झाले. तेव्हां मग रत्नव्वा गुरांचं चारापाणी पाहायसाठी घरी गेली. वाटेत देवेन्द्र गुरूजीची बायको भेटली-तिनं रत्नव्वाला विचारलं, 'घरी जात्येयस ?'

'हो, सकाळ धरून तिकडेच होते. याना काही घरी जाता येणार नाही म्हणून मीच जरा जाऊन गड्या माणसांकडनं जनावरांना पाणी दाखविणं.... चारा वैरण घालणं याची व्यवस्था करून येत्येय.'

इतक्यात तिकडून चांगलव्वा आली आणि म्हणाली, 'हो कामं तर करावीच लागतात.

मरणारे तर निघून गेले, मागे राहिलेल्यांना थोडंच मरता येतं. कसंबसं आयुष्य रेटणं भाग असतं.'

रत्नव्वा म्हणाली, 'अजून मुलगा अजाण आहे. कसंही का असेना वडील अंथरूणावर बसून होते. पोराला एक आधार तर होता.'

'बरोबर आहे ते सारं-पण कोण काय करणार! कृत कर्म भोगणं भागच असतं. स्वर्गात साक्षात इन्द्र - चन्द्रा सारख्यानाही कर्म भोग सुटला नाही, तर आम्ही बोलून चालून मानव प्राणी कोणत्या झाडाचा पाला ?'

चांगलव्वाचं बोलणं मध्येच तोडीत मरूदेवी म्हणाली, 'मागे रहाणाऱ्यांचं काहीही बिघडत नाही, कसं का होईना चालून जातं. पण जो गेला त्याच्या विषयी काय बोलावं ? बिचारा इतके दिवस कष्ट उपसता उपसता म्हातारा झाला. आता स्वस्थ बसून दोन घास खायचे दिवस आले तर देवानं त्याला उचलून नेलं.'

रत्नव्वा अश्रू ढाळीत तिला म्हणाली, 'एकदा देवाचं बोलावणं आल्यावर त्यापुढं कोणाचा काय उपाय चालणार ?'

'कसा देव माणूस होता - आता जरा कुठं हिंडाय फिरायचं त्राण आलं होतं. थोडं काठीच्या आधारा आधारानं देवळापर्यंतही यायचा जायचा, पुराण ऐकायचा. चिम्मव्वाच्या बिचारीच्या नशिबीच वैधव्य लिहिलं होतं. ती मरती तर काय वाईट होतं ? आता मागनं ही बळकवा बळकवी होणं ठरलेलंच !'

एक दीर्घ श्वास घेत रत्नव्वा, 'कोणचा भाग कोणाच्या वाट्याला जातो...' म्हणत घराकडे निघून गेली.

दु:खाचा तो दिवस कसा तरी सरला. दुसऱ्या दिवशी रक्षा सावडून अस्थी गोळा करण्याचा विधीही पार पडला. दु:खाची तीव्रता जराजरा कमी होत चालली होती. भरमाही मनानं थोडा सावरला - स्थिरावला. चिम्मव्वा रडत रडत आपली निकडीची कामं करायला लागली. दोन चार दिवसांनी वर उल्लेख केलेली बोलणी तिच्या कानापर्यंत गेली. तिनं लेकाला हाक मारून म्हटलं, 'हे बघ भरमा, मी सांगत्येय ते खोटं समजू नकोस. त्यांनी काही तरी. केलंय - तुझी सासू माझ्यावर काही तरी करणी बिरणी करू पाहतेय-'

'निदान आता हे चार दिवस तरी असल्या या गोष्टींचा विचार करणं सोडून दे. आता तिच्या शिवाय आपल्याला कोण आहे ?' संत्रस्त मनानं भरमा म्हणाला.

'काय बोलतोस ? तुझी सासू तर उघड उघड लोकांना सरळ सांगत सुटलीय. ते सारं विसरून उलट तूच तिला आधार मानू पाहतोयस. तू का उगाच त्यांच्या मागे मागे मरतोयस असा ?'

'आई, मला मारून त्यांना काय मिळणार आहे ? त्याना काय खंडीभर मुलंबाळं आहेत होय ?'

'जा, तूच जा आणि रहा त्यांच्याकडे. घर सोडून का नाही मग चालता होत ? माझं त्यांच्या बरोबर मुळीच निभावणार नाही.' रागानं एवढं बोलून आवाज आणखीनच चढवीत म्हणाली, 'आता माझं आहे तरी कोण ? साऱ्यांनी मला कस्पटासमान मानलय - माझा जीवाचा राजा मी गमावून बसले. माझा प्राणनाथ गेला... राजाऽरे राजा... आता तू मला पुन्हा कुठं आणि कसा गवसणार ? कुठून धुंडून आणू तुला ! आता ह्या घरात माझं काय चालणाराय ! आईऽग आई काय करू मी आता ?'

बाहेर गव्हाचा भाव विचारायला गेलेला मल्ल येता येता घरात डोकावला आणि गळा काढून रडणाऱ्या चिम्मव्वाला दाबीत गप्प करीत म्हणाला, 'बस बस पुरे झालं गप्प रहा आता. आता काय घडलंय तुझ्या घरात ? सारी मालकी तर तुझ्याकडेच आहे, नाही कोण म्हणतोय. गपचूप बैस, सारं तुझंच आहे. मुलगा आहे, कामाधामाला सून आहे. त्यांचा सांभाळ करीत...त्यांच्यावर लक्ष ठेवीत आयुष्य काढ.'

भरमनं उठून बाहेर येत विचारलं, 'गव्हाचा भाव काढलात का ?'

'केली गव्हाच्या भावाची चौकशी केलीय. बसवय्या तीन सांगतोय - पण गूळ-तांदूळ वगैरे सारं त्याच्याकडून घेतलं तर काही कमी करील.'

'हां तर...' मग आईकडे वळून, 'आई, कितक्याचे गहू आणायचे ग ? साऱ्या जैनांना जेवण हे घालावं लागणारच...' काहीसं थांबत थबकत भरमानं चिम्मव्वाला विचारलं.

चिम्मव्वा रूक्षपणे म्हणाली, 'माझा जीव कशाला जाळतोयस ? तुझा मामा आहे. सारं माहीत आहे त्याला. त्यालाच विचारून कर ना !'

भरमाच्या मनाला ही गोष्ट बोचली. तो पुढं काही बोलला नाही. मल्लनंच आपल्याला बहिणीला म्हटलं, 'सारं गाव जेवायला येणार, तेव्हां एक पोतं तरी लागणारच. आणा आणि दळाय कांडायची व्यवस्था करून टाका.'

'मला तुझ्यापेक्षा जास्त अक्कल आहे होय ? तुला जे बरं दिसेल ते कर-' मग थोडं थांबून, 'देवा रे देवा... त्याना घेऊन गेलाय आणि काय अवस्था करून सोडलीय बाबा माझी ! का बाबा आणलास हा प्रसंग माझ्यावर... कसले दिवस दाखवतोयस मला...?' असं घोळून घोळून म्हणत तिनं विलाप आरंभिला.

हूवण्णा वारल्यावर मल्ल काही दिवस बहिणीकडेच राहिला होता. कारण भरमाला अद्याप तसा जगाचा काही अनुभव नव्हता.. संसार प्रपंचाचे ज्ञान नव्हते. व्याह्याची उत्तर क्रिया - तेरावे चौदावे आटोपून घरी जावे असा त्याचा विचार होता. त्यात तशी काही अडचण वगैरेही नव्हती. शिवाय हूवण्णा गावची एक लोकप्रिय व्यक्ती होती. त्याच्या नावाला साजेसे संस्कार व्हायला हवेत. त्यात तशी कसली काही अडचणही

नव्हती. घरात देवानं दिलेला पैसा अडका भरपूर होता. तो सारा चिम्मव्वाच्या हाती सोपवून हूवण्णानं प्राण सोडला होता. परंतु सध्या सामान कुठून तरी उधारीनं आणून काम भागवणं होतं. नंतर तीच सारी उधारी वगैरे फेडून टाकील असाच त्यानं विचार केला होता. ह्या गोष्टीचा उल्लेख त्यानं जावयापाशी केलाही होता.

आजकाल घरचं सारं कामकाज तारक्कालाच पाहावं लागत असे. अक्कातायी तिच्या जोडीला आगेमागे असायचीच. चिम्मव्वा पूर्वी सारखी धावपळ करीत काम करायच्या स्थितीत नव्हती. येणाऱ्या जाणाऱ्यांबरोबर एका बाजूला बसून तिला बोलावं लागायचं, त्यामुळे घरच्या आणि बाहेरच्या सर्व लोकांना खायप्यायला घालायची जबाबदारी तारक्कावरच होती; ती, ती मोठ्या काटाकाळजीनं निभावून नेत होती. ती सर्व प्रकारची काम करीत होती; पण एक काम अद्याप तिच्या हाती सोपवलं गेलं नव्हतं. भरमा जेवायला आला की, आक्कातायीच त्याला जेवायला वाढायची. ती नसली तर चिम्मव्वा स्वत: येऊन लेकाला वाढायची; पण ते काम तिनं तारक्कावर कधी सोपवलं नाही. कदाचित हे सारं ध्यानी घेऊनच तारक्काही स्वत: नवऱ्याला जेवायला वाढायसाठी कधी पुढं व्हायची नाही. परंतु भरमा बहिणीची खेळायला जायची वेळ साधूनच जेवायला यायचा. आई कोणाशी बोलण्यात गढली असली तर तो आईला हाक मारून, 'आई, जेवायला वाढ..' म्हणत तिच्या येण्याची वाट बिट न पाहता सरळ पाटावर येऊन बसायचाच. अशावेळी तो तारक्काकडे अशा काही नजरेनं पाहायचा, की जणू त्याला सुचवायचं असे. 'हं चल तू वाढ कशी मला जेवायला!' तारक्का 'आता काय करावं बाई!' अशा विचारात जरा कुठं घुटमळतेय न घुटमळतेय तोच चिम्मव्वा आज्ञा करावी अशा थाटात तिथूनच म्हणायची, 'थांब जरा, ही आल्ये मी.' कधी कधी सवड झाली नाही, तर काहीना काही निमित्तानं त्याला बाहेर धाडायची अथवा लेकीला हाक मारून त्याला वाढायला सांगायची. यावर भरमाचा अगदी निरूपाय होत असे.

एक दिवस मल्लु गहू मोजून मापून घेऊन तिथंच ठेवून घरी यायला निघाला होता तो तेवढ्यात वाटेत देवेन्द्र गुरूजी त्याला भेटला. गुरूजींनी एकवार मल्लुकडे निरखून पाहून घेतलं. ते ध्यानी घेऊन मल्लु काही बोलणार तेवढ्यात देवेन्द्रनं स्वत:च विचारलं, 'समजतंय की तेराव्याची तयारी चाललीय, काय?'

'हो करायची तर आहेच, आज नववा दिवस आहे, एक एक सामान गोळा करता करता दिवस येऊन ठेपलाच की'.

देवेंद्र गुरुजी म्हणाला, 'श्राध्द वगैरे साठी किती खर्च करायचा विचार आहे तुम्हा मंडळींचा... ? एवढा मोठा माणूस निवर्तलाय-'शमेद शिखर' विधी करा. पालखी काढा.'

मल्लुच्या मनात तेरावं मोठ्या प्रमाणात करायचं तर नक्कीच होतंच - पण एवढ्या मोठ्या प्रमाणात ते आयोजित करावं असं मात्र त्याला कधी वाटलं नव्हतं. म्हणून तो

म्हणाला, 'आमच्या सारख्यांना काय गरज आहे पालखी बिलखी काढण्याची ? ते सारं गौड मंडळींना शोभून दिसतं. साधी पूजा श्राध्द - कर्म करुन उरकून घेऊ. अद्याप मुलगाही लहान आहे. एवढा खर्च कशाला ?' असं म्हणता त्यानं त्याचा सल्ला विचारला. देवेंद्र गुरूजींनं भुवया उंचावीत म्हटलं,'तू स्वत: वरून त्याचा विचार करु नकोस. तो गावचा चौगुला होता. गावात त्याला मान - प्रतिष्ठा होती. जाईल तिथं पानसुपारी देऊन त्याचं स्वागत होत असे - हे सारं लक्षात ठेवूनच काम करायला हवं.'

त्याचं ते म्हणणं मल्लुला पटलं, त्यानं विचार केला, 'पालखी काढली तर कसं होईल ?' मग म्हणाला, 'तुमचं म्हणणं बरोबर आहे. सारं काही धूमधडाक्यानं व्हायला हवं. पण त्या साऱ्यासाठी पैशाची गरज आहे ना ? नुसतं बोलून काही काम होत नसतं.'

'काही करावं हे लागणारच आहे. हे तर शेवटचं काम आहे. यानंतर हूवण्णाचं कोणचं असं कार्य व्हायचंय ? हवं तर मी स्वत: संध्याकाळीच येऊन चिम्मव्वाशी बोलून घेतो.' देवेन्द्रानं अशा काही ठामपणे हे सांगितलं, की जणू काही त्याचा शब्द मोडायची चिम्मव्वाची प्राज्ञा नव्हती.

मल्लु पुढे होत म्हणाला, 'या ना, मना कोण करतोय.'

देवेंद्र गुरुजींनं कल्पना नाही काय सांगितलं, पण चिम्मव्वाच्या आग्रहावरुन पालखी काढून श्राध्द मोठ्या थाटात करायला हवं हे नक्की झालं. तेराव्या दिवशी श्राध्दाची पूजा आणि पालखीचं काम पुरं करण्यात यावं. त्या दिवशी चारसहा मणाचा स्वयंपाक शिजवून आपल्या स्नेही संबंधिताना आणि ज्या मंडळींनी शवाला खांदा दिला होता त्या सर्वांना जेवायला बोलवायचं ठरलं. दुसऱ्या दिवशी गावजेवण घालावं असं ठरलं. गुरुजींच्या सल्ल्यानुसार कार्यक्रम दोन दिवस चालणार होता. कार्यक्रमानुसार आज शवाला खांदा देणाऱ्यांचे सूतक समाप्त करणे होते. पालखीच्या समोर बॅन्ड वाजवायसाठी दुसऱ्या गावाहून बॅन्डवाले बोलावले होते. घरात नातेवाईकांची गर्दी व्हायला लागली होती. हूवण्णाला नैवेद्य दाखविल्या वाचून पिंडदान पूर्ण झाल्या शिवाय चिम्मव्वाला तोंडात पाण्याचा थेंब घेता येणार नव्हता की काही खाता येणार नव्हते. या साठी तिला वेळोवेळी चहा करुन दिला जात होता. चिम्मव्वा आज बसून चहा पीत होती. त्याच वेळी ऐनापूरहून सुंदरव्वा येऊन पोहोचली. हूवण्णा वारल्याचं तिला कळलं हे होतंच - पण एकदा समाचाराला येऊन जा - पुन्हा तेराव्यासाठी या, अशा पुन्हा: पुन्हा खेपा घालीत बसणं कठीण होतं, म्हणून ती आज आली. यांच्याच घरी यायचं होतं म्हणून मल्लुच्या घरी न जाता ती सरळ इकडेच आली. घराच्या फाटकाशी सुंदराबाई पोहचताच चिम्मव्वाला ती आल्याची बातमी आत पोहोचली. सुंदरव्वा आत गेली. चिम्मव्वा घाईघाईनं चहा भुरकून बाहेर येत 'आता आलीस हो ताई आपल्या विहिणीच्या समाचाराला ?' म्हणत कपाळ बडवू लागली. बैठकीत येऊन बसत, 'अग आई गऽऽऽ माझा राजा सोडून

गेला मला, ताई.' सुंदरव्वाही रडत रडत तिच्या जवळ जाऊन बसली आणि म्हणाली, 'आता दु:ख आवरा. रडणं पुरं करा. तुम्हा मंडळीच्या हातनं तो देवाघरी गेला. मुलगा मोठा झालाय. जाणता झालाय. लग्न झालंय. त्याच्या साऱ्या इच्छा पूर्ण झाल्यान. जो पर्यंत तो जिवंत होता तो पर्यंत तुम्ही सर्वांना त्याची खूप सेवा शुश्रुषा केली. त्याला कसले दु:ख कष्ट दिले नाहीत. त्याच्या बरोबर निभावून घेतलं शक्य तेवढी दवादारु केलीत...' अशा प्रकारे तिचं सांत्वन करीत - 'बृहस्पतिवारी सकाळी गेले नव्हे? आम्हाला वेळेवर निरोप मिळाला नाही - म्हणून आज आलेय...' अशा प्रकारे एवढे दिवस न येण्याचं कारण सांगून टाकलं.

चिम्मव्वा डोक्यावर हात ठेवून बसली आणि, ' हां ताई, ते तर गेले निघून, कोणी येऊन तरी काय करणार होतं म्हणा? बुधवारी रात्री श्वास घुमटायला लागला...सारी रात्र जागून काढली...' नंतर एक दीर्घ निश्वास टाकीत - 'उजाडता उजाडता जरा शुध्द आली, आम्हाला वाटलं चला वेळ टळली - वाचले आता यातनं. पण कसचं काय अन् कसचं काय! सकाळी देवेन्द्र गुरुजी आणि आमचा भीमप्पा दोघंही आले. ती अनुभवी माणसं आहेत. ते म्हणाले नाडी धड लागत नाहीए - दान करा.' मग स्फुंदून स्फुंदून रडत म्हणाली, 'त्यांच्या हातापायांना स्पर्श करुन पाहिला तर ते बर्फासारखे थंडगार पडलेले. तेव्हा घाबरुन मी छाती बडवून घ्यायला लागले - माझा राजा मला टाकून गेला होता. पोरानं शास्त्री - पंडित आणि भटा ब्राह्मणांना साऱ्यांना बोलावलं. दहा रुपये आणि तांदुळ दान केले. खालच्या जातीतल्या गोरगरीबांना चार मण मका दान केला.' मग मोठमोठ्यानं गळा काढीत 'इतकं केलं अन् कानात 'नमोकार' मंत्र उच्चारताच प्राण गेला, ताई! हाय!' म्हणत आक्रोश करु लागली.

'हां ताई, माझे सासरे वारले तेव्हा वीस रुपये आणि धान्य दान केलं होतं. आणि पाच मण गहू घरच्या खालच्या जातीच्या नोकरांना दान केले होते. करायला गेलं तर काय मोठी गोष्ट आहे. माझे सासरे सत्पुरुष होते. आम्ही चांदीची फुलं बनवून घेतली, सगळ्या मुलानातवांनी ती त्यांच्यावर उधळली.'

'आमच्या यांच्यासाठीही करण्यात आम्ही कसली काही उणीव राहू दिली नाही. मल्लप्पानं तरी जरा मागंपुढं केलं - पण मी त्याचं एक ऐकलं नाही. सारं काही केलं. माझ्यासाठी यानी मर्जीला येईल ते करावं...' असं म्हणत रडायला लागली.

बाहेर पाण्याची घागर ठेवून भीमप्पा आत आला आणि तिला गप्प करीत म्हणाला, ' आता पुरे हां, पुरे. बस् झालं. तू मेल्यावर काय केलं जाईल हे पाहायला तू थोडीच असणार आहेस? त्याची काळजी तुला कशाला? हूवण्णाचं सारं क्रिया कर्मांतर व्यवस्थित करुन तू चार लोकांच्या तोंडची शाबासकी मिळविलीस - तुझं करून तशीच शाबासकी मिळवावी असं त्यांना वाटलं तर ते करतील, नाही तर दे सोडून. तेव्हाची गोष्ट तेव्हा.

आता आहे हे भोगायला हवं. हे कुठलं काय डोक्यात घेऊन बसलीयस ?'

चिम्मव्वानं डोळे पुसत सुंदराव्वाला विचारलं, 'तुझ्या बरोबर कोणी नाही ?'

थोरल्या मुलाला बरोबर आणलंय.'

'अच्छा अंता आला आहे तर ? कुठं आहे ? बोलाव तर खरं पोराला भूक लागली असेल, काही खाऊन पिऊन घेऊ दे...?'

तेराव्याचे सारे विधी पार पडले. पण इथं एक गोष्ट सांगायचीय. ज्या दिवशी सारा गाव जेवायला घातला त्या दिवशी संध्याकाळपर्यंत काम करुन नंतर न जेवता खाता भीमप्पा तसाच उपासपोटी घरी निघून गेला. सूर्यास्तानंतर रात्री कोणी तरी ही गोष्ट चिम्मव्वाला सांगितली - लगेच चिम्मव्वानं एका माणसाकरवी त्याला बोलावणं धाडलं - पण भीमप्पा काही आला नाही. बोलवायला गेलेल्या माणसानं येऊन सांगितलं, 'तो म्हणतो की घरात घरावाल्यांचा कारभार आहे, आम्हाला कोण विचारतोय ? भावकीतली सारी मंडळी बरोबर बसले - त्यांच्या बरोबर बारा दिवसांचं सूतक मीही पुरं केलं. पोरगा म्हणाला होता की, काका तुम्ही या पंक्तीला का नाही बसून घ्या, पण त्या मगदुमच्या मल्लनं 'आत्ता कशाला, दुसऱ्या पंक्तीला का नाही बसत' असं म्हणून मला उठवलं - काय आम्ही याच्या घरी गेलो होतो असलं हे ऐकायला ? मी पुन्हा तिकडे मुळीच फिरकणार नाही जेवायला.'

हे ऐकून चिम्मव्वा जवळच उभ्या असलेल्या मल्लला सुनवीत म्हणाली, 'मल्लला कोणाला काय बोलावं एवढी साधी गोष्ट समजू नये ? आज तो असलं काही बोलून आपल्या घरी निघून जाईल - पण उद्या आम्हालाच नातेवाईकांची गरज लागणार आहे.' नंतर स्वत: भीमप्पाच्या घरी त्याची समजूत काढून जेवायला बोलवून आणायसाठी गेली. तरीही तो गेला नाही. शेवटी त्याचं जेवण ताट वाढून त्याच्या घरीच धाडण्यात आलं.

तेरावं उरकल्याच्या दुसऱ्या दिवशी दुपारी अनंत आतल्या एका खोलीत झोपला होता. त्याच्या मनात विचार तरंग उमटत होते,तारक्काला रात्रंदिवस काम करावं लागतं. या घरात तिला साधं 'तू काही खाल्लंस की नाही ?' दमलीस ग पोरी ?' असं आस्थेनं विचारणारंही कोणी नाही. काल पासून पाहतोय तिला एक क्षणाची उसंत नाही. हाच विचार करता करता त्याला झोप आली. त्या अर्ध निद्रिस्त - अर्धजागृत अवस्थेत तारक्काची मूर्ती त्याच्या मनोजगतात उभी होती. निरुत्साहानं भरलेला सुकला - कोमेजला चेहरा होता तो. बाळपणी ते एकत्र खेळत तेव्हां तिची मुद्रा कशी फुललेली असायची. त्या फरकाच्या जाणीवेनं तो कष्टी झाला. त्याने डोळे उघडले - समोर भरमा उभा होता. - म्हणत होता,'कधीचे झोपलात, उठणार नाही ? थोडं खाऊन घ्या. झोप वगैरे तर नाही ना आली ? ' असं म्हणत म्हणत भरमा त्याच्यापाशी बसला.

'दोन दिवसापासून झोप व्यवस्थित होत नाही. परवा रात्री पूजा आणि पालखी होती त्यातच सकाळ उजाडली. काल रात्री बराच उशीरापर्यंत घरात खाणंपिणं चाललं होतं...' मग थोडं थांबून डोळे विस्फारीत भुवया खालीवर करीत विचारायला लागला, 'लोकांचं सामान परत करायचं काम पुरं झालं का ?'

ह्या चार पाच दिवसात एकत्र रहाणं घडल्या कारणानं अनंत आणि भरमाचा परिचय वाढत गेला होता. त्या शिवाय भरमा आता तसा खूपच समजदारही झाला होता. त्या बरोबरच डोक्यावर आता जबाबदारी पडल्यानं इतरांशी कसं वागावं याचं भानही त्याला आले होते.

'आता सारं उरकत आलंय. मामा जर चिकोडीहून कापड घेऊन आले तर सारं काम पुरं झाल्यातच जमा आहे. आता इथं राहिलेल्या मंडळींना जेवायला घालून पाठविण्याचंच काय ते बाकी राहिलंय.' भरमा म्हणाला.

'अजून कुठनं काम पुरं झालंय ? डोक्यावर एकदा का जबाबदारी येऊन पडली की काही ना काही काम मागे लागलेलं राहतंच...' नंतर काही विचार आल्यानं अनंतानं विषय बदलला आणि म्हटलं, 'आता बाकीचं काम चिम्मव्वा मामी सांभाळतील म्हणा.'

त्याचं बोलणं कुठं पुरं होतं न होतं तोच भरमा काहीशा नाराजीनं म्हणाला, 'ती काय सांभाळणार ? जर ती अशी सांभाळणारी असती, तर ही अशी अवस्था का होते ?'

'ठीक आहे, त्या वडीलधाऱ्या आहेत. कसंही करून त्याना सांभाळून घेऊन तुम्ही दोघं नवरा बायको व्यवस्थित राहा म्हणजे झालं.' अनंतानं शांतपणे त्याची समजून घालीत त्याच्या मनाचा ठाव घेण्याचा प्रयत्न केला.

'ते बरोबर आहे.' असं म्हणत भरमा अनंताला दुपारच्या फराळाआराळासाठी घेऊन गेला.

ह्या बोलण्यानंतर अनंताला भरमाच्या मन:स्थितीचा काहीसा अंदाज आला. या आधीच त्याला तारक्काची मनोदशा पूर्णपणे कळून चुकली होती. त्याला उमजलं की आतल्या आत भरमाचं मन तारक्काकडं आणि तारक्काचं मन भरमाकडे ओढ घेतंय. प्रथम प्रथम तारक्कानं नवऱ्याचा कल पाहून त्याचा आधार घ्यायचा, त्याच्यावर भार टाकायचा प्रयत्न केला. पण भरमा मागे सरला. आता भरमा आपल्याकडून पुढाकार घ्यायचा प्रयत्न करतोय, तर पहिल्यापासूनच निराशेनं ग्रासलेली तारा मागे मागे सरकतेय. दोघांचाही हृदय सागर काठोकाठ भरला होता, पण मध्ये एक अडथळा आहे तो उल्लंघून पार करण्याची तीव्रता दोघातही नाही. कमीत कमी त्याना एवढं जरी उमजलं की, आज ना उद्या आपलं मिलन होईलच होईल, तरी खूप झालं. आज नाही तर उद्या वादळ घोंगावत येईल... लाटा वेगानं उसळतील आणि मधले सारे अडथळे झुगारून देऊन उभय हृदयसागरांचे मीलन घडून येईल. हा विचार मनात डोकावताच अनंताच्या

विशाल हृदयात कुठं तरी एका कोपऱ्यात तीव्रतम असंतोषाचा एक ओरखडा उमटवून गेला.

अनंत आता मोठा झाला होता. तो दहावीत शिकत होता. त्याच्याली विचारशक्ती दिवसेंदिवस वाढत होती. परवा भरमाशी बोलताना त्याचं मन तारक्कासाठी व्यथित झालं... कळवळून उठलं. त्याच्या घरी जाण्याच्या आदल्या दिवशी सायंकाळी चिम्मव्वा देवळात गेली होती. सुंदरव्वा पडवीत आक्कातायीशी गप्पगोष्टी करीत बसली होती, भरमा कुठं बाहेर गेला होता. तारक्का स्वयंपाक घरात एकटीच होती, सकाळचं उरलेलं दूध चुलीवर तापवीत होती. अनंत पाणी प्यायच्या मिशानं आत गेला आणि खट्याळपणे हसत काहीश्या थट्टेने विचारलं, 'काय गं तारा भरमासाठी प्यायचं दूध गरम करत्येस होय ?

'हो, मी करत्येय दूध गरम ! त्यांना दूध गरम करून देऊन प्यायला देणारे इतर आहेत की... तेवढा अधिकार मला कुठला ?' तारक्कानं अगदी सहज शांतपणे सांगितलं. अंतरीचे बोल होते ते.

'तुला अद्याप हा अधिकार मिळाला नाही?'

तारक्का गप्प राहिली.

'इतक्या दिवसांची सर्व्हिस झालीय, कधी मिळणार ?'

अनंतातचं विचारणं नीटसं न ध्यानी आल्यानं तारक्कानं 'काय ?' म्हणून विचारलं.

'एवढी चाकरी केलीस, अजूनही अधिकार प्राप्तीची आशा नाही?'

'मिळेल ना, आज नाही तर उद्या.'

'असं म्हण, मी कशाला गरम करू असं कां म्हणत्येस !'

'वाघिणी सारखी आई आहे खायला प्यायला घालायला, त्या शिवाय पुन्हा बहीण आहे इतर कामांकडे लक्ष पुरवायला ! त्याना माझी काय जरूर ? मी जेवायला वाढलं तर म्हणे नजर लागते त्याच्या जेवणाला... घास बसतो त्यांचा... म्हणून मला...'

'आणखी वर पुन्हा दृष्ट लागते. असं कोण म्हणतं ? ही आपली गांवढळ समजूत झाली. लोक रोज हॉटेल मध्ये एकमेकांसमोर बसून खातात, जेवतात, त्यांना कुठं नाही काही होत ! घरी स्वत:च्या पत्नीनं जेवायला वाढलं तर काय नजर लागते होय ?' तारक्काच्या मनातलं जाणून घेण्यासाठी अनंतानं म्हटलं.

'तुमच्या शहरात दृष्टीबिष्टीची काही भानगड नाही. आमच्या गावात काहीही घडू शकतं - होऊ शकतं. समजलं !' तारक्का उद्‌गारली. मग थोडं थांबून म्हणाली, 'अन् शिवाय आमच्या घरी तर फार झटकन लागते. माहीत नाही काय प्रकार आहे कोण जाणे ? कदाचित आमच्या घरचं लक्षण असणार ते...' तारा अनंताकडे पाहात म्हणाली. चुलीतल्या जाळाच्या प्रकाशात अनंताला तिची मुद्रा चिंतेच्या चितेगत भासली.

'या घराचं लक्षण नव्हे, तुझं लक्षण आहे-' अनंतानं थोडं हास्य निर्माण करण्याचा वातावरणात जरा खेळकरपणा आणण्याचा प्रयत्न केला.

'तर हे माझं लक्षण आहे! मी कुठं आणखी कोणाचं आहे म्हणत्येय? जर कोणी कोणाला आवडत नसेल, तर सारी लक्षणं वाईटच दिसायला लागतात. जर मी कोणाला पसंत असते... आवडत असते, तर माझी ही अशी का दशा होते?'

'तू कोणाला आवडत नाहीस?' मधला दुवा पकडीत अनंतानं कुतुहलानं विचारलं.

'सगळ्यांनाच-'

'सगळ्यांनाच-भरमाला देखील?'

'त्याना तर मी प्रथमपासूनच आवडत नव्हते.' मग ती थोडं थबकली... बाहेरून कोणी येत तर नाही? याचा कानोसा घ्यायला प्रयत्न करू लागली - तिचा भाव हेरून अनंत म्हणाला, 'कोणी नाही.'

नंतर तारक्का एक उष्ण निश्वास टाकीत म्हणाली, 'मी जर त्याना पसंत असते, तर हे सारं कशाला घडतं? हे लोक मला उकिरड्यावर पडलेल्या केरकचऱ्याप्रमाणे कां मानते?'

'कोण तुला उकिरड्यावरचा कचरा समजतो? का तू असं मनात आणत्येस...' भरमाची मन:स्थिती व्यक्त करण्यासाठी अनंताच्या तोंडून हे शब्द फुटले.

'तर मग याचा इन्कार कोण करतोय. हे कोण नाकारतोय ते तरी कळू दे?'

'ते सांगायची काय आवश्यकता आहे?' अनंता काही काळ गप्प बसला. तारक्काही गप्प राहिली. परंतु बोलणं अर्धवटच सोडून दिलं म्हणून अनंताकडे पाहायला लागली. 'आता तुला काय झालंय?' अनंताने विचारलं, बोलणं संपत आलं होतं.

'मला काय झालंय? हो, कुठं काय - काहीही नाही. सारं काही ठीक आहे. काही आजार बिजार नाही. अंथरूण धरून पडलेलीही नाही. असंही नाही की, मी आज उद्याकडे मरणार आहे. सर्वांसारखं खाते पिते - आणि सर्वांसारखं कामही करत्ये. काय असं नाहीए?'

तिचं हे बोलणं ऐकून अनंताला वाटलं की, कोणी आपल्या काळजाला चर्रकन डागच दिलाय. 'मी असं का म्हटलं...' या विचारानं तो दु:खी झाला. तो व्यथित स्वरातच म्हणाला, 'आता का या असल्या गोष्टींची इच्छा करत्येस. आज ना उद्या सुख लाभेलच. नवऱ्याबरोबर चार दिवस संसार कर... मुलं बाळं होऊं देत... मग मर हवं तर-' तिला धीर दिलासा द्यावा. तिचं सांत्वन करावं या हेतूनं तो हे बोलला.

तारक्का मुकाटपणे बसून होती. चुलीत बराच वेळ विस्तव जळत होता. तारक्कानं सहजगत्या हातानं जळती लाकडं आत सारली. बोलण्याच्या नादात तापत ठेवलेल्या दुधाचं तिला भान राहिलं नाही. दूध उकळलं आणि एकदम वर येऊन उतू जायला

लागलं. तसं चुलीवरचं भांडं उतरवीत ती म्हणाली, 'कोणाला हवी आहेत इथं पोरं खड्ड्यात भिरकवायला !'

तेवढ्यात अक्कातायीनं बाहेरनं येत विचारलं, 'दूध उतू गेलं वाटतं ?'

अनंत जागचा उठला. बाहेर जाता जाता फक्त तारक्काच्याच कानी पडावं अशा बेतानं म्हणाला, 'असं काही म्हणशील, तर आपलेच हात पोळून घेऊन सारं काही गमावून बसशील.'

तारक्कानं अनंताकडे वळून पाहिलं. न कळत त्याच्या या उद्गारांची पुनरूक्ती केली.

# 11

हूवण्णाच्या उत्तरक्रियेसाठी आलेली आप्तेष्ट मंडळी परत गेल्यावर मल्लनं जावयाला एका बाजूला बोलावून म्हटलं, 'सारं सामान बसवय्याच्या दुकानातनं आणलं होत. कापडचोपड आणि इतर सामानासाठीही त्याच्याच कडून पैसे उसने घेतले होते. सारे मिळून अडीचशे रुपये खर्च झालेत. आईकडून घेऊन ते सारे चुकते करुन टाक. द्यायला वेळ लावणं बरं नाही. आता मी आपल्या घरी जातो. दहा पंधरा दिवसात शेताकडे फिरकणं जमलं नाही. तिथं काय झालं असेल कोण जाणे !

भरमा मामाला म्हणाला, 'आईला सांगून तुम्हीच कर्ज चुकतं करुन जा. त्याला कशाला उगीच टांगणीला लावायचं ? कधीही का होईना बसवय्याला त्याचे पैसे द्यावे हे लागणारच आहेत.'

बाबा, 'आता तुम्ही लोकांनी तुमची कामं तुमची तुम्हीच करायला हवीत. ही तुम्हा मंडळींची खाजगी बाब आहे. आम्ही नातेवाईक आहेत. आम्ही यात जास्त लक्ष घालणं उचित नव्हे. तुम्ही यात कशाला लक्ष घालता ? असं म्हणायची चिम्मव्वाला संधी मिळता नये. त्याच दिवशी मी गेलो असतो, पण मी विचार केला की, हे बरं दिसणार नाही. कामं जसच्या तसं पडलं होतं. जे काम मी हाती घेतलं ते पुरं केलं. आता तुमचं काम तुम्ही पाहा.' या सर्व गोष्टी शांतपणे समजावून सांगून मल्ल निघून गेला.

दुसऱ्याच दिवणी बसवय्याचा माणूस भरमाकडे पैसे मागायला आला. भरमा स्वत: दुकानावर जाऊन सांगून आला की, उद्या काही ना काही व्यवस्था करुन देऊन टाकीन,' हे सांगतांना सुध्दा त्याची मन:स्थिती काहीशी विचित्रशी होऊन गेली. घरच्या असल्या कामात त्यानं आजवर कधी पुढाकार घेतला नव्हता. त्याचा अनुभवही त्याला नव्हता. भरमा दुकानातनं परतला तो सरळ आईपाशी गेला. त्यानं आईबरोबर दुकानदाराला द्यायच्या पैशाविषयी बोलणं केले. त्यावर ती म्हणाली, 'घरात सामान आहे, गायी-म्हशी आहेत. बायकोचे दागदागिने आहेत, काही ना काही करुन तू कर्ज चुकते करायला हवेस. तुझे वडील आपल्या उत्तरक्रियेसाठी तुला भिकारी करुन तर काही गेलेले नाहीत.'

भरमा ते ऐकताच गप्प झाला. पण त्यानं विचार केला. 'बाबांनी आईच्या हवाली ढिगभर रूपये केले. हेतू असा की त्यांच्या उत्तरक्रियेबाबत आम्हाला कसली काही अडचण जाणवू नये. असं असतांना तिनं पैसे का देऊ नयेत ?' दुकानाचा नोकर जेव्हा

पुन्हा दुसऱ्यांदा पैसे मागायला आला तेव्हा भरमानं जरा विचार करुन त्याला दूर नेत म्हटलं, 'आईकडे जाऊन पैसे माग.'

नोकरानं चिम्मव्वाकडे जाऊन पैसे मागितले. तसं ती म्हणाली, 'मी कोण आहे बाबा या घरात ? मी तर मुलानं आणि सुनेनं दिलेले भाकरीचं दोन तुकडे खाऊन एका कोपऱ्यात मुकाट पडून राहणारी कुत्री आहे कुत्री. हे होते तो वर मी काय केलं नाही ? हवं तेवढं दिलं घेतलं आता माझं कुठं काय चालतंय ? सारं कराय पाहायला बरोबरीचा जाणता मुलगा आहे. त्याला सोडून माझ्याकडे कशाला येता ?' थोड्यावेळानं अगदी गळा काढून तिनं विलाप आरंभिला. 'मला काय माहीत हे असलेही दिवस माझ्यावर ओढवतील ? माझ्यापाशी काही उरू नये अशा विचारानंच तें मला देऊन गेले ? हाय रे माझ्या राजा. राजा माझ्या !' त्या नोकराला काहीच उमजेनासे झाले. तो सरळ परत गेला.

दोन दिवसांनी बसवय्यानं मल्ल आणि भरमा दोघांनाही बालावून घेऊन साफ साफ म्हणाला, 'सामान हवं होत तेव्हा आरामात घेऊन गेले. आणि आता मुलगा अन् आई एकमेकांवर ढकलताहेत. ह्या पुढे काय आम्हाला उधार देता येईल ?'

मल्लनं त्याला दिलासा दिला, वस्तुस्थिती समजावून सांगितली. त्या शिवाय दोन दिवसात काही ना काही व्यवस्था करू म्हणून सांगितलं. भरमाला म्हणाला, एक वार पुन्हा आईला विचारून पाहा, जर नाहीच काही जमलं तर काही ना काही करून चुकते करुन टाकू.' असं म्हणून तो निघून गेला.

त्याच दिवशी दुपारी भरमानं पुन्हा एकदा आईला विचारलं, आई, सध्या तुझ्या जवळचे पैसे दे. उद्या चैत्राचं पीकपाणी हाती पडंल की कापूस विकून परत घे. घरात जे काही आहे ते सारं तुझंच आहे,. आम्ही यातला एक सुतळीचा तोडा कुठं आम्ही बाहेर नेणार नाही. असं काय करत्येस ? चार चौघात माझ्या तोंडाला असं काळं कां फासतेस. आनंद का होतो तुला ह्या अशा वागण्याचा. बरं वाटतं तुला हे ? दाटल्या गळ्यानं तो तिच्या मिनतवाऱ्या करीत होता. त्याच्या आवाजात एक दीनवाणेपणा होता.

'नाही, माझ्यासाठीही काही शिल्लक राहू दे. तुम्ही लोकांनी काही काम करून तर नाही दिलंय. वाडवडिलांच्या कमाईचं आहे हे त्यांनी मला दिलं होतं. तू काय कमावून देणार आहेस ते स्पष्टच दिसतंय. त्यांनी दिलेलं तू मागृता नयेस-आणि मी ही देता नये.' चिम्मवानं या साऱ्या गोष्टी मोठ्या शांतपणे संगितल्या. भरमा काहीसा चिडला. त्यानं डोळे लालीलाल करीत विचारलं, 'अशा वेळी पैसे कामी आले नाहीत, तर ते पैसे काय कामाचे ? तू काय सांगत्येस मला. मी गाय-म्हैस विकून पैसे चुकते करुन टाकीन.'

ते मेलेत असं समजून तू माझ्यावर डोळे वटारतोयस होय ?' जरा पुढं सरकत संतापानं

कपाळ झोडून घेत ती म्हणायला लागली. 'तुला मला मारायचं तर घे मारून, मला माहीत आहे हे सारं तुला कोणी शिकवलंय ते. त्याच्याकडून शिकून आलास आणि माझ्यावर डोळे वटारायला लागलास हो ? हे बरं नाही पोरा. मी तुला जन्म दिलाय याची तर थोडी लाज बाळग. घरचा कारभार हाती आला म्हणून असं वागायला नकोस तू.'

'निरर्थक बडबडू नकोस. कोण कशाला शिकवायला येईल मला. उगाचच एखाद्याचा संशय घेणं बरं नव्हे.'

'का येऊ नये संशय. तसं मुलगी वयात येत चाललीय, तिचंही लग्न तर करून द्यायचंय- तिला सासरी धाडायचयं. बास् तुला देऊन मी काय नुसती हात हलवीत बसून राहू ?'

भरमानं तिच्या त्या बोलण्याला काही प्रत्युत्तर केलं नाही. काही वेळ तसाच उभा राहिला. त्याच्या मुद्रेवरचा रंग पालटायला लागला. रंग बदलता बदलता अखेर लालीलाल झाला. ओठ हळू हळू थरथरायला लागले. हलू लागले. 'संभाळ तुझं तू घर' असं म्हणत बाहेर निघून गेला. चिम्मव्वानं त्याच्याकडे पाहिलं, एक उपहासगर्भ हास्य करीत गप्प बसली. थोड्यावेळानं तारक्का बाहेरनं आली. ती तिला म्हणाली, 'तुझा नवरा भांडण करुन घरातून निघून गेलाय.'

तारक्का उगी राहीली. तिच्या ओठावर आशा निराशायुक्त एक स्मित तरवळून गेलं. ते पाहून चिम्मव्वा म्हणाली, 'अच्छा, तुम्हा लोकांचं हे कारस्थान आहे तर! म्हणून त्यानं हे असं थैमान घातलं होतं तर ? त्याला पढवून जे काय करायचं असेल, खुशाल करा तुम्ही.' मग बोट मोडीत रागाने म्हणाली, 'मायलेकरात भांडण लावून दिलंत.'

तारक्का म्हणाली, 'कोण शिकवतोय अन् कोण पढवतोय ? असं पढविणारांचं तळपट होवो.' मग संतापून म्हणाली, 'निष्कारण आमच्या नावानं कां जळत्येस अशी ?

'मी कशाला जळू-तुझ्या नावानं ? हाय, घरात सारेच मला धाकदपटशा दाखवायला निघाले जणू ? माझच नशीब खोटं त्याला तू तरी काय करशील ?' असं म्हणत गळा काढून एक तासभर जोरजोरात रडत राहिली. शेजारपाजारच्या पाचसहा बायका गोळा झाल्या. त्यातही एकजण म्हणाली, 'हुवण्णा बाहेरून वगैरे यायचा. समोर बसून चहा करायला सांगायचा. चहा करवून घेऊन प्यायचा. चहाची वेळ झाली की चिम्मव्वाला त्याची आठवण होते; म्हणून बिचारी अशी रडत्येय. काय करणार ? देवानं त्याला उचलून आपल्या पायाशी नेलं.'

'सारं घर खायला येतं. वेळ जाता जात नाही. काम कितीही केलं तरी वाटतं काहीही काम झालं नाहीए.' असं म्हणून चिम्मव्वा गप्प बसली.

जमलेल्या बायका तिचं सांत्वन करून आपआपल्या घरी जायला निघाल्या. घराबाहेर पडताच त्या आपआपसात बोलू लागल्या.

एक शेजारीण तिरस्कारानं म्हणाली, 'हे आत्ता मायलेक कशावरुन तरी जोरजोरात भांडत होते. ही कुठची निघालीय आपल्या नवऱ्याची आठवण काढायला...'

आणखी एकजण म्हणाली, 'भांडणाशिवाय दुसरं काय करणार ? मुलाला अन् सुनेला तर नुसतं काट्यावर नाचवत असते, हिनंही कधी सासूरवास भोगलाय. म्हातारी झालीय. जराही समज शहाणपण येऊ नये का ?'

दुसरी त्याला पुस्ती जोडीत पुढं म्हणाली, 'पोरगी कशी सोन्यासारखी आहे हो. रात्रं दिवस दिवस काम करता करता सुकून कशी चिपाड होऊन गेलीय ?

मध्येच त्याला एक म्हातारी पुढं होत म्हणाली, 'तुझं आपलं हे काही तरीच ! काम केल्यानं काय होतंय ? आमच्या पोरीबाळी नाही कामं करीत ? नवरा बायकोत जर गुळपीठ असेल. एकोपा असेल, तर कष्ट उपसल्यानं काही बिघडतं थोडंच ? पोरी मजेत राहतात.'

पहिलीनं नवलानं म्हटलं, 'सोडा हो. अद्याप पोरीला नवऱ्याच्या बिछान्यात झोपायला जाऊ दिलं नाहीए हिनं. परवा पोरगी आमच्या घरी दळायला आली होती. अगदी शपथ घालून विचारलं तेव्हा सांगितलंय हो. चिम्मव्वाचा या मागे काय डाव आहे कोण जाणे !'

'तू बिछान्याचं म्हणत्येस. अग नवरा बायको एकजागी निवांतसं उभं राहून एकमेकांशी दोन सुखाचे शब्द बोलू शकत नाहीत; ती काय या मुलीला नांदू देणार आहे होय. ? कधी ना कधी तरी पोराला ती दुसरी बायको आणीलच आणील.'

'मुलगी तर आपल्यातलीच आहे. कोणा परक्याची थोडीच आहे. खुद्द स्वतःच्या सख्ख्या धाकट्या भावाची मुलगी आहे.'

'हो हो, दुसरी आणील. दुसरी आणून काय करणार ? हिचं तोंड तर पाहा. भावाच्या मुलीवर कुठं सवत आणील होय. ?'

'ठीक आहे, ही पुष्कळ करून घेईल, पण देणारा तर हवा ! असं कोणी रोज आपलं घरदार देऊन टाकणारा निघाला, तर घेणारांना कुठं काय तोटा आहे ?'

'घर-दार घेईल. घरं-दारं काय रस्त्यावर पडलेली असतात ? त्यापेक्षा ही स्वतःच जर सुनेला प्रेमानं वागवील. जीव लावील, तर ती कशाला घर सोडून निघून जाईल, ? त्यांना तरी दुसरं कोणी आहे का ?

'सारं मुलावर अवलंबून आहे. खुंटा जर बळकट असेल तर चिम्मव्वा काय करु शकणार आहे ?'

'बळकट असून काय करणार ? त्यांचं काही चालू देतेय ? पण तो तरी असा किती दिवस राहू शकेल, हल्लीची तरूण पोरं ही !'

ही बोलणी बायकांना बरी नाही वाटली. त्यांनी वेगळा विषय काढला.

भरमा रागानं दोन-तिन दिवस घराबाहेर राहिला. मित्रांकडे जेवायचा. वाटलं होत की आई बोलावणं धाडील. जसजसा एक एक दिवस जाऊ लागला तसंतसं त्याचं हे वाटणं खोटं ठरत गेलं. चिम्मव्वानं विचार केल, की पोराला वठणीवर आणायची हीच संधी आहे; म्हणून मग ती घरातल्या गड्यांना म्हणाली, 'तो रागानं दोन-तीन दिवस इकडे तिकडे भटकत राहिल, तेव्हा तुम्हीच गाई-म्हशींकडे नीट लक्ष ठेवा.' ही गोष्ट नंतर भरमाला शेतावर गड्यांकडून कळली, ती ऐकताच त्यानं निश्चय केला की आपण आता घरात पाय म्हणून ठेवायचा नाही. संध्याकाळी तो मगदूमच्या घराकडे गेला. मल्ल घरी नव्हता. रत्नव्वा गोठ्यात म्हशीची धार काढीत होती. भरमा तिथं जाऊन बसला. भुकेलेला होता, तोंड उतरलेलं होतं. बगलेत धोतर दाबून धरलेलं होत. डोक्यावरचे केस विस्कटून अस्ताव्यस्त उडत होते. रत्नव्वा म्हणाली, 'तुम्ही मायलेकरं घरात आनंदानं राहात होता त्या काळात देखील तुमच्या आईला तुमचं आमच्या घरी येणं जाणं पसंत नसायचं. आणि आता तुमचं तिचं बिनसलेलं असतांना तुम्ही आमच्याकडे आलात. असलं काही करू नका. तुमची आई उगाचच आमच्या नावानं गावभर वाजंत्री वाजवील.'

भरमा निर्धारानं म्हणाला, 'ती काय करू शकणार आहे ? मी माझ्या बायकोला बरोबर घेऊन येतो. तुम्ही लोक आम्हाला घरात रहायला जागा द्याल की नाही ?'

रत्नव्वा काही काळ गप्प बसली. तिनं मनाशी विचार केला. काही असो माय-लेकरं एकाची एक असतात. नंतर शांतपणे म्हणाली, 'फळ वेलीला लहडून राहिलेलंच शोभून दिसतं.. त्याची जागा तिथेच असते. तुम्ही आपल्या घरी राहणंच योग्य होईल. नातं तोडायचं म्हणून कुठे तुटत असते. रागाच्या भरात ती चार शब्द टाकून बोलली असेल, तुम्ही तिला उलट उत्तरं दिली असतील. घर म्हटलं की ह्या असल्या गोष्टी व्हायच्याच. जमलं तर तिच्या कडून नाहीतर यांच्याकडून काही घेऊन कसंही करुन देणं चुकतं करुन टाका, हवं तर खोंड विकून टाका. शेतात आता फारसं काम नाही. चैत्राच्या हंगामात लागला तर आमचा घेऊन जा. कपास विकून 'लगमव्वाच्या' जत्रेत पुन्हा विकत घ्या. यापेक्षा अधिक मी तुम्हाला काय समजावून सांगू ?'

दिवे लागणीच्या वेळी तारकाला कळशी घेऊन जातांना पाहून रत्नव्वाही तिकडे गेली. आवती-भोवती जवळपास कोणीही नाही ना, असं पाहून म्हणाली, 'हे आत्ता तुझा नवरा आमच्या घरी आला होता.'

'का ?'

'तुला घेऊन वेगळं बिऱ्हाड करायचं म्हणत होता. आमच्याकडे येऊन सारं सांगत होता'.

'तू काय म्हणालीस? तारक्कांनं उत्सुकतेनं विचारलं तिची मुद्रा आनंदानं उजळून निघाल्यासारखी झाली होती.

अंधारात कदाचित् रत्नव्वाला ते दिसलं नसणार. म्हणाली, 'वेडे! काहीही होवो माय-लेकरु कधी अलग का होऊ शकतात? आम्ही दूरचे आहोत. उद्या आम्हीच वाईट ठरु. म्हणून आपल्या घरीच राहा असं सांगितलं मी त्याला.'

तारक्का गप्पच राहिली. तिचं तोंड खर्रकन उतरलं. रत्नव्वा पुढं म्हणाली, ' कुठे गाठ-भेट झाली तर तुला विचारील. कुठं हो वगैरे म्हणू नकोस. आणि हो म्हणालीस तर मी समजेन, की हे सारं तुझंच कर्तृत्व आहे म्हणून?'

'जाऊ दे ग ऽ ... तो कुठं मला विचारायाला यायला बसलाय!'

'नाही, तो विचारील. त्याच्या डोक्यात सध्या तोच किडा वळवळतोय. चार दिवस रागवेल, पण शेवट पर्यंत त्याचा हा निर्धार कायम राहील याचा भरवसा काय? 'मी ही येत्ये'- असं म्हणून लगेच त्याच्या मागे जाऊ नकोस. असलं काही केलंस तर माझ्या नरडीचा घोट घेतल्यासारखं होणार आहे. शपथ आहे बघ माझ्या गळ्याची तुला!' ती तिला पुन्हा-पुन्हा ज़ोरजोरात बजावीत म्हणाली. तिचं सारं ध्यान पोरीच्या भवितव्याकडे लागून राहिलं होतं.

अत्यंत कठीण परिस्थितीत माणसाला जेव्हा काय करावं हे अजिबात उमजेनासं होतं तेव्हा त्याक्षणी त्याला जो सुचेल, आवश्यक आणि हिताचा वाटेल त्याच मार्गाचा अवलंब करतो. त्यावेळी त्याच्या समोर साधक-बाधक विचार नसतो. आपल्याला वाटतंय तसंच उद्या घडणार आंहे असं मुळी तो गृहीत धरूनच चालतो. म्हणूनच आईनं एवढ्या आणा शपथा घालून बजावलं असतानांही तारव्वाचं मन भरमाकडे ओढ घेत होत. ती विचार करीत होती. 'काय तो मला विचारील-विचारलं तर काय सांगू? विरोध करु? नाही. माझ्याच्यानं जमणार नाही. कालच भांडण पाहता काय तो पुन्हा घरी परतेल? मी विरोध करून... नाही म्हणून उगाच कशाला मधल्या मध्ये वाईट होऊ? नवरा जाईल तिथं आणि राहिल तिथं काय बायकोनं त्याच्या बरोबर जायला रहायला नको? एकदा त्याचं पाणिग्रहण केल्यावर मग हवं तर तो बुडवो वा उध्दार करो. त्याच्या बरोबर जाणंच योग्य होईल.'

तसंच झालं. आज सकाळी तारक्का जेव्हा शेतावर जायला निघाली तेव्हा तिला कोणी तरी आपल्याला 'ए' करून हाक मारतोय असा भास झाला. तारक्कानं वळून पाहिलं. भरमा घाईघाईनं येत होता. त्याला पाहून तिची मुद्रा खुलली. पण तो काय

म्हणतोय हे जाणून घ्यावं म्हणून ती उभी राहिली. तिचं काळीज जोरजोरानं धडधडू लागलं. अशा प्रकारे ती नवऱ्याबरोबर कधी बोलली नव्हती. तसाही हा एक विशेष प्रसंगच होता.

भरमा जवळ आला. कसं बोलावं, काय बोलावं याचा त्यानं आधीच विचार करुन ठेवला होता. हा विषय बायकोपुढं कसा काय मांडावा हे त्यानं सुसंगतपणे ठरवून टाकलं होत. परंतु प्रत्यक्षात जेव्हा बोलायची संधी आली तेव्हा तो ते सारं विसरला. काय बोलावं. हे त्याला उमजेनासे झाले. त्यानं विचारलं, 'कुठं निघालीस ?' तोंडून आवाजही बरोबर फुटला नाही. चेहरा कळा कांतीहीन झाला होता.

'आणखी कुठं जाणार ? शेतावर गोवऱ्या गोळा करायला जातेय.'

'मी गेल्यावर आई काय म्हणत होती ?'

'हेच की कुठं का जाईना. आज ना उद्या परत येईल.' तारा बोलून तर गेली. पण लगेच घाबरली. तिनं मनाशी विचार केला: 'मी अशा कोणाची चुगली करणं बरं नव्हे !'

'असं काय ?' भरमांन डोळे तांरवीत विचारलं.

तारक्काला काहीसं समाधान वाटलं. तिला वाटलं की आपला विश्वास चुकीचा ठरणार नाही. तरीही तिनं खरं तेच सांगितलं. म्हणाली, 'आपण असं कां माझ्या आई वडिलांना विनाकारण बोलणी खायला का लावता ?'

'अच्छा, ज्यांना कोणाला बोलणी खायची असतील ती त्यांना खाऊ देत. तू अशा बोलण्याचा आणि दमदाटीला घाबरतेस होय ?'

'सासू आहे, घाबरणं भाग आहे.'

'गळ्यापर्यंत येईसतो ठीक आहे. पण त्याच्याही वर आल्यावर काय ?... भरमाच्या डोळ्यातून दोन मोठमोठे अश्रूबिंदू गळून पडले. घसा खाकरत. आवाज व्यवस्थित करीत त्यानं विचारलं, 'मी एक गोष्ट सांगतोय , ऐकशील ?'

काय करायला हवं हे तिला माहीत होतं. तरीही म्हणाली, 'करण्यासारखी असेल तर करीन !' मग काय मनात आलं कोणं जाणे. पाणावते डोळे झटकन् पुसत म्हणाली, 'आपण शेवटपर्यंत आपला निर्धार कायम ठेऊ शकलात तर...' आपल्याला वाटणारं भय स्पष्टपणे तिनं बोलून दाखविलं.

प्रथम मी काय म्हणतोय ते ऐक. तो काय पोरखेळ आहे होय ?' म्हणत थोडं पुढं होत शांतपणे म्हणाला, 'परवा भांडण झालं तेव्हा तू नव्हतीस. आता ती पैसे द्यायचं नाकारीत आहे. मी तरी कुठून देणार ? परवा बसवय्यानं चार चौघा समोर काय वाटेल ते बोलून माझी बेअब्रू केली. स्वत:जवळ पैसे ठेवून काय करणारं आहे ही ? तिला माझ्यापेक्षा पैसे जादा प्यारे आहेत ? असू दे. तो तिच्याकडून वसूल करील. मी तर काही घरी जाणार नाही. जर तिला माझ्या विषयी काही माया प्रेम नसेल, मी तिला

नकोसा झालो असेल तर मी तरी कशाला घरी परत जाऊ? तिला मुलगा नकोय. आपलं शेत आणि घर तिचं तिलाच राहू दे.' तो थांबून जणू एखादा रहस्य स्फोट करतो आहोत अशा थाटात फिरून म्हणाला, 'तूही घर सोडून ये. आपण दोघे वेगळं राहू.' भरमाचा आवाज थरथर कापत होता, तो सावरीत पुन्हा म्हणाला, 'बघू या ती काय करतीय ते! घाण्याच्या बैलासारखं किती दिवस आम्ही असे कष्ट उपसीत राहायचं?'

'ते सारं ठीक आहे. पण राहणार कुठं?'

एक महिना भीमशीकाकाच्या घरी राहू. सुगीनंतर शेतावरच झोपडी बांधून राहू. पुढचं पुढं पाहता येईल.'

'तिथं तरी आई सुखानं वेगळं राहू देईल की काय? त्यापेक्षा त्यांच्या दृष्टीआड कुठं दुसऱ्या गावी जाऊन राहिलो तर कसं?'

तिचं ते बालणं भरमाला आवडलं नाही. त्याला घर आणि शेत सोडून कुठं राहवसं वाटलं नाही. आईचं आणि आपलं पटत नाही, घरात आपल्याला सुख लागणार नाही. वेगळं रहायला हवं. पीक आपणच घेतलं पाहिजे. बसवय्याचं कर्जही फेडलं पाहिजे. येवढाचं विचार करुन तो चालला होता. ह्या व्यतिरिक्त त्यानं अधिक कसला विचार केला नव्हता.

भरमा कठोर होऊन म्हणाला, 'तसलं काहीही नकोय, इथंच राहू. तू येणार आहेस की नाही.?'

तारक्का निरूपाय होऊन म्हणाली, 'येईन!'

'तर मग आज संध्याकाळी भीमशीकाकाच्या घरी ये.'

'ठीक आहे.'

थोडा वेळ भरमा विचार करीत राहिला. शेवटी म्हणाला, 'येतांना तुझी नेसायची साडी अणि माझं धोतर घेऊन ये!'

'बघते' तारक्का विचार करीत म्हणाली. तिचं पायाच्या आंगठ्यानं जमीन उकरणं चालूच होतं.

'नाही. ते लोक कुठं बाहेर गेले की काढून ठेवून दे. आणि नंतर येतांना घेऊन ये, उद्या नेसायला नको?'

काही विचार करीत ताराने रूकारादाखल मान हलविली.

# 12

या आधीच्या प्रकरणात वर्णिलेली घटना घडल्यास अकरा महिने लोटले. या अकरा महिन्यात आणखी काही विशेष बदल घडून आला अशातले नव्हे - पण तारक्काच्या जीवनाला आणखी उतरती कळा लागली. रोज सकाळी उठताक्षणीच तिला चिम्मव्वाची मुक्ताफळं ऐकावी लागत. 'नवऱ्याला पढवून घर फोडू पाहात होती ना, महाराणी' जोडीनंच तिला आपल्या आईवडलांचा चिम्मव्वाच्या मुखातून झालेला उध्दारही ऐकावा लागे. एक दिवस त्रासून ती नदीवर कपडे धुवायला गेली. तेव्हां उन्हं तळपत होती. नदीवर कोणी चिटपाखरू नव्हतं. नदी भर वेगात वाहत होती. ती आईच्या मांडीप्रमाणे सुखकारक वाटत होती. तारक्काच्या मनात आलं मूल जसं आईच्या मांडीवर जाऊन बसतं तसं आपणही या नदीच्या कुशीत शिरावं. तिच्या मांडीवर स्वत:ला लोटून द्यावं. जड अंत:करणानं ती नदीत उतरली. एक एक वस्त्र भिजवून दगडावर ठेवायला लागली. मनात विचार पिंगा घालीत होता. 'असलं हे जगणं कोणालाही नकोय, या जगण्याला काय अर्थ आहे; अंतर्यामीचा हा आगडोंब विझवण्यासाठी कृष्णार्पण होणंच उत्तम!' त्याच वेळी तिची मैत्रीण सुमती तिथं पाणी भरायला म्हणून आली, देवानंच जणू तिला असं या अखेरच्या क्षणी तिथं धाडलं होतं.

सुमती मोठी झाली होती. तिला एक मुलगाही झाला होता. परवाच माहेरी आली होती. न जाणे बाळपणापासून या मैत्रिणींत किती रहस्य होतं. किती किती जीवाभावाच्या गुप्तगोष्टी त्यांच्यात झाल्या होत्या. मैत्रिणीला पाहताच तारक्काचे डोळे आसवांनी डबडबले. तिला पाहताच सुमतीचेही डोळे आसवांनी भरून आले. काही काळ दोघींनाही काय बोलावं हे उमगेनासं झालं. मुकाटपणे एकमेकींकडे नुसत्या पाहात राहिल्या. शेवटी सुमतीच एक उष्ण नि:श्वास टाकीत डोळे पुसत म्हणाली, ' चारपाच दिवसांपासून तुला भेटावं भेटावं म्हणत होत्ये.'

'आईनं सांगितलं तेव्हा पासूनच मलाही तुझ्या भेटीची ओढ लागली होती. पण मी तुझ्यासारखी स्वतंत्र थोडीच आहे?' खाली पाहात तारका म्हणाली. तिची आसवं कृष्णेत ओघळली, कृष्णेच्या पाण्याबरोबर वाहून गेली.

सुमती डोक्यावरची घागर खाली उतरवीत तारक्कानं भिजवून ठेवलेले कपडे धुवायला

लागली. तारक्का म्हणाली, 'असू देग. मी धुवीन. तूही सासरहून पिट्टा पडून आली आहेस.'

'म्हणून काय झालं, गप्पा मारता मारता दोघीही धुवू. आपल्या दोघींना बरोबरच तर परत जायचंय. मुलाला मी ही एवढ्यातच झोपवून आलेय. थोडा वेळ झाला म्हणून असं काय आकाश कोसळणार आहे ?

तारक्कानं एक लहानसा कपडा ओढून घेत विचारलं, 'तुझी सासू कशी आहे ?.

'ठीकच म्हणायची. जरा चार सासवा असतात त्यातलीच पण तुझ्या सासूसारखी मात्र मुळीच नाही हं. तुझी काहीतरी जगावेगळीच आहे बाई !' मग थोडं थांबून म्हणाली, 'तुझे हे कसं वागतात तुझ्याशी ?'

हेही शेवटी तिचे चिरंजीव आहेत ना !' इतकं बोलून ती साडी पिळायला लागली. दोघीही थोडावेळ गप्पच राहिल्या. सुमती एक एक करून कपडे धुवायला लागली. तारक्का तिनं धुतलेले कपडे खळबळून पिळून झटकून खडकावर वाळत घालायला लागली.

'मध्यंतरी वेगळं रहात होतीस ?'

'हो, असं करूनच ह्यांनी माझं पार वाटोळं केलं. ह्यांच्या सांगण्यावरून ह्यांच्या बरोबर रहायला गेले आणि इकडे आईवडिलांचा रोष मी ओढवून घेतला. आवडलं नव्हतं त्याना आमचं हे करणं. मी माझ्या हातानं स्वतःच्या पायावर कुऱ्हाड मारून घेतली अन् काय ! ते माय लेक तर पुन्हा एकाचे एक झाले...! आईनं पैसे दिले. यानी घेतले.'

'अच्छा तर असं आहे एकूण ? एकदा घरातनं वेगळं निघालात तर तुम्ही दोघांनी वेगळंच रहायला हवं होतं. त्यामुळं वागण्या व्यवहारात निदान एक सुसंगतपणा तर कायम राहता !'

'पण माझ्या भाग्यात तेवढं कुठचं असायला, माझं फुटकं नशीब मला थोडंच सोडून जाणार होतं ?

तारक्काच्या तोंडाकडे पाहात सुमतीनं तिला धीर दिलासा देत म्हटलं, 'आज न उद्या, दिवस बदलतीलच. देवाला काय डोळे नाहीत ?'

तसं तारक्का म्हणाली, 'आता कसले दिवस बदलायला !'

डोळे पुसत धुण्याची टोपली तिच्या डोक्यावर देत म्हणाली, 'असं म्हणू नकोस, तारा'.

या बोलण्यात जी भावना दडलेली होती ती तिच्या तिच्या जीवालाच काय ती माहीत होती. आजकाल सासरी तारक्काची अवस्था आणखीनच बिकट होऊन बसली होती. बिघडली होती. हल्ली चिम्मव्वानं सारं वागणं बोलणं मुलाच्या तोंडाकडे पाहून

व्हायचं. त्या शिवाय संधी साधून तारक्काच्या विरूध्द कागाळ्या करायलाही ती कधी कमी करीत नसे. दोन दिवसांपूर्वीचीच गोष्ट : संध्याकाळच्या वेळी चिम्मव्वानं तारक्काला एक मोठी घागर देऊन पाणी आणायला धाडलं अन् लगेच गोठ्यात काम करीत असलेल्या लेकाकडे जाऊन म्हणाली, 'पाहिलंस ? वेळ नाही काळ नाही ही अशी आपली सरळ घागर उचलून पाणी आणायला पळत असते. हा आत्ता खाल्लाकडच्या घरचा सत्याही एवढ्यातच आलाय, म्हणून गेलीयशी वाटले.'

भरमानं वळून पाहिलं. त्याचा चेहरा लालीलाल झाला. आईचं बोलणं ऐकून जणू काही त्याच्यावर वीजच कोसळल्यासारखी झाली होती. डोकं गरगरायला लागलं. त्याला वाटलं जणू काही कोणी आपल्याला हातपाय बांधून खोलीत डांबलंय अन् थाडथाड ठोसे लगावून राहिलंय. त्याचं काळीज जोरजोरानं धडधडायला लागलं. त्याला वाटलं आपला तोल जातोय. आपण खाली कोसळतोय. तो तसाच कसाबसा खांबाच्या आधारे उठून उभा राहिला. साऱ्या अंगाचा नुसता घाम घाम झाला. घशाला कोरड पडली. फुत्कार सोडावेत तसं नाकातून उष्ण नि:श्वास थरथरत बाहेर पडत होते. दात ओठ आवळले गेले होते. त्याचं काळीज त्याला पुन: पुन्हा विचारू लागलं 'काय खरं आहे हे ? खरं आहे हे ?' तसं चिम्मव्वा पुढं म्हणाली, 'मी तुला खोटं का सांगत्येय ? हवं तर तू स्वत: नदीवर जाऊन पाहून ये'. पण हे बोलताना तिचा आवाज थरथरल्या विना राहिला नाही. भरमा तिथून चालता झाला. चार पाच पावलं कुठं चालून होतात न होताच तोच त्याचे हातपाय लटपटायला लागले. डोळ्यासमोर काळोखीशी पसरली. तो धप्पकन् खाली बसला. पण लगेचच उठून उभा राहिला. वाऱ्याच्या झुळकीत सापडलेल्या वाळलेल्या पानागत कसातरी पुढं पुढं जात राहिला. नदीपाशी आला. झाडा आड दडून पाहायला लागला. घागर जड असल्याकारणानं उचलता येईना तेव्हा सत्याप्पाला हात लावायला सांगून तारक्कानं ती डोक्यावर घेतली. बस मनाला तडा पडायला एवढं पुरेसं होतं. या दोन दिवसांपासून घरात यावरूनच भांडणं होत होती. तारक्कानं तोंडात अन्नाचा कणही घेतला नव्हता. अशी ती उपाशी तापाशी आयुष्याला विटून अशा या रणरणत्या उन्हात नदीवर गेली होती.

दोघी नदीचा काठ चढून गेल्यात. 'तू तर सुखी आहेस ना सुमा ?' तारानं विचारलं. दुसरा सुखी आहे हे ऐकूनही एक प्रकारचं सुख लाभतं. कदाचित यासाठीच तिनं विचारलं असावं.

आपण सुखी आहोत असं सुमतीला सांगावसं वाटत होतं. पण कोण जाणे काय की ती ते बोलून दाखवू शकली नाही. म्हणाली, 'सासरी सुख आणि दु:ख असतंच असतं, अशा परिस्थितीत कसं तरी आयुष्य निभावून न्यायचं असतं. आईबापाचं नाव राखावंच्च लागतं!'

तारा विमनस्क होत म्हणाली,'राखावं लागतं'. नंतर विचारलं, 'काहीही असो, एक मुलगा झाला. तुझं आयुष्य एका कडेला तर लागलं. कसे काय आहेत युवराज ?'

'मजेत आहे. इथं यायच्या आधी चार दिवसापासून सर्दीपडसं होतं त्याला. हे म्हणत होते, अशा स्थितीत बाळाला घेऊन जायची जरूर नाही. पण बाबा सणासाठी बोलवायला आले होते. या आधीही चारदा हेलपाटे घालून गेले होते........ त्यांना आणखी हेलपाटा पडू नये असं वाटत होतं. म्हणून आल्ये झालं.' अशा प्रकारे सुमतीनं आपल्या बाळाविषयी सांगितलं.

तारक्काच्या दृष्टीनं या सर्व गोष्टी नवीन होत्या. ती मोठ्या नवलाईनं सुमतीचं हे सारं बोलणं ऐकत होती. ती पुढं म्हणाली, 'जत्रा पहायला आलेय पण इथं तिची तिथी पुढं ढकललीय. जत्रा झाली की, लगेच दुसऱ्याच दिवशी परतेन.'

'माझे वडील उद्या मला पाडव्यासाठी घेऊन जायला येणार आहेत. या नरकातून एकदाची सुटेन तरी!'

'तर मग आमच्या घरीही एकदा बाळाला बघायला येऊन जा.' तेवढ्यात सुमतीच्या घराकडे जाणारं वळण आलं. तिनं सहज म्हणून विचारलं, 'पुन्हा सासरी कधी परत जाणार आहेस ?'

तारक्कानं थोडं थबकून तिलाच उलट प्रतिप्रश्न केला, 'कशासाठी ?' सुमती घरी पोहोचेपर्यंत मैत्रिणीनं विचारलेल्या 'कशासाठी ?' या प्रश्नाचं उत्तर शोधीत होती. पुढे नंतर मुलाचे लाड करण्यात ही गाठ उकलण्याची आणि हा गुंता सोडविण्याची गोष्टच ती विसरून गेली.

तारक्काचा प्रश्न उचित तो गंमत म्हणून वा काही थट्टा - मस्करी करावी म्हणून विचारला गेला नव्हता. तिच्या व्यथित हृदयातून तो निघाला होता. तिच्या वेदनेचा तो उद्‌गार होता.

नशिबानं जत्रेसाठी अनंत आणि नाभिराजही आले. त्यामुळे तारक्काच्या जीवनात आनंदाचा झरा झुळूझुळू करून वाहू लागला. अनंत आता पूर्वीसारखा लहान राहिलेला नव्हता. तो हायस्कूलमध्ये शिकत होता. तो तलम धोतर आणिं स्वच्छ नीटनेटका सदरा वापरायचा. सफाईनं डोक्यावरचा केसांचा भांग पाडायचा. गळ्यात सोन्याचं लॉकेट घालायचा. सारांश म्हणजे त्याचं आता नव्या जमान्याचा तरूण असं वेगळं वर्णन करण्याची आवश्यकता नाही. तारक्कानं त्याच्याकडे एकदा कुतुहलानं पाहिलं. तशी तिला त्याला पुन: पुन्हा पाहायची इच्छा होत होती. एक दिवशी दुपारी अनंताने विचारलं, 'आत्याबाई, 'काय जत्रेची तयारी वगैरे झाली का ?' त्याला आता प्रत्येक गोष्ट जाणून घ्यायची उत्सुकता लागून राहिलेली असायची.

अनंताचं बोलणं - त्याच्या गप्पागोष्टी वगैरे ऐकण्यासाठी तारक्काचं मन सदैव

आसुसलेलं असायचं. त्याचं बोलणं तिच्या कानाला भारी गोड लागायचं. त्याच्या बसण्याउठण्याचा थाट तिला मनमोहक वाटायचा. अनंत आत्याच्या घरी आल्यापासून स्नानासाठी नदीवरच जायचा.त्याची आत्या त्याला एकदा म्हणाली देखील की, 'अंतू, नदीवर आंघोळीला जाऊ नकोस. थंडपाणी बाधेल तुला. मी इथंच तुला पाणी तापवून देत्ये, घे करून आंघोळ.' पण अनंतानं तिचं सांगणं ऐकलं नाही. आंघोळीसाठी तो नदीवर जातच राहिला. तो आंघोळीसाठी नदीवर गेलारे गेला की तारक्काही तिथं कपडे धुवायला जायची. त्यानं स्नान करून कपडे काढून ठेवले की त्याचे ते ओलेपारोसे कपडे ती धुवायची आणि घड्या घालून घेऊन यायची. अनंत नुसता हात हलवीत घरी परतायचा. तारक्का अनंताचं धोतर काळजीपूर्वक वाळवायची. त्याला कुठं मळ लागला, डाग पडला तर तिला काळजी लागून रहायची. त्याचे कपडे आणि पुस्तकं व्यवस्थित लावून ठेवण्यात ती किती वेळ घालवायची याला सीमाच नव्हती. काही ना काही विषय काढून ती त्याला बोलायला उद्युक्त करायची. ही सारी कामं करण्यात का कोण जाणे तिला एक प्रकारचा आनंद वाटायचा.

गेल्या एक महिन्यापासून मल्लूचं सारं कुटुंब गावालगतच्या शेतावरच वस्तीला होतं तिथंच दहाबारा पत्रे घालून झोपडी उभारली होती. गायी म्हशींसाठी तट्टयांचा आडोसा करून गोठा तयार केला होता. म्हणून त्यांना आता गावात जायची गरज भासत नसे. तरीही पुढच्या शुक्रवारी गावात जावं असं ठरवून टाकण्यात आलं. मल्लू आजकाल जत्रेच्या कामात व्यग्र असायचा. 'लगमव्वा'च्या जत्रेत या मगदूम मंडळीचा फार मोठा हात असायचा. पूजेसाठी प्रसाद तयार करणं, देवीला त्याचा भोग देणं, नैवेद्य दाखविणं, ज्यांच्या अंगात देवीचं वारं येतं त्यांना प्रसाद वाढणं, नंतर जमलेल्या भाविकाना प्रसाद खाऊ घालणं या साऱ्याची यांच्यावर ज़बाबदारी असायची. म्हणून स्वयंपाकासाठी लागणारी भांडीकुंडी, धान्य धुन्य आणि जळणासाठी लाकूड फाटा जमविण्याकरिता मल्लू पाचसहा दिवस आपली घरदारची सारी कामं सोडून ह्या कामात गढलेला असायचा. ही पूर्वापार चालत आलेली एक प्रथा होती.

अनंताची गावात कोणाशी ओळख नव्हती. म्हणून तो सदा शेतावरच रहायचा. आत्याच्या हातचं स्वादिष्ट जेवण जेवण्यात, थोडं बहुत वाचनात आणि गप्पागोष्टी करण्यात तो वेळ घालवायचा. तारक्कालाही घरात तसं काहीच काम नव्हतं. ती सासरहून थकून भागून चूर होऊन आलेली होती. तीही अनंताबरोबर गप्पा मारायला सदैव तयार असायची. त्या दोघांच्या मध्ये नाभिराजही एक होता. दुपारच्या वेळी पत्र्यांमुळे झोपडीत भारीच उकडायला लागायचं. म्हणून तारक्का जवळच्या आंब्याच्या झाडाखाली सावलीत कांबळं अंथरायची. अनंत तिथंच बसून वाचायचा, झोप आली की पुस्तक छातीवर ठेवल्याठेवल्याच झोपी झायचा. एक दिवस अशाप्रकारे पहुडलेल्या अनंताला खालच्या

शेताकडे जाताजाता तारक्कानं पाहिलं. तिला त्याचं ते रूप यापूर्वी कधी एवढं आकर्षक वाटलं नव्हतं. विशाल मस्तक, झुबकेदार भुवया, ओठावरची कोवळी मिसरूड, सुंदर चेहरामोहरा, वाऱ्यानं माथ्यावर अस्ताव्यस्त विखुरलेल्या कुरळ्याकेसांच्या दोनतीन बटा. एक एक निरखून पाहात ती तिथं उभी राहिली. भीत भीत पाहताना देखील त्याचं ते सौंदर्य तिला अधिकच जाणवत होतं. कोण जाणे कितीवेळ ती त्याला अशीच निरखून पाहात उभी होती. रणरणत्या उन्हाचेही तिला भान नव्हते. अनंतानं एकदम उठून डोळे उघडले. समोर तारक्का उन्हात उभी होती.

अनंतानं विचारलं, 'अशी उन्हात उभी का तारा ?'

तारक्का घाबरली अन् गडबडून म्हणाली, 'कदाचित आई येईलसं वाटतं' अनंत काय उमजायचं ते उमजला. त्याच्या ओठांवर एक हास्याची लकेर चमकून गेली. त्यानं पुन्हा डोळे मिटून घेतले.

रत्नव्वाचा हात मोठा सढळ होता. जेवताना अनंत नको नको म्हणाला तरी ती आग्रहानं वाढायची. खेडूत स्त्री! खेड्यात वाढलेल्या मुलाला जेवढं वाढायला हवं तेवढं वाढायची. त्यामुळे अनंत संकटात सापडल्यासारखा व्हायचा. आत्यानं एकदा वाढलेलं जेवण दोनदा खाऊनही त्याच्याच्यानं संपता संपत नसे. जेवढं जमेल, तेवढं खायचा. नंतर आत्याच्या नवऱ्याचं जेवण होइस्तो बसून रहायचा. त्याच्या जेवणाची ही तऱ्हा पाहून रत्नव्वा प्रेमानं म्हणायची 'राहू दे आता.... एवढा मोठा झालायस तरी आपला एखाद्या कुकुलं बाळा सारखं ताट नुसतं चिवडतोयस!'

आत्यानं असं काही म्हटलं रे म्हटलं की अनंत लगेच पाणी पिऊन पानावरनं उठायच्या तयारीला लागायचा. तेवढ्यात मल्लु हात धुवून आंचवून तांब्या आत ठेवायला येता येता म्हणायचा, 'याच्या डोक्यावरच देना हे बांधून. याचं उष्ट कोण खाणार ? लहानगा नाभूही पानात पडलेलं काही टाकत नाही. इथं काय याची बायको आहे. याचं उष्टं खायला! गुपचूप खाऊन टाक नाहीतर कान कापून हातात देईन...' अशी थट्टा करीत तो बाहेर निघून जायचा. रत्नव्वा म्हणायची, 'ठीक आहे धू तू आता हात. मी आणि तारा थोडं थोडं करून संपवून टाकू.'

अनंत बाळपणा पासून या घरी येत जात असायचा. त्याचं आपले आतोबा आणि आत्या यांच्यावर भारी प्रेम होतं, म्हणून ते काहीही म्हणाले तरी वाकडं लागत नसे. सावकाश उठून हसत हसत तो हात धुवायला बाहेर निघून जायचा. तो उठताच त्याच्या पाटावर बसून तारक्का रागाचा आव आणून म्हणायची, 'घ्या आज याचं उष्ट खावं लागणार आहे. रोज पानात टाकत असतो!' न जाणो आई आपल्या आधी या पानावर बसायची. त्या आधी आपण पाटावर जाऊन बसावं कसं ? ही त्या मागची तिची आतुरता यात स्पष्टपणे दिसून यायची. पटका बांधता बांधता मल्लु म्हणायचा, 'भरपूर तूप वाढलेलं

ताट मिळालं ना तिला? म्हणून बसली आपली झटकन जाऊन. लहान होती तेव्हा कोणी उष्टावलेल्या भांड्यातनं पाणी प्यायला सांगितलं, तर आधी स्वच्छ विसळून घेतल्या खेरीज त्याला हात लावायची नाही. आता ते सारं कुठं गेलंय, पोरी?'

सायंकाळी अनंत बैठकीवर बसल्या बसल्या सुवासिनींच्या गाण्यांच्या संग्रहातली गाणी गळ्यावर गायला लागला. तारक्का तिथंच बैठकीवर आडवी होऊन ती लक्षपूर्वक ऐकू लागली. चुलीवर दूध तापवता तापवता तिथूनच तिची आई कुठल्या ना कुठल्या जत्रेच्या हकिगती सांगायला लागली. त्यामुळे तारक्काची एकाग्रता भंग पावली, तशी ती चिडून म्हणाली, 'आता पुरे हं तुझं सांगणं. संध्याकाळ पर्यंत कुठं काय पळून का जाणार आहे ते? आता पासूनच आपलं चालू केलंय. जरा गाणी ऐकेन म्हटलं, तर.....' मुलीनं एवढं म्हणताच रत्नानं आपलं बोलणं आवरतं घेतलं. आपल्या लाडक्या मुलीचं मन तिळभर देखील दुखवायची तिची इच्छा नव्हती.

'ठीक आहे ऐक तू' असं म्हणत आणि मग शेजारणीला 'तिला गाण्याची भारी आवड आहे, सरसा. चल आपण बाहेर जाऊ या' असं सांगत रत्नव्वा शेजारणीला बाहेर घेऊन गेली. आपलं गाणं तारक्का ऐकतेय या जाणीवेनं अनंताला फार आनंद झाला. तो समरसून आणखीनच गोड गळ्यानं गाऊ लागला. झोपेनं घेरे पर्यंत तारक्का ऐकत राहिली; कोण जाणे तिला कधी झोप लागली ते!

दुसऱ्या दिवशी तारक्का अंथरूणातून उठायच्या आतच रत्नव्वा बाहेरनं येऊन म्हणाली, 'पोरी, माझी पाळी सुरू झालीय. तू दमून भागून माहेरपणाला आलीयस पण इथंही तुला विसावा मिळायची चिन्हं दिसत नाहीत. आणखी पाचसहा दिवसांनी नव्हते व्हायची विटाळशी? गेल्या वेळी महिना पूर्ण भरल्यावर चार दिवसांनी बाहेरची झाले, आणि या वेळी महिना पुरा व्हायच्या चार दिवस आधीच पाळी आली!'

तारक्का गुपचूप बिछान्यावर या कुशीची त्या कुशीला होत राहिली. रत्नव्वा पुढं म्हणाली,'आता असा उशीर करून भागण्यासारखं नाही. उठ, खूप काम पडलंय. उद्या पुन्हा जत्रा आहे.' आता यातून आपली सुटका नाही असं समजून तारक्का बडबडत उठायला लागली. तसं अनंतानं तिला आश्वासन देत म्हटलं, 'मी ही तुला मदत करीन, तारा तू काळजी कशाला करत्येस?''

बाहेर उभ्या असलेल्या रत्नव्वानं विचारलं, 'तू काय करशील? काय तुला स्वयंपाक करता येतो? तुमच्या शाळेत शिकवतात तुम्हाला स्वयंपाक बियपाक करायला?'

अनंत गुपचूप हसला. त्यानं तारक्काला मदत करीन असं म्हटलं होतं ते केवळ तिला सहानुभूती दाखवावी या हेतूनं. परंतु आपण तिला कशा प्रकारे मदत करू शकू याचा त्यावेळी त्यानं विचार केलेला नव्हता. आता मात्र खरोखरीच विचारात पडल्यासारखा झाला. त्याची ती त्रस्तशी अवस्था पाहून तारक्का हसत हसत म्हणाली, 'मी भाकऱ्या

करत्ये, तू चुलीत पेटू घाल. तेवढं तरी तुला येतंय की नाही ?'

अनंत आढ्यतेनं हसत म्हणाला, 'हो हो पेटत घालणं, जाळ करणं यात काय मोठं असं कठीण आहे ? लहान पोरं देखील करू शकतात ते !'

त्या दिवशी सगळा स्वयंपाक व्हायला जरा उशीरच झाला. तरीही मल्ल काही तो पर्यंत घरी जेवायला येऊ शकला नाही, म्हणून त्यानं भरमाबरोबर अनंताला निरोप पाठविला की, 'मला यायला जमणार नाही. तुझं तू जेवून घे.' निरोप सांगायला भरमा शेतावरून आला, पण तो घरात जाऊ शकत नव्हता. त्यानं लांबूनच निरोप सांगितला आणि परस्पर परत जायला लागला. तसं अनंतानं बाहेर येत त्याला हाक मारली, 'भरमा ये ना.'

'काम आहे' सांगून भरमा निघूनही गेला. अनंताला आता ताराची थट्टा करायची चांगलीच संधी सापडली. 'तुझ्या नवऱ्यानं फेटा कसा बांधला होता, दाढी कशी वाढवलीय, धोतर कसा नेसला होता एखाद्या वेड्या सारखं !' असं चिडवीत खो खो करून जोरानं हसला. भरमा कशासाठी आला होता ते तारक्काला समजलं. संस्कारवश ती म्हणाली, 'बरं जाऊ दे रे अनंता, ते काय तुझ्या सारखे शाळेत का गेले होते कधी शिकायला ?' थोडं थांबून म्हणाली, 'कसे ही का असेनात ते माझे आहेत.'

'हां, आहेत ना. जातील कुठं ? तुझा नवरा म्हणजे साक्षात् मारूतीचा अवतार बनलाय मारूतीचा !' ते ऐकून मनोमन कष्टी झाली, अनंतानं भरमाला काही वानराची उपमा दिली नव्हती, की माकड वगैरे म्हणून हिणवलेलं नव्हतं.

'जाऊ दे ते आता, जेवून घे प्रथम. तुझं बोलणं ऐकून उगाच कोणी हसं करायला नकोय माझं...'

'हसतील त्यांचे दात दिसतील' म्हणून जेवायला जायसाठी तो जागचा उठून उभा राहिला. तारक्कानं आत त्याचं ताट वाढलं. गुळणा करीत, हातपाय धूत अनंत थट्टेच्या स्वरात हसतसा म्हणाला, 'सारी भाजी तू मला एकटयालाच वाढलेली दिसत्येस !'

तारक्कानं मुद्दामच जास्त भाजी वाढली होती. 'माझं काय जातंय ? नाही तरी तू टाकतच असतोस !' असं म्हणत तिनं अनंताकडे पाहिलं. दोघांची नजरानजर झाली. दोघांच्याही मुद्रेवर हसू फुललं... ते स्वाभाविक प्रसन्नतेचं होतं. दोघंही रोमांचित झाले. हा अनुभव दोघांनाही नवीनच होता. तारक्का भाकरी वाढून पुढच्या कामाला लागली. पण अनंताला आज जेवावसं वाटत नव्हतं. एक क्षण असं वाटलं की जणू सारी झोपडी गर्रकन् फिरतेय. पुढ्यात उभी असलेली तारक्का एकवार सटकन वरच्या तुळईला भिडून खाली आल्याचा भास झाला. वाटीतलं दही संपलं होतं. तारक्का वाढू लागली तर अनंत 'नको' म्हणाला. तारक्कानं विचारलं, 'नकोय, तर मग कशाशी खाशील ?' तसं म्हणाला, 'बरं वाढ.' कसं तरी जेवण उरकून तो पानावरनं उठला. तारक्कानंही

कसं तरी त्याला वाढलं. जेवण होईहोईस्तो एकदोनदा नजरानजर झाली. एकमेकांच्या काळजात खोल कुठंतरी रूतून कसली तरी एक अनामिक ओढ लावून गेली.. काही तरी हवंहवसं वाटायला लावून गेली.

त्या दिवशी दुपारी दळताना तारक्का हे गाणं म्हणत होती:

'तू कुणाची लेक लाडकी छकुलीराणी,

किती सुरेख ग दंतपंक्ती तुझी लड मोत्यांची पोरी,

पोर कुणाची ग तू-रूपगुणांची जणू खाणी ।।'

अनंतानं ते गाणं गुपचूप टिपून घेतलं. सायंकाळी सर्वांसमोर ते हसत हसत वाचून दाखविलं. तारक्कानं लाजून मान खाली घातली, तिची मुद्रा लज्जेनं लालीलाल झाली. ती अनंताच्या या चतुराईवर मनोमन अगदी खूश होऊन गेली.

संध्याकाळी सारेजण देवळात जायला निघाले. देऊळ गावापासून दूर एका मैलावर नदी काठी दाट वृक्षांनी वेढलेल्या जागी होतं. तेव्हां तारक्काच्या उत्साहाला पारावार नव्हता. तिचं त्यावेळचं एकंदर नटणं थटणं आणि साजश्रृंगार पाहून बघणाराला हीच का ती पहिली तारक्का? असा मनोमन संदेह निर्माण झाला. अनंत इंग्रजी शाळेत शिकत होता. बस मग आणखी काही सांगायलाच नको. त्याच्या त्या नव्या आधुनिक वेशभूषेकडे सारे गाववाले नुसते पाहातच राहिले. सर्वजण देवळात गेले. तोपर्यंत देवळासमोर लोकांची ही गर्दी उसळली होती. धनगर ढोल वाजवीत होते. थोड्याच वेळात चांभाराच्या मरेप्पाच्या अंगात देवी संचारणार होती. ते सारं पाहण्यासाठी देवळाच्या अगदी वरच्या पायरीवर जाऊन उभं राहणं आवश्यक होतं. पायात नवेकोरे बूट होते. त्या बुटांसकट अनंत तिथपर्यंत कसा काय जाऊ शकणार होता?

ते उमजून तारक्का म्हणाली, 'अनंत, तू तुझे बूट इथंच काढून ठेव. मी ते सांभाळीन. तू हो पुढे.'

अनंतानं विचारलं, 'मग तुला स्वत:ला उत्सव कसा काय पहायला मिळेल?'

'मी आजवर अनेकदा हा उत्सव पाहिला आहे. तू कधीच पाहिलेला नाहीस. जा.'

अनंतानं बूट काढून ठेवले आणि देवळाच्या पुढच्या पायरीवर जाऊन उभा राहिला. मग वळून वळून तारक्काकडे पाहात राहिला. तेवढ्यात रत्नव्वा आली. तिला नाभिराजला कडेवर घेऊन यावं लागणार होतं म्हणून वेळ लागला. रत्नव्वाला येताक्षणीच तारक्काचं असं मागे उभं राहण्याचं कारण उमगलं. तिनं लगेच दूर बसलेल्या चांभाराला बोलावून बुटावर लक्ष ठेवायला सांगितलं आणि लेकीला बरोबर घेऊन पुढे सरकली. इतक्यात मरेप्पाच्या अंगात देवी संचारली. तो डोक्यावरचा केसांचा बुचडा हलवित - डोलवीत, नाचत हुंकार देत देत धावत आला. मागे चार 'चांभार', 'धनगर' होते, ढोल वाजविणंही थांबल्यासारखं झालं. ते घाबरून मागे सरकून अंग चोरून एका बाजूला उभे राहिले.

गावातल्या सर्व वडिलधाऱ्यांनी हात जोडले. मगदुमचा मल्ल त्याचप्रमाणे त्याच्या अन्य नातेवाईकांनी देवळात जाऊन देवी समोर ठेवलेला नैवेद्य आणला. मरेप्पा हुंकार भरीत उडी मारून उठला. हात पसरले. त्याच्या हातावर अंबील, लापशी आणि खिचडी घातली गेली. ती त्यानं खाल्ली. त्यातलं काही खाली पडलं. काही त्याच्या मुखाला लागलं. प्यायसाठी त्याला तांब्याभर पाणी आणून दिलं गेलं. लोकांनी घाईघाईनं त्याचं तोंड धुतलं पण त्यानं त्यांना ते धुवू दिलं नाही, तो पुन्हा हूं हूं हा हा करीत हूंकार द्यायला लागला. इतर चांभारांनी घाईघाईनं त्याच्या अंगावर घोंगडं पांघरलं. नंतर मग देवी बोलू लागली.'हा! हा! हा! हां माझी आठवण राहिलेली नाही... तुम्हा लोकांना...अम्....आम्... काय केलंय तुम्ही लोकांनी...देवळाला रंगरंगोटीचा हात ही नाही लागला..... वीस वर्षं झालेत.' साऱ्या लोकांनी घाबरून कान पकडले. ती आणखी घुमायला लागली... घुमता घुमता पुढं म्हणाली. 'सूड घेईन, अजून मी काही केलेलं नाहीए. दाताड फोडलं नाही, कोण आहे तो ?' समोर उभ्या असलेल्या एका 'गौडा'नं भीतीयुक्त आदरानं हात जोडून नमस्कार करीत देवीला विनविलं की, 'आई जगदंबे माझ्या कडून काय अपराध झाला सांग मी त्याचं परिमार्जन करीन...' देवी घुमत होती, 'आजा शेतात दाणा वैरण होणार नाही. सारं गाव उजाड होईल... कोणी कोणी यातनं वाचणार नाही. प्रेतांचे खच पडतील.'

'आई जगदंबे, तूच आमची तारणहार... तूच यातनं आम्हाला....वाचव. आम्ही लेकरानं जायचं तरी कोणाच्या पायाशी ?' अशी एकमुखानं प्रार्थना करीत सर्वांनी हात जोडले.

'आता जाळायला लाकडं सुध्दा मिळणार नाहीत. एकएका तिरडीवर तीन तीन प्रेतं न्यावी लागतील हः हः हः ती वेळ फार लांब नाही आता हुः हुः हुः' अशी भविष्यवाणी उच्चारता उच्चारता तो एकदम जमिनीवर कोसळला. लगोलग ढोल वाजायला लागले. तुतारी निनादली. बरोबर आलेले चांभार त्याला कांबळ्यात लपेटून उचलून घेऊन गेले. लोक जायसाठी उठून उभे राहिले. पालखी देवळाभोवती प्रदक्षिणा घालू लागली. लोकांनी देवीचं दर्शन घेतलं. भक्त पुजाऱ्याकरवी देवी पुढं नारळ वाढवून घरी जायला निघाले. बुध्दिवादी अनंतालाही हे सारं पाहून देवीला नमस्कार केल्यावाचून रहावलं नाही.

रात्री कसलसं एक नाटक होणार होतं. सर्वत्र पिठूर चांदणं पसरलं होतं. नाटक पाहायला जायचं होतं; म्हणून कोणीही झोपायला जाऊ शकत नव्हता. अनंतानं चांदण्यात बसून गप्पाटप्पा कराव्यात असं सुचविलं. त्याला कोण मना करणार होतं ? आणि मुख्य म्हणजे त्याला स्वतःलाही आजकाल अशा गप्पागोष्टी करण्यात विशेष रस वाटायला लागला होता.

सर्व मोठी माणसं आत कामात गुंतलेली होती. मुलं चांदण्याचं अंगणात बसून गाणी

गाणं, गोष्टी सांगणं, कोडी वा उखाणे घालणं आणि त्यांची उत्तरं शोधून काढणं यात गढून गेली होती. त्यात हरले तरी ते हसत होते आणि जिंकले तरी हसत होते. खेडवळ धाटणीचे उखाणे घालण्यात तारक्का मोठी हुशार होती. अनंताला ती सहज हरवायची. तारक्काला हरविण्यासाठी त्यानं आत जाऊन झोपलेल्या आपल्या धाकट्या भावाचं पुस्तक आणलं. त्यातनं त्यानं एक उखाणा घातला: 'अरण्याच्या मध्यावर खडकाळ प्रदेश, खडकावर उभा चांदीचा किल्ला, किल्ल्यात पाणी आहे. पाणी वाहत नाही, तरी स्वच्छ निर्मळ आहे. सांग ते पाणी म्हणजे काय ?'

तारक्कानं उखाण्यातला जो भाग नीट समजला नाही. त्याचा अर्थ समजावून घेतला आणि उखाणा असा दोनदा कानावरून जाताच तिनं ताडकन् उत्तर दिलं. अनंताला याही वेळेला हार खावी लागली. नंतर असं ठरलं की जो हरेल त्याला एक बुक्का खावा लागेल.

तारक्कानं विचारलं, 'लाल घोड्यावर कोणी स्वार, एक राजा उतरतो, एक राजा चढतो. सांग कोण ते ?' इतर मुलांकडे बघत स्मित करीत काही फोड करून सांगायला मना केलं. अनंताला त्याचा अर्थ लागला नाही, तो हरला. तारक्कानं आता त्याला एक बुक्का ठेवून द्यायला हवा होता, पण अनंतनं त्या बदल्यात एक गोष्ट सांगितली. त्या गोष्टीचे नायक नायिका भरमा आणि तारक्का होते. आता तारा हरली. अनंतानं तिला चिमटा काढला. तारक्का त्याच्याकडे पाहात हसली. या दोन वर्षात तारक्काच्या मनावर औदासिन्याचं जे सावट दाटून आलं होतं ते अनंतानं चारपाच दिवसात दूर पळवून लावलं.

नाटक सुरू झालं. मल्लुच्या सागण्यावरून देवळाच्या अंगणातल्या पायरीवर पाटील कुळकर्ण्यांच्या शेजारी अनंतासाठी जागा राखून ठेवण्यात आली होती. अनंत तिथं जाऊन बसला. तारक्का बायकांच्या घोळक्यात बसली होती. भरमाही खेळ पाहायला आला होता. त्याला अशा 'बयलाट' नाट्य प्रकारात खूपच रस होता. तो रंगमंचाजवळ पुढच्या रांगेत बसला होता. खेळ सुरू झाला काही वेळ चालला. 'बयलाट' मध्ये रंगमंचावर पात्र येतं. आपली भूमिका वठवून निघून जातं. त्याच्या जागी मग दुसरं पात्र येतं. खेळ संपेपर्यंत याच पध्दतीनं नाटक चाललेलं असतं. पडद्याच्या ऐवजी पार्श्वभागी शाल धरून उभं रहायची पध्दत आहे. नाटकात दूताचं काम करणाऱ्यानं शाल आणली आणि पुढच्या रांगेत बसलेल्या प्रेक्षकांपैकी कोणी तरी दोघांनी शाल धरायसाठी वर यावं असं आवाहन केलं. तीनचार जण मोठ्या उत्साहानं या कामासाठी पुढे सरसावले त्यात भरमाही एक होता. नाटकात कामं करणारी पात्रं जवळून पाहायला मिळतील या भावनेनं तो उठला असणार. नाटकात जर स्त्री भूमिका करणारी कोणी मुलगी असेल तर तिला पहायला

मिळावं अशी या खेडवळ मुलांमध्ये जबरदस्त इच्छा दबून असायची. कदाचित या कुतुहलापोटीच भरमा जागचा उठला असणार काही का असेना, भरमानं उठून शाल धरली. एक नटी रंगमंचावर आली आणि गायला लागली. भरमा तिच्याकडे टक लावून पाहात होता. खाली बसलेल्या तरूण पोरांपैकी एक जण थट्टेनं म्हणाला, 'या टोणग्यानं जन्मात कधी बाईचं तोंड पाहिलंय की नाही!' त्याच क्षणी अगदी अचानक अनंताची नजर तारक्काकडे गेली. त्याच्या तोंडावर हसू विलसत होतं. तारक्काचं तोंडही हास्यानं फुलून आलं. पण त्यामागे एक तीव्र वेदना होती. नाटक रंगत चाललं होतं. त्यात वेळोवेळी श्रृंगारिक प्रसंग आले की अनंत तारक्काच्या तोंडाकडे पाहात होता. तीही त्याच्याकडे पाहायची. नजरानजर व्हायची, मुद्रा फुलून यायच्या. त्या जनसंमर्दात दोन आत्मे एकमेकांना भेटत होते. पावलं एकाच तालावर थुईथुई करून नाचायला लागत असावीत. तिच्याकडे पाहायची त्याला इच्छा झाली की आपोआप तिची नजर त्याच्याकडे वळत असे. एकमेकांना एकाचवेळी ते जे असं पाहत होते त्याचं कारण एक त्यांचा अंतरात्माच जाणो! पुन: पुन्हा त्यांच्या नजरा मिडत आणि विलग होत. अशाप्रकारे पहाट फुटेपर्यंत कृष्ण - सत्यभामाच्या नाटकाबरोबरच तेही मनानं एक झाले आणि दोघे घरी परतले.

सूर्य वर आलेल्याला दोन तास लोटले होते. अनंत रात्री नाटकाला गेला होता. चांगलंच जाग्रण घडलं होतं म्हणून अजूनही बिछान्यात या कुशीचा त्या कुशीला होत पहुडला होता. तारक्का आणि रत्ना कधीच्या उठून शेतावरच्या झोपडीकडे जाण्यासाठी सामानाची आवराआवर करायच्या तयारीला लागल्या होत्या. तेवढ्यात एक शेजारीण रत्नाला हाक मारीत आत आली.

'काय ग, काय आहे? ये ना, सकाळी सकाळीच कशी काय?' म्हणत रत्नाव्वा बाहेर आली.

'काम बिम काही नव्हतं, ही अशीच आल्ये आपली. हे मागच्या बाजूला जात होते तिकडे जाता जाता...' असं म्हणून बसता बसता विचारलं, 'तारा केधी जाणार आहे?'

'जत्रा कालच तर आटोपली. जरा चार दिवस राहून जाईल. आता तिथं कोणतं मोठं असं काम पडून राहिलं आहे?' रत्ना काहीशा अनुत्साहानं म्हणाली. 'काल तूही गेली होतीस का जत्रेला?'

'हो गेले होते. आता तर तीन वर्षातनं एकदा कुठं जत्रा भरते ही. आम्हाला कुठं मोठं दूर जायचं आहे. शुक्रवारी नाटकवाले निघून जाणार मग जत्रा कां नको बघू? तू कां नाही गेलीस?'

'सुना आणि मुलं सारे गेले होते. घरात गुरा ढोरांच्या दाणावैरणीकडे पाहायला.... त्याना प्राणीबिणी पाजायला तर कोणी रहाणं भाग होतं; म्हणून राहिले.' मग थोडं थांबून म्हणाली, 'हो रत्ना, या वर्षी खूप रोगराई पसरेल.. दु:ख कष्ट वाट्याला येतील असं ऐकलं, खरं का ते ?'

'हो काल जत्रेत लगमव्वानं भाकित केलं खरं... एकएका चितेत चारचार प्रेतं जळतील.... पापं वाढलीत ना, मग असं होईल नाही तर काय ?'

'होय बाई! चिम्मव्वा तरी कशी वेडी आहे... ?'

'कशीही का असेना... आमच्या घरात तिचा विषय काढू नकोस. आम्ही एक म्हटलं तर त्यांना दुसरंच वाटतं. वर पुन्हा मधली माणसं काहीच्या काही बनवून सांगतात. करायला जावं एक, तर होतं भलतचं' मग तिनं स्वत:च्या बोलण्याला आवर घालीत अखेर विचारलंच, 'काय असं काय झालंय ?'

'काही नाही... पोरगी जत्रेला गेली म्हणून असं का काही बोलायचं असतं ? ती स्वत: तर कुठं जात नाही. बिचाऱ्या अक्कातायीनं जत्रेला जाऊ द्यावं म्हणून तिच्या एवढ्या मिनतवाऱ्या केल्या पण नाही जाऊ दिलं ते नाही'.

'हां तेव्हाच तर अक्का कुठं दिसली ना... !' बाहेर येत तारा म्हणाली.

'ती येती तर दिसती ना! पोरगी घरात बसून होती सकाळ धरून' मग काही विचार करून, 'तू गेलीस म्हणून देखील एक एक काय काय म्हणून ऐकवलंन् !'

'काय म्हणाली ?' तारानं विचारलं.

'म्हणाली की, सासऱ्याला जाऊन अजून वर्ष देखील पुरं झालं नाही अन् इकडे हिला नटून थटून जत्रा अन् नाटक पाहायला जावसं वाटतंय!' मी म्हणाल्ये, 'तरूण पोरी घरात कशा बसून राहतील, गेली असेल झालं!' अशा प्रकारे चिम्मव्वाचं बोलणं जरा तिखटमीठ लावून तिनं सांगितलं.

'तुम्ही कसेही वागा, ती काही ना काही खोड त्यात काढणारच आणि काही ना काही नासकं कुसकं बोलणारच! ज्याला गूळ आवडत नाही तो त्याला कडू म्हणून नावं ठेवणारच. ती देवीच्या जत्रेला कां नाही गेली ? घरात रोजचं जेवणखाणही बंद आहे की काय ?'.

'पाहिलंस आई, तू अक्कातायीला बोलावून आणून बरोबर घेऊन जा म्हणत होतीस ना, म्हणजे मलाही बोलणी खावी लागली असती की ?' तारक्का म्हणाली.

ही बोलणी ऐकून अनंत उठून बसला. त्यानं त्या म्हातारीला जरा रागारागानंच विचारलं, 'काय म्हणत होती. आणखी किती दिवस जायला नको होतं ?'

अनंताला अशाप्रकारे कोणी चुगली चहाडी केलेले आणि याच्या त्याच्यात लावालाली

केलेली मुळीच आवडत नसे. ही त्याला हेही माहीत होतं की तारक्काला यापूर्वी जो त्रास भोगावा लागला त्या मागे अशाच कोणातरी चुगल खोराचा केवढा तरी हात होता. म्हणून त्यानं कपाळाला आठ्या घालीत म्हटलं, 'यात इथं येऊन सांगायसारखं काय होतं ? अशा प्रकारचं याचं त्याला आणि त्याचं त्याला सांगून आजवर किती भांडण लावून दिलीत ?'

'आम्ही कशाला कोणाची भांडणं लावायला जातोय, बाबा.. ?' असं म्हणत काही बाही बडबडत म्हातारी तिथनं निघून गेली.

'अनंता, असे घरी येणाऱ्या जाणाऱ्यांना असं बोलायचं नसतं बाळा' रत्नव्वा म्हणाली.

तेवढ्यात तारक्कानंच उत्तर दिलं. म्हणाली, 'या लोकांना काय गरज आहे अशा पंचायती करायची, तोंड मिटून गप्प का नाही बसत एक जागी ! एक तर खोटं आणि पुन्हा वर त्याला तिखटमीठ लावून याचं त्याला सांगत गावभर फिरतात !'

त्याच दिवशी दुपारी ते शेतावरच्या झोपडीत वस्तीला गेले. गाय म्हैस तिथंच होती. देवीच्या जत्रेसाठी दोन दिवसाकरिता गावात आले होते. शेतावर राहायला गेल्यावर एक दिवस दुपारचं अनंत आणि तारक्का आंब्याच्या झाडाखाली बसून गप्पागोष्टी करीत होते. जवळच नाभिराजही बसला होता. अनंत 'आनंदकंद' ची गोष्ट वाचून दाखवीत होता. तारक्काला समजायला सोपी जावी म्हणून त्यानं 'जाडर जानप्पा' नावाची गोष्ट निवडली होती. गोष्ट सांगता सांगता अनंताला मधून मधून हसू फुटायचं, तारक्का सारखी सारखी म्हणायची, 'लक्षात नाही आलं, पुन्हा वाच,' ते दोघे हसले की नाभिराजही त्यांचं पाहून हसायचा.

या गोष्टीत एक गाणंही होतं. ते गायसाठी अनंत जरासा थांबला घसा साफ करून वाचायला लागला.

हसत हसत चाललीस
विजेसारखी मान दावून।
नयन जणू मदन-बाण,
आरस्पानी गाल तुझे,
ओठ मखमली नाजूक साजूक
पदरावरती लक्ष असू दे
उगाच घसरेल ध्यानी ठेव।
अगे उर्वशी, रंभा, मेनका
तुझी बरोबरी कोण करे ?
पासंगाला कोण नुरे !

थांब जराशी जरा बोल गे
शुकी तू प्यारी माझी - माझी
की निव्वळ माया - मूर्ती
हसत हसत चाललीस
सरत्या दुपारी, नदी किनारी,
पाण्यासाठी
तेव्हा एकदा प्रथमच तुजला
न्याहाळले होते तना मनाने
धावत सुटलो तुझ्याकडे
जादू केलीस तू मजवरती,
बंदिवान केले मनास माझ्या
बांधून ठेविलेस नेत्र तसेच,
तू कां वर्षसी अग्नि असा गे ?
नेत्र तुझे प्राण हारती ।
हसत हसत चालतीस ।

हातवारे करीत तो गाणं गायला लागला. तारक्का अनंताच्या पुढ्यात जरा सरकून बसली. नाभिराजला काहीं समजलं नाही. हे दोघे मोठे होते. त्याच्याहून अधिक शहाणे सुरते होते. तो त्यांच्या तोंडाकडे पाहत राहिला. त्याना हसताना पाहून हसत राहिला.

अनंत गोड आवाजात गात होता. गाता गाता हात पुढे करून ताल देता देता त्याचा हात तारक्काच्या हातावर सहज पडायचा त्याचं तिकडं लक्षच नव्हतं. गाणं रसिलं होतं. त्या दोघांची बोटं नकळत एकमेकांत गुंफली जात... जरासा चाळा करीत आपोआप विलग होत. एकाच्या हातानं दुसऱ्याच्या बोटांना जरासा फटका लगावला तर दुसरा त्याची बोटं हळुवारपणे चोळायचा. गाण्यात एक छानसा प्रसंग आला. अनंतानं तारक्काकडे पाहिलं. तिनं त्याच्याकडे पाहिलं. नजरा नजर होताच दोघंही नखशिखांत रोमांचित झाले. त्याना वाटलं की जणू दोघांची सारी शक्ती गळून पडलीय. अंगातले सारे त्राण जणू पार निचरून गेलेय. नाभिराजचं तिकडे लक्ष नव्हते आणि जरी असतं तरी त्याला त्यातलं काही एक उमजलं नसतं. तारक्का हाताच्या तळव्यावर हनुवटी टेकवून तोंड वर करून गाणं ऐकत होती. गाववत नव्हतं तरी अनंत गात होता. गळा सुकला होता घशाला कोरड पडत होती. तारा ऐकण्याच्या मन:स्थितीत नव्हती तरी ऐकत होती.

अनंतानं आपला हात तारक्काच्या खांद्यावर ठेवला. तारक्का आणखी पुढे झुकली. त्याचा हात तारक्काच्या पाठीवरून फिरू लागला. जसा पाठीवर तसाच तिच्या

माध्यावरच्या केसांवरूनही फिरत होता. 'नाभू, आत्या काय करतेयत जरा बघून ये ना ?' नाभिराजला तिथून पिटाळून लावण्यासाठी तारक्का म्हणाली.

नाभिराज जायसाठी उठणार तेवढ्यात झोपडीतनं रत्नानं तारक्काला हाक मारीत म्हटलं, 'तारा, जरा इकडे ये बरं हे बघ, लाडूसाठी पाक तयार केला होता... पण का कोण जाणे लाडू व्यवस्थित वळले जात नाहीएत. कदाचित पाक जरा जास्त उकळला गेला असणार!' तारक्का अगदी जीवावर आल्यासारखं होऊन अनिच्छेनं उठली. अनंताच्या हातातलं पुस्तक निसटून खाली पडलं. पुन्हा दोघांची नजरानजर झाली. दोघांच्याही डोळ्यात एक नशेची धुंदी होती. तारक्काचे पाय थरथरत होते. ती हळू हळू गेली. अनंतही तिथंच बिछान्यावर लवंडला.

त्या दिवशीचा सूर्य पश्चिम आकाशात हळू हळू उतरू लागला. हळू हळू सर्वत्र अंधार पसरू लागला. नेहमी प्रमाणे जेवणखाण आटोपून सारे झोपी गेली. अनंत आणि मल्ल बाहेर उघड्यावर झोपले. तारा बरोबर रत्नव्वा आत झोपली. त्या दोघींच्या मध्ये नाभिराज झोपला. त्या रात्री तारक्काला झोप आली नाही. ती रात्रभर या कुशीचं त्या कुशीला आणि त्या कुशीचं या कुशीला होत राहिली. एखादवेळी मध्येच जाग आल्यावर रत्नव्वानं विचारलं देखील की, 'का ग जागी का ? का नाही झोप येत ?' त्यावर उत्तरादाखल तारानं, 'ही आत्ता आत्ताच तर जागी होतेय' असं खोटंच सांगितलं. सकाळी दिशा उजळायच्या आतच मल्ल उठून बसला आणि गोठ्यात जाऊन त्यानं गुराखालचा केर कचरा साफ केला. तसं रत्नव्वानं उठून त्याच्यासाठी न्याहारी बांधून दिली. मल्ल बैल घेऊन वरल्या अंगाच्या शेतात नांगरणीसाठी निघून गेला. त्यानंतर गव्हाची टोपली घेऊन बाहेर जाता जाता रत्नव्वा म्हणाली, 'मी दळण दळून आणायला गावात जात्येय, आपलं जातं चालत नाहीए. टांकी लावून घ्यायला हवी एकदा!'

'मी ही येऊ' अस्वस्थपणे तारानं विचारलं.

काही जरूर नाही, उद्या सासरी गेल्यावर दळायचं हे आहेच. इथं आहेस तोवर चार दिवस भरपूर झोपून घे'. असं म्हणत रत्नव्वा गावात जायला निघून गेली.

तिथं आता आणखी कोणी नव्हतं. छोटा नाभिराज अजून झोपलेलाच होता. तिथं बाकी उरले काय ते तारा आणि अनंत.

तारक्का बिछान्यातल्या बिछान्यात एकदोनदा लोळून या कुशीची त्या कुशीला झाली, थोडी खोकली. अनंत काही बोलेल म्हणून तिनं थोडी वाट पाहिली. परंतु अनंत जागा नव्हता. त्यालाही पहाट उजाडेस्तो नीटशी झोप लागली नव्हती. सताड जागाच होता. त्यानं झोपायचा प्रयत्न केला परंतु त्याला नाना विचार सतावित राहिले. दुपारी अनुभवाला आलेलं ते अननुभूत आणि हवंहवसं वाटणारं अलौकिक रसप्रद सुख त्याला पुनः पुन्हा

स्मरायला लागलं. मन एका अनामिक अस्वस्थतेनं........ अशांतीनं व्यापून टाकल्यासारखं झालं होतं; जोडीला अतृप्तीही होतीच. तो दुपारची ती घटना विसरण्यचा प्रयत्न करीत होता आणि नेमकी तीच पुन: पुन्हा त्याच्या मनात डोकावत होती. तिचे पुन: पुन्हा स्मरण होत होते. झोप आली नाही. पापणीला पापणी लागली नाही. त्याला याचं कारण काही उमगलं नाही पण एक अभिलाषा त्याचं अंतर्मन सारखी टोकरीत होती. त्याचबरोबर त्याच्या मनात असंही येई, की आपण अशी इच्छा अपेक्षा बाळगणं योग्य नव्हे. आपण समजूतदार आहोत. शील आणि सभ्यपणा, सुसंस्कृतपणा यांची वेळोवेळी चर्चा करतो, विचार करतो, विचार करतो. ती खेडवळ मुलगी आहे, अगदीच अजाण. ती जरी अशी वागली तरी आपण तिला प्रोत्साहन देता कामा नये. या विचारात गुरफुटल्यामुळं त्याला बराच वेळ झोप आली नाही. हे आत्ताआत्ता कुठं त्याला डुलकी लागली होती.

काही वेळ गेला. सर्वत्र शांतता होती. सकाळचा मंदवारा वाहात होता. तारक्का अंथरूणातनं उठली, हळूच बाहेर आली. अनंताच्या बिछान्याकडे गेली तसं तिचं मन जरासं घुटमळलं. तिनं आवतीभोवती निरखून पाहिलं. जरा घाबरली. पण कुठलीशी आंतरिक अभिलाषा तिला अनंताकडे खेचत होती. ती ओढ, ते आकर्षण ती थोपवू शकली नाही. ती अनंताच्या बिछान्याजवळ जाऊन उभी राहिली. त्याला एकटक नजरेनं पाहत राहिली. त्याची निद्रामग्न मुद्रा मोठी मोहक दिसत होती. विखुरलेल्या काळ्या केसांनी काहीसं झाकोळलेलं त्यांचं तोंड कृष्णमेघांनी वेढलेल्या चंद्रबिंबासारखं दिसत होतं. डोळे, नाक, कपाळ सारे आखीव रेखीव असल्याकारणाने त्याच्या सौंदर्यात भरच घालीत होते. त्याचे उभार गुबगुबीत गाल तारक्काला नेहमीपेक्षा अधिक मोहक वाटले, आवडले.

काही काळ ती तशीच त्याला निरखून पाहात राहिली. श्वास घेताना क्षणभर अलगविलग होणाऱ्या त्याच्या थरथरत्या लालचुटूक ओठांचे चुंबन घ्यावे अशी तिला इच्छा झाली. दुसऱ्याच क्षणी त्याच्या पाशी बसून त्याचे विस्कटलेले केस सावरण्याची तिला इच्छा झाली. पण काय करावं हे तिचं तिलाच ठरविता येईनासं झालं. तिनं वाकून अनंताचं तोंड पाहिलं. तिला काहीशी भीती वाटली, काळजाला कापरं भरलं. कुठलीशी अगतिक भीती तिच्या काळजात दडून राहिलेली होती. ती हलकेच मागे सरली. पाऊल न वाजवता मागे फिरली. चार पावलं झोपडीच्या दिशेनं ती गेली देखील, पण तेवढ्यात त्याला पाहायचीं पुन्हा इच्छा झाली. पण पाहिलं नाही... तशीच पुढं गेली. पावला पावलागणिक काळजाचं धडधडणं वाढत होतं. वाटलं की आपण नाभिराजला जरा उठवावं. परंतु तिच्या प्रबळ आकांक्षेनं तिला असं काही करू दिलं नाही. ती दाराशी गेली पण कुठल्याशा

अनामिक शक्तीनं तिला आत पाऊल टाकू दिलं नाही. तिनं पुन्हा वळून पाहिलं. अस्फुट वासनेची लहर तिला त्याच्याकडे ओढून नेत होती. हवेत उडणाऱ्या कापसाप्रमाणे तिचं मन त्याच्याकडे ओढलं जात होतं. कोणास ठाऊक ती कधी अनंताच्या बिछान्यापाशी गेली आणि त्याच्या पायाशी जाऊन बसली! काय करावं हे काळ तिला उमगेनासं झालं. अखेर अनंताच्या पायाला आपल्या कोमल हातानं स्पर्श करीत तिनं त्याला साद घातली. 'अनंत !' तिच्या आवाजात कंप होता.

साखरझोपेची वेळ होती ती. अनंत अर्धवट झोपेत होता. मागचेच विचार त्याच्या डोक्यात घोळत होते. ताराच्या हळुवार शांत शीतल स्पर्शानं तो जागा झाला. त्यानं डोळे उघडले. समोर तारा होती.

'काय म्हणतोस अनंत ?' कापऱ्या आवाजात काय बोलावं हे न सुचून तारानं विचारलं.

अनंत डोळे चोळीत उठून बसला. तारक्का त्याच्या पुढ्यातच त्याच्या पायाशी बसलेली होती. अनंत जरा मागे सरकून बसला. काहीसा चक्रावून गेल्यासारखा झाला. त्यानं भीत भीत वळून आपल्या आतोबाच्या अंथरूणाकडे पाहिलं.

'कोणी नाहीए' तारक्कानं त्याचा एकूण भाव जाणून म्हटलं.

'कुठं गेलेत ?' अनंतानं विचारलं.

'बाबा शेतावर गेलेत अन् आई दळायला', तिच्या स्वरात एक व्याकुळता होती.

अनंताचं काळीज जरा उडालंच ! तारक्का त्याला एखाद्या उन्मादिनीसारखी भासली. त्यानं मनाशी विचार केला मी हिच्या बरोबर एवढी घसट वाढविली हे काही बरं नाही झालं. तो काही काळ दिङ्मूढ होऊन गेल्यासारखा स्वस्थ बसला. शेवटी म्हणाला, 'तू नाही गेलीस दळायला ?'

तारक्का यावर काही एक बोलली नाही. गप्पच राहिली. मान खाली घालून बसून राहिली. अनंतानं पुन्हा विचारलं, 'तुला इथं यायची इच्छा कां बरं झाली ?'

'इच्छा कां झाली ? का आल्ये? तूच सांग ना!' तारक्काचा आवाज स्थिर होता पण त्याहूनही अधिक म्हणजे त्यात एक दीनवाणेपणा होता, केविलवाणेपण होते.

अनंताला समाधान वाटलं. पुढं काय बोलावं हे त्याला उमगेनासं झाले. क्षणभर एकमेकांची तोंडं न्याहळीत ते गुपचूप बसून राहिले. शेवटी अनंताला वाटलं, की म्हणावं 'तू इथून निघून जा कशी ?' पण तो असं काही बोलू शकला नाही. त्यानं हलकेच शाल तोंडावर पांघरून घेत बिछान्यावर अंग टाकलं. शालीतून पायापाशी बसलेली तारक्का त्याला अजूनही दिसत होती. त्यानं डोळे घट्ट मिटून घेतले. पण तारक्काचं रूप काही तो विसरू शकला नाही. तारा आताही एखाद्या तारकेप्रमाणे चमचमत होती. अनंतानं तोंडावरची शाल दूर केली त्यासरशी त्याच्या चेहऱ्याला हळुवार वाऱ्याची

एक झुळूक स्पर्शून गेली. कदाचित ती त्याच्या मनालाही स्पर्शून गेली असावी. अनंत उठून बसला पण आता मागे सरकून वगैरे बसला नाही.

तारक्का त्याच्या जवळ आणखीनच सरकून बसली. 'कां काही बोलत का नाही ? बोलणार नाही कां ?' जरा करूणेनं ओथंबलेल्या स्वरात तारक्का म्हणाली.

त्या क्षणी त्याला वाटलं की सरळ 'नाही' म्हणून सांगून टाकावं. पण कुठल्याशा प्रबल आंतरिक इच्छा शक्तीनं त्याला असं काही व्यक्त करण्यापासून परावृत्त केलं, थोपविलं. त्यानं सरळ तारक्काच्या तोंडाकडे पाहिलं. तीही त्याच्याकडे पाहत होती. दातांनी अधरोष्ट दाबून धरला होता. अनंताच्या हातानं नकळत तिच्या गालावर एक गोडशी चापट ठेवून दिली. ओठातून स्मित फुटले. तारक्काचे ओठही स्मितानं फुलून आले.... त्या बरोबरच तिच्या भुवया उंचावल्यासारख्या झाल्या जणू अनंताच्या अंत:करणात उमटलेले भाव जाणून घेण्यासाठीच ! अनंताच्या भुवयांनीही बहुदा त्याला संमती दिली. तारक्कानं त्याला वेडावून दाखवीत तोंड किंचितसं वाकडं केलं ! अनंतानंही तोंड किंचितसं वाकडं करीत तिला वेडावून दाखविल्या सारखं केलं !

चहू दिशांना चांदणं पसरलं होतं, त्यानं तारक्का पुलकित होऊन गेली. तारक्का हळूच 'आत चल' म्हणाली. तिच्या आवाजात एक अधीर कंप होता. अस्वस्थ थरथर होती.

'नाभू ?' अनंतनं विचारलं. तारक्का गप्प बसली. तिची मुद्रा फिकट झाली, चेहऱ्यावरची सारी टवटवी नष्ट झाल्यासारखी होऊन गेली. जणू काही आपल्या देहातलं सारं बळच कोणी तरी हिरावून घेतलंय, नाहीसं करून टाकलंय असा तिला भास झाला. क्षणभर तिनं विचार केला. अखेर तिच्या तोंडून निघालं, 'आत जाऊया !'

'आत कशाला ?' अनंताच्या तोंडून अस्पष्टसे शब्द उमटले. तारक्कानं सभोवार पाहिलं. सर्वत्र चांदणं पसरलं होतं. कदाचित तिला प्रकाशात बरं वाटलं नसावं.

इकडे अनंताचं काळीजही जोरजोरानं धडधडायला लागलं. अंगातला रक्तप्रवाह वेगानं सळसळायला लागला. काहीशी अजब स्थिती झाली. बसल्याबसल्याच श्वासोच्छवास जोर जोरानं व्हायला लागला. उच्छ्वास नाकपुड्यावाटे बाहेर पडताना सुँई सुँई असा गमतीदार आवाज व्हायला लागला. असं वाटू लागलं की जणू त्याच्या देहातली सारी शक्ती, सारं त्राणच संपुष्टात आलंय. साऱ्या शरीराची थरथर, उष्णता आणि रोमांच इतके वाढले, की ते सारं शमविण्यासाठी काही तरी थंडगार कवटाळावे अशी त्याला तीव्र इच्छा झाली. अनंतानं एका हातानं ताराला जवळ ओढलं. दुसरा हात त्यानं तिच्या खांद्यावर ठेवला... घसरत घसरत तो तिच्या वक्षावरून फिरू लागला. तारक्कानं दोन्ही हातानं अनंताचा चेहरा घट्ट पकडला. दृष्टीत दृष्टी मिसळली - एकरूप झाली. दोन्ही

तोंडं जवळ आली. ओठांना ओठ भिडले - सुख प्राप्त झाले. दुसऱ्याच क्षणी तारक्का अनंताच्या बाहुपाशात जखडली गेली.

चंद्र पश्चिमेला बुडत होता. त्याचा चेहरा पांढरा फटक पडला. कदाचित तो अनंत प्रेमानं भूवधूचं चुंबन घेत असावा. ते पाहून समोरच्या उषेचं मुखमंडल आरक्त होऊन गेलं. पूर्वेकडे तिच्या स्मितसदृश एक तारा चमकत होता. हे सारं पाहूनही न पाहिल्यासारखं करीत कृष्णा संथपणे वाहत होती. झाडा झुडपांतून पक्षांचं मंजूळगान ऐकू येऊ लागलं.

तेवढ्यात 'तारा तारा' अशी हाक मारीत रत्नव्वा आली.

# 13

शहाण्या माणसांनी चुकीच्या मार्गानं जायचं म्हटलं तरी एकदम ती त्या मार्गानं जाऊ शकत नाहीत. ते त्याच्या बऱ्यावाईटाचा प्रथम विचार करतात. विचार करता करता सरळ मार्गानं बरंचसं चालून जातात. माणसाच्या नैसर्गिक आशा-आकांक्षाही त्याला निराश आणि नामोहरम करण्याचा यत्न करीत असतात. अशावेळी सद्सद्विवेक आणि माणसाची सहजबुद्धी यांच्यात संघर्ष होतो. त्यात अधिकांश मंडळी सहज प्रवृत्तीच्या आधीन जातात. आणि ते तसे स्वाभाविकही आहे. परंतु ते किती काळ ? तत्कालीन इच्छा पूर्ण होईपर्यंत ! लगेचच सदसद्विवेक बुध्दी जागृत होते. आणि मग त्यात जाणवतं की आपण केलंय ते चुकीचं आहे. त्याचं मन त्याची चूक मान्य करते आणि तो ती लपविण्याचा प्रयत्न करतो अन् तशी चूक पुन्हा न करण्याचा निश्चय करतो. अनंताची स्थितीही अगदी तशीच होती.

अनंत तिथंच बिछान्यावर लोळत पडला होता. या कुशीचा त्या कुशीला होत होता, डोक्यावरुन शाल पांघरुन घेऊन तोंड झाकून पहुडला होता. त्या वेळी त्याला आपलं जीवन अगदी नकोसं होऊन गेलं होतं. कसा हा गाढवपणा आपल्या हातून घडला. आत्याला हे कळलं असेल ? आतोबांना जर हे समजलं तर काय होईल ? ही गोष्ट जर तारकाच्या सासरकडच्यांना समजली तर तिची काय दशा होईल ? आधीच नकोशा झालेल्या सुनेला जर त्यांनी घराबाहेर काढलं तर ती बिचारी कुठं जाईल ? हे पाप-हा अपराध मला जाळून भस्म केल्यावाचून राहील थोडाच ? एकुलत्या एक लेकीचं सुख ते आपलं सुख मानून जीवन कंठणाऱ्या आत्या-आतोबांची काय अवस्था होईल ? काहीही घडलं असलं तरी देवानं होतं तसं ठेवावं, तारका लवकर सासरी आपल्या नवऱ्याकडे जावो आणि सुखानं राहो ! असं झालं तरच माझं अपराधाचं भय शमेल.

अनंताच्या विचारांचा ओघ इथं येऊन थबकला. बहुदा कुठल्यातरी आंतरिक भावनेनं तो तिथं थोपविला. अन् लगेच विचारांचा तो ओघ वेगळ्या वाटेनं वाहू लागला. तारका पतिगृही जाऊन सुखानं नांदो ! कां असं का ? त्यामुळे माझ्या अपराधाचं क्षालन होईल ? माझ्या मनात हे असंच येतंय ना ? जरी ती तिथं सुखात राहिली तरी मला इथं काय सुख लागणार आहे. मी सुखी होणार आहे ? नाही. तिनं सुखात रहायची गरज नाही-का ? माझ्या समाधानार्थ तिनं उभं आयुष्य दुःखात कंठायला हवं ? कसली ही माझी विचार

सरणी - काही अर्थ आहे का त्याला ? ही तर शुध्द स्वार्थांधता ! नाही...नाही...ती सुखी राहो. मी दु:खानं पिचून झिजून मेलो तरी त्याची मला मुळीच पर्वा नाही. नाही..नाही...असं मनात आणायची काही एक आवश्यकता नाही. माझ्या मरणानं तारकाला काय सुख लागणार आहे ?..सुखी होणार आहे होय ती ? नाही...कालत्रयीही नाही. उलट ती अधिकच दु:खी होईल. तिनं दु:खी व्हायची गरज नाही. तिनं सुखात हसत खेळत आनंदानं आयुष्य घालवावं असं मला मनोमन वाटतं. नव्हे ती माझी आंतरिक इच्छा आहे. पण मग त्यासाठी आम्हा दोघांना एकत्र रहावं लागेल. -आणि ते कसं काय ?

त्याच्या विचार लहरींनी पुन्हा वेगळं वळण घेतलं. त्याच्या मनात आणखी एक विचार उमटला : येऊ दे ! ह्या अनीतीच्या अन्यायाची सुखाकांक्षा मला का ? ही गोष्ट उद्या माझ्या बायकोला समजली तर तिला काय वाटेल ? मी काय तिला बायको म्हणून आपलीशी मानलीय-पत्नी म्हणून तिला स्वीकारलंय ? कधी कुठं लहानपणी भावला-भावलीचं लग्न लावावं तसं तिचं माझं लग्न लावून दिलं होतं. ते काय लग्न होतं ? पण जसा मी दुसरीवर अनुरक्त आहे तशीच तीही कोणा दुसऱ्यावर ... अशक्य आहे हे. त्याला वाटलं जणू कोणी नवी व्यक्ती, जिला बाळपणी त्यानं पत्नीच्या रुपात पाहिलं होतं, ती त्याच्या तोंडावर मारे त्याची थट्टा उडवतेय ! टवाळी करतेय ! त्याचं मन घाबरु लागलं. त्या व्यक्तीसमोर अनंत आत्मवंचना करायला लागला.

प्रात:कालचा सूर्य क्षितिजावर दोन हात वर आला होता. कोवळ्या उन्हानं निसर्गात नवचैतन्याचा संचार घडवून आणला होता. तारका नेहमीपेक्षा अधिक उत्साहानं उठून भांडी घासण्यात मग्न झाली होती. नेहमीसारखं असतं, तर एव्हाना तिनं हाका मारुन अनंताला उठवलं असतं. परंतु आज तिला अनंताकडे पाहायला भारी संकोच वाटत होता. रत्नव्वा गावातनं आल्यापासून गप्पगप्पच होती. आल्याआल्याच तिनं पिठाचं टोपलं एका बाजूला ठेवलं आणि स्वत:ला घरकामाला जुंपून घेतलं. कोणाशी एक चकार शब्द बोलली नाही. मधूनच काहीतरी बडबडायची. हे पाहून तारकाला आईशी काही बोलायचं धाडस झालं नाही. गुपचूप चुलीपाशी बसून भांडी घासत राहीली. तिचं काळीज भयामुळे ज़ोरजोरात धडधडत होतं. तिला असं वाटत होतं की आपण काही एक फार मोठा अपराध केलाय. आईनं तो पाहिलाय. आणि त्यामुळे ती आपल्यावर अशी रागावलीय ! तिचं तोंड एकदम खर्रकन उतरलं. ती ओशाळली...लज्जित झाली. विजेचा स्पर्श व्हावा तसा तिचा देह थरथरला...कापायला लागला. दु:ख झालं. रडावसं वाटलं. डोळे पाणावले. तिनं झटकन् मान खाली घातली-न जाणो आई एखाद्या वेळेस पाहायची बियाची ! तेवढ्यात रत्नव्वानं आश्चर्यानं विचारलं : 'अनंत अजून उठला नाही. का ? अजून झोपलाय ?' बोलण्यात एक गांभीर्य होतं.

तारक्का जराशानं म्हणाली, 'कोण जाणे, आज अजून का उठला नाही ते! रोज हा वेळ पावेतो उठायचा नेहमी', हे सारं बोलताना तारक्काच्या मुद्रेवर भयाची चिन्ह उमटून गेल्या वाचून राहिली नाही. बिचारी रत्नव्वा बोलून चालून साधी भोळी खेडवळ बाई! तिला ह्या गोष्टी कुठून समजल्या? ती खाडकन झोपडी बाहेर गेली आणि 'अनंत '' अशी हाक मारून तिनं त्याला उठवलं. अनंत आळोखे पिळोखे देत उठून बसला. त्याचे डोळे लाल झाले होते. तोंड उतरलेलं होतं. कपाळाला आठ्या घालीत त्यानं आवती भोवती पाहिलं.

रत्नव्वानं विचारलं, 'अजून झोप पुरी झाली नाही? तर आणखी झोपणार आहेस? झोप जा जरा. तू आपल्या घरी बाहेर उघड्यावर झोपत नव्हतास. इथं रात्री नीट झोप लागली की नाही?'

'झोप तर आली, पण कोण जाणे कां अजून हे असं आळसटल्यासारखं वाटतंय ते!'

'मी ही तेच म्हणत होत्ये, लेकरा! तू अजून उठला नाहीस हे पाहिलं आणि माझा जीव कसा उडून गेला. आला तसा सुखानं आपल्या घरी परत जा, बाबा, म्हणजे माझ्या जीवाला गोड वाटेल. इथं नको नको म्हटलं तरी तू गार पाण्यानं आंघोळ करायला लागलास. कुठं आजारी बिजारी पडून घरी गेलास तर तुझी आई मला बोल लावील. जत्राबित्रा संपलीय. थोडे रव्याचे लाडू बरोबर बांधून देते. ते घे आणि सुखानं आपल्या घरी परत जा कसा'. एवढं बोलून ती आपल्या कामाला निघून गेली.

रत्नव्वाचं हे सारं बोलणं पुरं होईपर्यंत अनंताच्या जीवात जीव नव्हता. नंतर एक थंड श्वास घेत मनातल्या मनात पुटपुटला. 'आता कुठचं सुखानं परतणं!'

जन्मल्यापासून आईचा स्वभाव आणि भाषा जाणणारी तारक्का भीत भीत हलकेच म्हणाली, 'अजून आणखी चार दिवस राहू दे. बुधवारी मीही जातेच आहे. तो ही तेव्हाच जाईल. बऱ्याच दिवसांनी येतो, नेहमी नेहमी थोडाच येतो? जेव्हा पहावं तेव्हा शाळेचं तुणतुणं ऐकवीत असतो.'

'तू तरी बुधवार पर्यंत कशाला थांबतेस, पोरी? उद्या सोमवारीचीच जा कशी! जे काही आहे त्यानंतरच चार लाडू बरोबर बांधून देते. साडी घरी आणून ठेवलेलीच आहे. पोरीबाळींना घरात ठेवून घेऊन काय त्यांचं लोणचं थोडंच घालायचंस? त्याना जिथं आयुष्य काढायचंय तिथं राहून त्या नांदलेल्याच बरं!' रत्नव्वानं हे सारं काहीशा कठोरपणे सांगितलं आणि चरवी घेऊन ती गोठ्यात धारा काढायला निघून गेली. आईला जातानाशी थोडा वेळ पाहात उभी राहत तारक्कानं एक दीर्घ निःश्वास टाकला आणि मान खाली वळविली.

बाहेर बसलेल्या अनंताचं काळीज धडधड करीत होतं. आत्यानं पाहिलं तर नाही

या विचारानं घाबरला. तोंड पांढरं फटफटीत पडलं. तोंड झाकून घेऊन अंथरूणावर पडला. त्याला वाटलं की कोणाला तोंड दाखविता कामा नये. जवळच्या आंब्यावर बसलेल्या कावळ्यांची काव काव देखील त्याला आपली थट्टा टवाळीच वाटली. तोंड झाकून घेतलेला अनंत जरा आणखीनच आक्रसून गेल्यासारखा झाला. उजाडल्याला तास दोन तास उलटलेले होते. तरी तारक्काला घरात जीवघेणी किर्र स्तब्धता पसरल्या सारखं भासत होतं. आई गोठ्यात म्हशीला काही बाही म्हणत होती, तरीही तारक्काला भ्याल्यासारखं वाटत होतं. तिच्या काळजातलं कुठलसं भय त्या एकांतात तिला पार चुरून चुरून पिळून काढीत होतं. तिला भारी भीती वाटली. तिला वाटलं भरमा डोळे तांबारून आपल्याकडे रोखून पाहत आहे. काय काम करावं हे तिला उमगेनासं झालं. ती हळूच उठली आणि न्हाणीघरात जाऊन पेटू घालायला लागली. तिला भास झाला की, अरे या चुलीतल्या लवलवत्या ज्वाला देखील आपला रागराग करीत आहेत. भक् भक् करीत उठणाऱ्या धुराचे लोट आपल्याला जणू धाक दाखवताहेत... दम भरताहेत असा तिला भास झाला. पाणी घालायसाठी उचलेली घागर नीटशी वर उचलता न आल्यानं हातातून निसटून धप्पकन् खाली आदळली. गोठ्यातूनच रत्नव्वानं हाक मारून विचारलं: 'काय पाडलंस ग ?' आईची हाक कानी पडताच तारक्काला जोरानं आक्रोश करावासा वाटला... किंकाळी फोडाविशी वाटली. रत्नव्वा गोठ्यातनं यायला निघाली. आई कुठं येतेय न येतेच तोच तिला घट्ट मिठी मारून स्फुंदून स्फुंदून रडायला लागली. तारानं आईच्या पदरात तोंड लपविलं. असं वाटलं, की जणू ती म्हणत होती, 'आई, माझी एवढी ही चूक पोटात घाल !'

रत्नव्वा अश्रु ढाळीत म्हणाली, 'मी का तुला इथं ठेवून घ्यायला नाही म्हणत्येय ? पण तुझी सासू दहालोकात बडबडत फिरतेय म्हणून पोरी उद्या जा म्हणून म्हणत होते.' असं म्हणत तिनं लेकीची आसवं पुसली.

तारक्कानं आईच्या तोंडाकडे भयमिश्रित उत्कंठेनं पाहत विचारलं: 'कोणाजवळ म्हणत होती ?'

''रस्त्यात ती म्हातारी चांगलव्वा भेटली होती. तुझी सासू तिला म्हणाली, 'उगादिच्या सणासाठी म्हणून गेली. चार दिवसात सणसोहळा वगैरे आटोपून तिनं लगेच परत यायला नको होतं काय ? देवीच्या जत्राही जवळच आली होती म्हणून माहेरी राहिली. तसं जत्रेला अजून पंधरा दिवस वेळ होता. तिला कुठल्या गोष्टीची काळजी आहे. आम्ही इथं मरतोय. कामं करता करता इथं आमचं भुस्कट पडतंय... अजून आणखी काही दिवस कशीतरी हाडं झिजवूही म्हणा. तिला काय त्रास आहे ? ती तर इथं येऊन गादी बळकावूनच बसली आहे.'

'ती तर पोटच्या पोराला धड बघत नाही, तर माझी काय गोष्ट ?' तारक्का निर्भयपणे

म्हणाली. रागानं तिचा चेहरा लालीलाल होऊन गेला होता.

तारक्काच्या मनात सासरविषयी जी चीड होती ती कमी करावी या हेतूनंच रत्नव्वा म्हणाली, 'लोकांचं बोलणं काय एवढं मनावर घ्यायचं? जाऊदे झालं. साधा उंदीर निघाला, तर सिंह निघाला म्हणून सांगत सुटतील!'

आता अनंताच्या जीवात जीव आला. तो उमगून चुकला, की अरे हे जे सारं काही इतका वेळ चाललं होतं ते चिम्मव्वाशी संबंधित होतं. शंकेला आता मुळी जागाच नव्हती. तो हळूच उठला आणि आत आला. तारक्कानं संकोचानं उठून त्याला लोटा भरून पाणी दिलं. अनंत बाहेर पडला आणि कोणाला काही एक ना सांगता नदीवर जाऊन स्नान करून आला. तरीही नेहमीसारखा उत्साह त्याच्यात नव्हता. दुपारचं जेवण आटोपताच त्यानं पुन्हा अंथरूण पसरलं. आज त्याच्या हातून काही लिहून वाचून झालं नाही. वाटत होतं की तो ही गूढ समस्या सोडवण्याच्या मागे होता. मनाला चिंतेची आग लागून राहिलेली होती. दिवस ढळता ढळता मल्लनं त्याला जेवायसाठी उठवलं. तसं अनंतानं 'भूक नाही' म्हणून सांगितलं. तेव्हा मल्ल त्याची जरा थट्टा करीत म्हणाला, 'तुम्हा लोकांचा काय हिशोब आहे काही कळत नाही बुवा! मी हे तिसऱ्यांदा खातोय. तुम्ही मंडळी थोडं चहाचं गरम पाणी पिता ना त्यामुळं नाही भूक लागत तुम्हाला. अरे, तू तर चांगला वीस वर्षाचा जवान पोरगा आहेस; एक दिवसही मी तुला कधी पुरी भाकरी खाताना पाहिलं नाहीए. आमच्या गावची ही खेडवळ मुलं तुझ्याहून वयानं किती तरी लहान पण ती बसल्याबैठकीला तीन तीन भाकरी सहज संपवतात'. असं म्हणून तो जेवायला बसला.

सायंकाळ होत आली होती. अनंत आंब्याखाली कांबळ पसरून पडल्यापडल्या या कुशीचा त्या कुशीला होत होता. रत्नव्वा त्याच्यापाशी गेली. त्यांच्या अंगाला तिनं हात लावून पाहिलं, प्रकृती ठीक होती. 'काय रे तोंड असं उतरलंय फार? ताप तर नाही, बघू जरा! तारासाठी पाणी तापवतेय, तर तूही जरा चार तांबे अंगावर घे. अंग हलकं होईल. रात्री आमच्यापाशीच चांगलं पांघरूण घेऊन झोप. मला वाटतं तू बाहेर तसाच काही पांघरूण बिघरूण न घेताच झोपतोस....' असं म्हणत झोपडीकडे निघून गेली. जाता जाता पुन्हा म्हणाली, 'जा जरा फिरून बिरून ये. गावात जाऊन भरमा आहे की नाही ते पाहून ये. चिम्मव्वाशी चार गप्पागोष्टी करून ये. उद्या त्या लोकांनी असं म्हणता कामा नये, की गावात आला पण तरी येऊन आम्हाला भेटून काही गेला नाही. आणि इथंही नुसतं बसून बसून काय करणार आहेस? एका जागी बसून वेळ जात नसतो...!'

'हूं. कां म्हणून जावं त्यानं? त्यात काय लाभ आहे? आपल्याकडचं कोणी गेलं.

तर कोणी साधं हसून तरी बोलतं ? कोणी कपभर चहा तरी आणून देतं ? हे आपलं उगाचच जायचं होय ?'

'हे सार कितीही खरं असलं तरी जायला हवं पोरी, तुला काय माहीत ? दुसऱ्याचं मन जिंकणं ही काही सोपी गोष्ट आहे होय ? आणखी चार दिवस....'

'त्याचं मन जिंकायला हवं, जिंकायला हवं...असं घोकत घोकत तू हवं तर त्याचे पाय धुवून त्याच्या पायाचं तीर्थ घे. माझ्याच्यानं तर हे मुळीच जमण्यासारखं नाही बाई! दुसरी कोणी असती तर आजवर गप्प न राहती. अशा ठिकाणी जाऊन मी राहू तरी कशी ?' तारानं जरा तिखटपणानं विचारलं.

ही बोलणी ऐकून अनंताच्या तोंडावर एक हास्य तरळून गेलं.

# 14

तारक्काच्या सासरी जाण्याचा मुहूर्त सकाळचा होता. म्हणून रत्नव्वा आज सकाळी भल्या पहाटेच उठली. तिनं पोरीच्या आंघोळीसाठी पाणी तापवलं, त्या बरोबरच थोडा भातही शिजवला. अंग धुतल्यावर नेसायसाठी तिला नवीन साडी दिली. सूर्योदयाबरोबरच तिला जेवायला घातलं. सासरी गेल्यावर आळीतल्या पाच दहा लोकांना काही वाटायसाठी म्हणून तिने तेलात तळलेले पन्नास एक बुंदीचे लाडू एका डब्यात घालून भरुन ठेवले. एका लहान डब्यात साजूक तुपात बनवलेले लाडू घालून ठेवले. हेतू असा की, घरी गेल्यावर तिला ते खायला मिळावेत. गेल्यागेल्याच कशाला चुलीची आराधना, म्हणून घरच्या मंडळींसाठी एकवेळचं जेवणही तिनं टोपलीत घालून ठेवलं. हे सारं एका मोठ्या गाठोड्यात बांधून मल्लूच्या हवाली केल्यावर तिनं तारक्काच्या कपड्यालत्त्याचं एक छोटसं गाठोडं तयार केलं. नाभिराजासोबत एका शेजारच्या मुलाच्या हाती तिनं ते गाठोडं तारक्काच्या सासरी धाडून दिलं- कारण जुन्यापुराण्या कपड्यांसह मुलीला सासरी धाडणं अशुभ होतं. ही सारी तयारी होता होता तारक्का घरातून जायला निघेपर्यंत सूर्य चांगलाच वर आला होता. तारक्कानं साश्रुनयनांनी आईवडीलांना नमस्कार केला. अनंतालाही तिनं नमस्कार केला. तसं त्यानं तिला हातांनी धरून उठवलं. दोघांची दृष्टादृष्ट झाली. कदाचित तारक्काच्या डोळ्यांनी नवऱ्याकडे नांदायला जाण्यासाठी त्याची अनुमती मागितली असावी. मग ती सासरी जायसाठी निघाली. तोवर रत्नव्वा झोपडीबाहेर येऊन कुठं शुभशकुन वगैरे दिसतोय किंवा हे न्याहाळून पाहत होती. तेवढ्यात एक म्हातारा चांभार मागनं डोक्यावर गवताचा भारा घेऊन येताना दिसला. ते पाहिलं आणि रत्नव्वानं लगेच हाक मारून म्हटलं, 'तारा, फिर मागे पोरी! तो काही समोरून आला नाही, तरी उगाच व्यर्थ शंका कशाला?' असं म्हणतं तिला प्यायला पाणी आणि खायला आणखी दोन लाडू दिले. थोड्या वेळानं तारक्का पुन्हा जायला निघाली. यावेळी गाव शिवेपर्यंत पोहोचेतसतो वाटेत कोणीही भेटलं नाही. कोण जाणे पुढं आणखी कोण भेटतंय? अशा विचारानं रत्नव्वा आपल्या झोपडीकडे परतली.

ही मंडळी घरी पोहोचे पोहोचेतो चिम्मव्वा दाराला कुलूप ठोकून शेतावर जायला निघालीही होती. ते पाहून मल्लूला संताप आला. पण त्यानं तो वरकरणी दिसू दिला नाही. चिम्मव्वानं त्याना येताना पाहून म्हटलं, 'आलात? काही कळत नाही, ह्या

विचारानं शेतावर जायला निघाले होते.' म्हणत ती कुलूप काढायला लागली.

मल्ल म्हणाला, 'काल निरोप धाडला होताना, की उज़ाडताच येऊ म्हणून. यात न येण्याचा प्रश्नच कुठं येतोय ? आणखी थोडावेळ वाट पाहायची होतीस !'

'बरोबर आहे, वाट तर पाहायला हवीच होती- पण गाईबैलांचं शेण काढायला नको होतं ? सारा केरकचरा तसाच पडलाय, गाय थोडसं दूध देते. धारा काढायला जरा जरी वेळ झाला की लगेच लाथ झाडायला लागते. हल्ली उन्हं जास्त झाली की माझ्याच्यानं ही कामं होत नाहीत, भाऊ.'

'तारानं आल्यावर केलंच असतं की !' मल्लनं एका वाक्यांत सांगितलं.

'हो केलं असतं ! पूर्वी कधी केलं असेल तर आता करील ना ? हे सारं आमचं नशीब आहे बाबा. मेल्यावरच या साऱ्या मागच्या कटकटी मिटतील.'

मल्लने घरात जात सहज म्हणून म्हटलं, 'आता तुला कशाला त्याची चिंता ? ते काय आपल्या घर प्रपंचाची काळजी राहणार नाहीत ? सारं कामधाम वाऱ्यावर सोडून रहा कशी !'

'हो, अशी स्वस्थ बसून राहिले तर हे लोक जेवायला घालणार आहेत वाटतं ? अरे, अद्याप हातपाय भक्कम आहेत, म्हणून हे थोडं तरी लक्ष देतात माझ्याकडे, उद्या हातपाय चालेनासे होऊन मी एका कोपऱ्यात पडले, तर या आजकालच्या सुना मला सांभाळणार आहेत हो ?' टोमणा ठेवून द्यावा अशा थाटात चिम्मव्वा म्हणाली.

आता मात्र मल्लला आपला राग आवरून धरणं अशक्य झालं. तोही तिला टोमणे मारीत म्हणाला, 'सारं तुझंच आहे, तू म्हणशील तसंच होणार. सुना बिचाऱ्या काय करू शकणार आहेत ? सारं काही सासवांच्याच हातात असतं.'

'अशा प्रकारे तुम्ही लोक आपल्या लेकीला रोज पढवित रहाल, तर ती कुठनं माझ्यापुढं लवायला ? माझ्या तोंडावर मला फाड फाड बोलते. माहेरचेच येऊन लेकीला अशी अक्कल शिकवीत असतात ? अशा प्रकारे तिची बाजू घेऊन बोलत नसतात कुठं ! आता हे पंधरा दिवस माहेरी राहून खूप शहाणपण शिकून आली असणार. आता कशाची ती आमच्या घरी कामाला बोट लावल्येय ? मी तर तिला माहेरचं थोबाडही पाहू दिलं नसतं.'

'जरूर काय त्याची, ताई ? तुमच्या घरी ती सुखात नांदतेय एवढं आम्हाला पुरेसं आहे. बस खुश आहोत आम्ही तेवढ्यावर. आणि आम्ही तरी कुठं तिला उठसूट बोलवत असतो ? कधी केव्हा सणासुदीलाच बोलावतो ना ?'

'असं नाहीए- एकदा घेऊन गेलात, पाडवा झाला. नंतर मंगळवार आला म्हणून मुलीला धाडता येत नाही. त्यानंतर जत्रा आली ! इथं घरात काम करायला कोण आहे ? कामं करता करता आमची हाडं झिजून चाललीत इथं !'

तसं मल्लप्पा उठला, म्हणाला, 'तू तर भांडायलाच निघालीयस. तुझ्यासारखं भांडायला नाही आलोय मी, माझी चादर मोकळी करून आणून दे, जातो मी.'

'असं म्हण की, मी भांडकुदळ आहे. माहीत नव्हतं आधी तुला हे ? गावभर मी भांडकुदळ म्हणून बदनाम होते. हे सारं माहीत असतानाही तू आपली लेक या घरात का दिलीस बाबा ?' खरं म्हणजे भांडण उकरून काढायच्या हेतूनंच चिम्मव्वानं हे त्याला विचारलं.

मल्लनं वादंग पुढं आणखी वाढवलं नाही. मनात म्हणाला, 'डोळे उघडे ठेवून शेण खाल्लंय ना ! आता काय त्याचं ?'

तर ही चिम्मव्वा तारक्काकडे पाहत म्हणाली, 'काय ग, तुला माहीत नव्हतं का मी ही अशी आहे म्हणून ? काय ?' मग तिनं तारक्कानं आणलेलं गाठोडं सोडून पाहत रागानं विचारलं, 'हे सारं कशासाठी आणलंय ? भरमप्पा काय येव्हापासूनच गोड धोड खायला सुरू करणार आहे ? याना जाऊन अजून वर्षही पुरं झालं नाहीए-तुम्हा लोकाना इतकंही समजू नये ? कमीतकमी तू तरी समजून सांगायला हवं होतंस...'

यावर तारक्का काही बोलली नाही. मल्लनंच उत्तर दिलं.

'एकट्या भरमुनं खाल्लं नाही म्हणून काय झालं ? तुम्हा लोकांनाही खायची मनाई आहे काय ? तुम्ही लोक खा. चार गड्यामाणसांना द्या. एवढे कष्ट आणि पैसे खर्च करून आम्ही कशासाठी हे सारं तयार करून आणलंय...? चार लोकांच्या मुखाला लागावं म्हणूनच ना ?'

'खर्च करायला कोणी सांगितलं होतं ? आपल्या लेकीसाठी मनात असं काही कल्पणारा मी नव्हता कोणी पाहिला. म्हातारा मेलेल्याला अजून वर्ष देखील पुरं झालं नाहीए. दिवस-रात्र माझ्या तोंडून 'हाय' निघणं अजून थांबलं नाहीए. तुम्हा लोकांना काय त्याचं म्हणा ! हं हे आपले लाडू घेऊन जा परत-' असं म्हणत तिनं लाडवाचा डबा मल्लच्या पुढ्यात आदळला.

'जाऊ दे ग- फार शहाणी झालीयस तू.' म्हणत मल्ल उठला आणि चादर घेऊन चालू लागला. पोरं त्याच्या आधीच पळून गेले होते. तारक्का फुरंगटून खिन्नपणे हा सारा तमाशा पाहत उभी होती. ती मनाशी विचार करीत होती, 'हे लोक गेल्यावर हे सारं मला ऐकवायचं होतं. बरोबर ऐनापूरचा मुलगाही आला होता. तो काय समजेल मनात ? लाज नावाची गोष्ट कशी ती हिच्याकडे नाहीच. जगात हीच एकटी काय ते सासू झालीय होय ? काय गावात इतर कोणी सासवा नाहीत की काय ? भांडायसाठी नेहमी आपली ही दंड थोपटून उभी असते. घरी कोणी आलं, तर हिच्या तोंडून साधं 'या -बसा' असं देखील उमटत नाही. तर प्रेमाचे दोन शब्द कुठचे ! नेहमी आपली जळफळत असते.

चिम्मव्वा म्हणाली, 'दगडासारखी काय उभी आहेस जा आत. बापामागे जायचंच काय ? नवी साडी सोडून जुनी नेस आणि चल शेतावर. ही येवढ्यातच अक्कातायी शेंगा तोडायला गेलीय. ती माझी वाट पाहत असेल.'

इकडे रत्नव्वानं आपली लेक गावाकडे गेल्यावर वाटेत तिला कुठले शुभशकुन झाले असतील याचा शोध घेण्यासाठी रस्त्यापासून झोपडीपर्यंत किमान दहा तरी फेऱ्या मारल्या. तेवढ्यात ती दोन्ही पोरं धावत पळत आली.

रत्नानं विचारलं, 'अरे, असं धावताय कशासाठी ?'

गावच्या पोरानं हताशपणे म्हटलं, 'चहा जरा जादा झाला!' तो तारक्काला पोहचवायला खरं तर अशा आशेनं गेला होता, की तिथं गेल्यावर आपल्याला काही खायला प्यायला मिळेल ! त्या पोराचं बोलणं रत्नव्वाच्या ध्यानी आलं नाही. तिनं जरा खुशीतच विचारलं, 'म्हणजे अरे वा ! आज सूर्य कोणीकडे उगवला, बाबा तुम्हा लोकांना चहा मिळाला !'

तेवढ्यात पाठोपाठ मल्लु आला. खांद्यावर चादर टाकलेली होती. तोंड उतरलेलं होतं. कपाळ घामानं डबडबलेलं होतं. नवऱ्याला पाहताच रत्नव्वा उमजली, की काही तरी विशेष घडलेलं दिसतंय, तरीही तिनं विचारलं, 'चहाबिहा पिऊन आलायतसं वाटतं !'

मल्लुला समजेना की आता ह्यावर काय बोलावं ! मग जरासं थांबून म्हणाला, 'होना चहा प्यायलाच गेलो होतो'. आणि धोतरानं तोंड पुसायला लागला.

'कां काय झालं ?'

'काय व्हायचं होतं ? तेच जुनं दुखणं. आज पाचसहा वर्षांपासून पाहात आलोय ते. एक दिवसही कधी शांततेन राहिली नाही. ती तर अगदीच अगदी हलकट बाई आहे. पोरीला पोहचवायला तिच्या घरी गेलो होतो. जरा शांतपणानं वागायचं नाही ? पण तिच्यात त्याचं नाव देखील नाही. माहीत नाही सदान्कदा ही आमच्यावर अशी आग ओकत असते ती ! आम्ही एवढे का वाईट आहोत तिच्या दृष्टीने ? या पुढं तिच्या उंबरठ्यात पाऊल टाकणार नाही मी कधी.'

'कां काय झालं ? पुन्हा काही भांडण बिंडण तर नाही केलंत ? तुम्ही किनई पोरीसाठी काही ना काही संकटं उभीच करीत असता !' तिनं त्याला अडवून मध्येच हे विचारलं नसतं तर कोणजाणे आणखी किती वेळ मल्लु आपलं बोलतच राहिला असता. म्हणाला:

'मी कशाला उगाचच भांडण करीन ? तीच काय वाट्टेल ते वाह्यात बकायला लागली'.

रत्नव्वानं एक भक्कम श्वास घेत विचारलं, 'जाताना वाटेत समोरून कोण आलं होतं ?'

मल्लु जरा ओठ चावीत पुटपुटला, 'शकुन बरा नाही झाला.' मग जरा थबकून डोळे पुसत म्हणाला, 'भिकारी आला होता झोळी घेतलेला.'

'तळपट होवो मेल्याचं. तो कशाला मरायला तिथं तडमडला ?'

'त्याला कशाला शिव्या शाप देतेस. कोणी ना कोणी हे रस्त्यात भेटणारच. पोर त्या घरात नांदणं केवळ...'

दोन दिवस लोटले. चिम्मव्वानं तिसऱ्या दिवशी सकाळी शेजारच्या एका बाईला बोलावून तारक्कानं आणलेला लाडवांचा डबा रत्नव्वाला परत करून खायला सांगितलं. तारक्का तिला थोपवू पाहत होती परंतु तेवढ्यात चिम्मव्वा कडाडली, 'कोणाला हवेत तुमचे ते लाडू? असे लाडू खायला घालून आणखी कोणाला मारायचा तुमचा विचार आहे कोण जाणे? घरात खायसाठी वेगळे बांधून दिलेत. वाटायला वेगळे?' तारक्का यावर पुढं काही बोलू शकली नाही.

भरमा हे सारं जवळच उभा राहून ऐकत होता. तारक्कानं त्याच्याकडे एक दृष्टिक्षेप केला. त्यानंही तिच्याकडे पाहिलं. पण ते तेवढ्यावरच मर्यादित राहिलं. तसं तारक्काच्या मन:पटलावर अनंताची मूर्ती तरळायला लागली. त्याबरोबरच तिच्या मुद्रेवर काहीसं समाधान उमटून गेलं. शेजारीण गाठोडं घेऊन रत्नव्वाच्या घरी गेली. रत्नव्वाच्या एकवेळ मनात आलं की, करावं परत, पण नवऱ्याला प्रथम सांगून मगच काय ते ठरवावं या उद्देशानं म्हणाली, 'घरची लक्ष्मी पुन्हा घरी आली. उत्तम झालं. दे आण ते इकडं!' तिनं ते आणलेलं ठेवून घेतलं. ती संध्याकाळपर्यंत थांबू शकली नाही, दुपारीच गावात जाऊन चिम्मव्वाच्या एका नातेवाईक बाईकडे कागाळी केली: 'आम्ही आपलं घर समजून मुलगी दिली, यांच्यासाठी सारं घरदार धुवून दिलं, पण एक दिवसही काही तिनं पोरीला सुख लागू दिलं नाही. रोज उजाडलं रे की आपलं भांडण. अगदी साप मुंगुस बरे म्हणावेत असं! आज सुधारेल, उद्या सुधारेल ह्या विचारानं गप्प राहिले, पण हिची जुलूम जबरदस्ती वाढतच चाललीय. काय हिला काय वाटतंय, की पोरीच्या बाजूनं बोलणारं, पोरीचा कैवार घेणार कोणी नाहीए होय? आज संध्याकाळी याना येऊं दे, पोरांना पोहचवायला गेलेत. अजून आलेले नाहीएत. आम्ही कुलकर्णी भाऊंच्या कानावर घालून हिची अक्कल नीट ठिकाणावर आणू. लाडू काय कोणी असं परत करीत असतात? हिला एवढे नकोसे झाले होते तर घरच्या कुत्र्यांना खायला घालायचे होते!' रत्नव्वानं हे जरा जोरातच तणतणत सांगितलं.

रत्नव्वा आलेली कसं कोणजाणे चिम्मव्वानं पाहिलं होतं. म्हणून मग तिच्या मागोमाग घराबाहेर जाऊन ती आपल्या नातेवाईक बाईकडे काय काय कागाळ्या करतेय ते ऐकत राहिली. आणि मग एकदम पुढं होत तिनंही आपल्या तोंडचा पट्टा सोडला. आणि मग एकदम पुढं विचारावं? दोघींची अशी काही जुंपली की आळीतल्या बायकांना त्यांचं भांडण सोडवता सोडवता नाकी नऊ आले. चिम्मव्वा आवेशात येऊन म्हणाली, 'खऱ्या आईची असेन, तर पोराचं दुसरं लग्न करून देईन तेव्हाच राहीन. तुझ्या पोरीला घरातनं नाही बाहेर काढलं, तर नाव बदल माझं!' असं म्हणायलाही कचरली नाही.

त्याच दिवशी चिम्मव्वानं आपला दूरचा मेहुणा भीमप्पा याला बोलावून घेऊन बराच वेळ बोलणी केली. मनातल्या साऱ्या दुःखाचं रडगाणं गायली. नात्यातल्या बाईकडे रत्नव्वानं केलेल्या कागाळ्या अगदी तिखटमीट लावून ऐकविल्या. भीमप्पा मधून मधून काहीना काही फुसकुल्या सोडीत तिला आणखी भडकवित राहिला. शेवटी चिम्मव्वा त्याला म्हणाली, 'यांच्या मागे पोराला मी तुमच्या ओटीत घातलंय. त्याचं काय वाट्टेल ते करा. त्याचं आणखी एक लग्न लावून द्या वा तसंच ठेवा. मी पडल्ये बाईमाणूस. गावात उरावर सारी व्याहीमंडळी उभी आहेत. मी एकटी आहे. उद्या त्यांनी काही केलं तर कसं होईल ? सारं घर त्यांच्या घशात जाईल.' इतकं म्हणून पोरीकरवी चहा तयार करून घेऊन त्याला प्यायला दिला.

चहा पिऊन उठता उठता भीमप्पा म्हणाला, 'अशा तऱ्हेनं मारून टाकायला काय गावात यांना कोणी विचारणार नाही की काय ? काय आम्ही नाही आहोत की काय ? गोष्ट आधी पासून माहीत नव्हती म्हणून भाऊ आम्हाला असे अंतरले. दुसरं लग्न लावून देईन तेव्हांच स्वस्थ बसेन. पोरींना काय तोटा आहे ? पैशाला पासरीभर मिळतात. आता मुहूर्त नाहीए. जरा हा पाणकळा संपू दे. तुळशीच्या लग्नापर्यंत कुठून ना कुठून एखादी पोरगी उभी करून लग्नाची बार उडवून देऊच देऊ. त्यात काय असं मोठसं ?'

चिम्मव्वा त्याला सोडायला दरवाजापर्यंत जात म्हणाली, 'बसू, सारं तुमच्यावरच आहे आता. चाकूही तुमच्या हातात आहे आणि खरबूजही तुमच्याच हातात आहे. हवं ते करा. पैशाची मुळीच चिंता नाही.' असं म्हणून परतली.

दिवाळीनंतर भीमप्पा पाचसहा ठिकाणी भरमासाठी मुली पाहून आला. पेठेत जायचंय, पूजेसाठी जायचंय, जत्रेला जायचंय असे बहाणे करून चिम्मव्वाही दोन तीन ठिकाणी मुली पाहून आली. कुठंही गेली तरी तिथं हेच विचारलं जाई: 'दुसरी कशासाठी करताय ?' त्यावर ती थोडक्यात हेच सांगायची: 'ऋतुशांत होऊन पाचसहा वर्षं झालेत, अद्याप पोटी काही पोरबाळ नाही. एकुलता एक मुलगा आहे. आणखी किती दिवस वाट पाहणार ! घरात खाय-प्यायला कशाला काय कमी आहे ? दोन सुना सुखात पोसू शकू.' एक दोन मुली पसंत करूनही आली. पण ज्या लोकांनी घर पाहायला येऊ म्हणून सांगितलं त्यातलं कोणीही फिरकलं नाही. जिथं जिथं भीमप्पा गेला होता त्यातले एक दोघं आलेही, पण गावात आल्यावर त्यांचा विचार बदलला. प्रथम मुलगी देण्याचं वचन देऊन नंतर शब्द फिरविण्याचं कारण हेच असणार ! आणि कान भरवायची तरी गोष्ट कशाला ? चांदूरमध्ये कोणीही हेच म्हणता, की 'तिथं कशाला मुलगी देताय ? ती काय तिला सुखानं नांदवणार आहे हाय ? तुम्हा मंडळींना मुलगी फार जडच झाली असेल तर एखाद्या मजुराच्या गळ्यात बांधा तिला- सुखानं तरी राहील.' अशा परिस्थितीत कोणाला आपली मुलगी तिथं द्यायचं धाडस होईल ? रोज येणारे लोक तसेच परत

जायला लागले तशी चिम्मव्वा चिंतेत पडल्यासारखी झाली.

चिम्मव्वाला एक गोष्ट स्पष्ट कळून चुकली, की जोवर तारक्का या घरात आहे, तोवर तिला पाहिल्यावर कोण आपली मुलगी इथं देईल ? म्हणून तारक्काला ती घरात रोजच्यारोज अधिकाधिक सतवायला लागली.

भीमप्पाही अनेक ठिकाणी गेला, खूप प्रयत्न केला पण काहीही वळलं नाही. म्हणून मग तो सारं काही देवावर सोपवून डोक्याला हात लावून स्वस्थ बसला. हे पाहून लोकांनी म्हणायला सुरूवात केली, 'लग्न जमविण्यासाठी भीमप्पा उगाचाच इकडे तिकडे धावाधाव करीत हिंडतोय ! आधीची एक बायको असताना तिच्यावर मुलगी द्यायला कोण येणार आहे ? दुसरं लग्न लावून देणं काय खायची गोष्ट आहे ? देवाला काय डोळे नाहीत ? असं कोणी का करीत असतं ? पोरी काय कुंभाराच्या घरी घडत असतात ? दिवस जसजसे जायला लागले तसं लोकांनी हे तोंडावर सुनावायलाही कमी केलं नाही. पण याचा परिणाम काय होईल हे मात्र कोणाच्या ध्यानी आलं नाही. लोकांची ही असली बोलणी ऐकून भीमप्पानं जणू मनाशी ठाम ठरवूनच टाकलं, की हे लग्न लावून देईन तेव्हाच स्वस्थ बसेन. त्यासाठी तो सर्व प्रकारचे डावपेच मनाशी घोळवायला लागला.

मुलगी द्यायला कोणी तयार होणार नाही, हे ओळखून मगदुमांकडच्या एका बाईनं उपहासानं हसत विचारलं देखील: 'लग्न कधी आहे, चिम्मी ?' ते ऐकून चिम्मव्वाला कोणी आपल्या जखमेवर मीठ चोळतंय असं होऊन गेलं, तरीही: 'होईल-त्यात काय मोठसं ! मुलगा लग्नाला उभा आहे असं नुसता कळायचा अवकाश-पोरगी देणाऱ्यांच्या नुसत्या उड्या पडायला लागतात. आम्हीच जरा मागचा पुढचा विचार करून राहिलो आहोत. आपल्याच कुटुंबातली, जवळच्या नात्यागोत्यातली मुलगी आहे तिच्यावर उगा दुसरी कशाला आणा ?' आपला सज्जनपणा दाखविण्यासाठी ती म्हणाली. तिच्या या बोलण्यामागचं इंगित ओळखून ती बाई म्हणाली, 'अरे तुम्हाला मुलीची कुठं आहे पर्वा ?' आणि मिस्किलपणे हसत हसत चालायला लागली. त्या हसण्यानं चिम्मव्वाचं तोंडच बंद करून टाकलं होतं- पण त्या हसण्यानं, मुलाचं लग्न करून द्यायलाच हवं यासाठी तिचं मन अधिकच भडकवलं.

जिथं गावभरच्या साऱ्या लोकांना हे समजलं तिथं ते तारक्काच्या आईवडिलांना समजल्यावाचून थोडंच राहणार होतं ? रत्नव्वा तर भीमप्पाला उठता बसता शिव्याशाप द्यायला लागली. कधी कधी म्हणायची, 'त्यालाही पोरीबाळी आहेत. त्याला आमच्या दु:ख यातनांची थोडी तरी जाण ? तो कशासाठी माझ्या पोरीच्या उरावर ही अशी सवत आणायला निघालाय ? तिला मुलबाळ झालं नाही म्हणूनच ना ? माझ्या पोरीला पोरबाळ होणार तरी कसं ? काय नवऱ्याचं नुसतं थोबाड पाहून मुलं होत असतात- एवढे केस

पिकलेत. थेरडा झालाय, पण येवढी अक्कल नाही याला ?' असा त्रागा करीत त्याच्या नावानं कडाकडा बोटं मोडीत ती रडायला लागायची. मल्ल तिची समजूत घालायचा प्रयत्न करीत म्हणायचा, 'दुसऱ्यांना अशा शिव्या देऊन काय फायदा ? पोरीच्या नशिबात असेल तेच घडणार. जे होणार आहे ते अटळ आहे.' त्याच्या बोलण्याच्या एकूण पध्दतीवरून असा भाव व्यक्त होत होता की, 'लग्न काय रोज रोज होत असतं ? सवतीवर मुलगी कोण देईल ? कसं बोलतेस तू हे ?' त्यावर रत्ना म्हणायची, 'आपल्याला काय वेडबिड लागलंय की काय ? ते लग्न करतीलच करतील. आमच्या पोरीला मग कोणी वाली उरणार नाही; पंख कातलेल्या एखाद्या चिमणीसारखी बिचारीची अवस्था होऊन जाईल!' त्यावर मल्ल तिची पुन्हा समजूत घालीत म्हणायचा, 'आमचे खूप भाऊबंद आहेत. आम्हाला काय कोणी नातेवाईक वगैरे नाहीत की काय ? ते तर सरळ म्हणतात: पाहू याचं ते कसं लग्न लावून देणारे इथे येतीलच कसे ? त्याना काय आपल्या पोरीचे प्राण प्यारे नाहीत ? आमची बाजू अशी भक्कम असताना आम्ही कशाला फुकटची धावपळ करायची ? नवऱ्याच्या अशा या समजावणीनं स्वतःला सावरून घेत शांत होत. रत्नव्वा म्हणायची, 'जे काही करणं असेल ते आतापासूनच करा. गप्प राहू नका. एकदा का घडून गेलं, की मागाहून मग काही एक होणं शक्य नाही. दात आणि नखं गळून पडलेल्या सिंहाप्रमाणं चुपचाप पडून रहावं लागेल.!' त्यवर मल्ल म्हणायचा, 'लागलेली हळद उतरवून टाकू. अजून काय झालंय ?'

एक दिवस संध्याकाळचा मल्ल घरातच बसलेला होता. भीमप्पा गोठ्याकडे वा असाच कुठं तरी चालला होता. मल्लची त्याच्याकडे दृष्टी गेली; तेव्हा त्याच्या मनात असा विचार आला की, 'आमचं काही भांडण वगैरे झालेलं नाही, की हाणामारीही केलेली नाही. आम्ही केवळ त्या गवतचोरीच्या प्रकरणापासून त्यानं माझ्याशी बोलणं बंद केलं आहे. मीच जर आपण होऊन प्रथम त्याच्याशी बोलायला सुरूवात केली तर त्यात चूक असं काय आहे ? त्यामुळे मी लहान थोडाच होणार आहे ? वयानंही तो वडीलधारा आहे.' हा विचार मनात येता क्षणीच त्यानं भीमप्पाकडे पाहून त्याला हाक मारीत म्हटलं, 'जरा तंबाखू तर ओढून जा!'.

'उशीर झालाय भाऊ, गाई - बैलांनाही घेऊन यायचंय...' असं म्हणून तो दोन पावलं पुढं गेला. बहुदा त्याला यायची इच्छा नसावी.

तरीही मल्लनं 'घेऊन या की सावकाश, दिवस मावळायला अजून घडीभर अवकाश आहे.' म्हणत त्याला पुन्हा बोलावलं. स्नेहसंबंधाची बाब ध्यानी घेता भीमप्पाला येणं भागच पडलं. मल्लनं उठून कांबळं अंथरलं. भीमप्पा बसत म्हणाला, 'अजून घरात कसे काय बसून ? गाईबिई शेतात नाहीत की काय ?'

'सध्या तर तिथंच आहेत, गाय-वासरू सारं, दूध देणाऱ्या म्हशीही तिथंच आहेत. पण महिन्याभरानं जागेची नीटशी व्यवस्था करून तिकडे जावंच लागेल. पावसाळाही तोंडावर आलाय.'

भीमप्पा म्हणाला, 'तुम्हाला काय ? जावयाचं घर एवढं प्रशस्त आहे !'

भीमप्पा म्हणाला, 'बोलण्याचा एकूण ढंग उमजून मल्ल म्हणाला, 'त्याचं घर कितीही प्रशस्त असलं तरी आम्हाला काय त्याचा फायदा ?'

'कां बुवा ?' आश्चर्याचं नाटक करीत भीमप्पानं विचारलं.

'असं बोलताय की जणू काही आपल्याला त्यातलं काही माहीतच नाही ! हे म्हणजे बाईलाच लेकरू ओळखता येऊ नये अशातलं झालं म्हणा की !' मल्लनं काहीशा फणकाऱ्यानं त्याचा पाणउतारा करीत म्हटलं.

भीम काहीसा घाबरला, त्याचं तोंड पांढरं फटफटीत पडलं. तो विचार करू लागला. मग जरासं खाकरून म्हणाला, 'चिम्मव्वाही वेडी आहे. काही कसली समजच नाही मुळी तिला. तिनं असं करायला नको, पण करणार काय ?' बोलणं पुरं करता करता पुन्हा खोकत विचार करीत त्यानं चिलीम मल्लच्या हातात दिली.

'एकटी चिम्मव्वा काय करणार आहे ? अरे असे लोकही आहेतच की, जे कप दोन कप चहाच्या पाण्यासाठी चिम्मव्वा म्हणेल ते करायला तयार असतात. त्यांच्या भरवशावर तर ती नाचतेय. पण त्यांचेही दिवस आज ना उद्या भरल्यावाचून राहणार नाहीत.' म्हणत मल्लनं भीमप्पाचं घोंगडं बरोबर त्याच्याच गळ्यात अडकवलं.

भीमप्पानं कपाळाला आठ्या घालीत म्हटलं, 'सर्वांना सोडून तुम्ही आमच्याच मागे कां म्हणून लागताय ? तिनं बोलवलं तर आम्ही जातो, शेवटी काही झालं तरी भाऊबंद आहोत... जाणं भागच पडते.'

तेवढ्यात रत्नव्वा शेतावरनं दुधाची चरवी घेऊन आली. ती घरापाशी पोहचणार तेवढ्यात पाठीमागनं एक बाई तिला हाक मारीत म्हणाली, 'काय ग रत्ना, पोरीला अशी सुळावर कशासाठी घेऊन राहिली आहेत ? काय तुला दहा बारा पोरं आहेत ? तिला बिचारीला घासभर अन्न नाही तिथं खायला मिळत, सकाळी उठल्या उठल्याच तिच्यावर शिव्यांची वृष्टी सुरू होते. मडक्याचं तोंड असतं ना तर कधीच फुटून गेलं असतं. पोरगी तिथं रहाणार तरी कशी ? आमच्याच्यानं तर बघवत नाही बाई ! आपल्या घरी घेऊन का नाही येत तिला- तुझी लेक तरी कुठं मोठी अशी नवऱ्यावर जीव ओवाळून टाकायला निघालीय ग ? अशा अवस्थेत कशाला उगीच ठेवलयंस तू तिला तिथं... वाऱ्यावर सोडून दिल्यासारखं ?' वगैरे गोष्टी बोलत बोलत ती घराच्या बाहेरच्या दरवाजापर्यंत आली. आत भीमप्पाला बसलेला पाहून तिनं चटकन् जीभ चावली-आणि तिथूनच माघारी फिरली.

बहुधा समोर भीमप्पाला पाहूनच रत्नव्वानं सुरू केलं :

'तिलाही एक लेक आहे. तिची अवस्थाही आमच्याच पोरीसारखी होईल. त्यातनं थोडीच सुटका होणार आहे ? या हातानं घेतलं ते त्या हातानं फेडावंच लागणार आहे. माझ्या पोरीला डागतेए- काय तिचा तळतळाट भोगायला लागल्यावाचून राहणार आहे होय ? साऱ्याना तिचा तळतळाट भोगावाच लागेल. तिचा छळ करणाऱ्यांना आणि करविणाऱ्यांनाही...' असं म्हणत ती आत आली. दुधाची चरवी खाली ठेवली आणि वळून म्हणाली, 'ये बाई, बघ - हे सारेजण मिळून माझ्या पोरीचं घर मोडायला- तिचा संसार उद्ध्वस्त करायला निघालेत!' ती बाई तेवढ्यातल्या तेवढ्यात परत गेल्याची तिला कसली काही कल्पनाच नव्हती. मग तिची नजर भीमप्पाकडे गेली.

'आम्ही कशाला कोणाचं घर मोडू ? आम्हाला काय पोरीबाळी नाहीएत ? मी कशाला मोडायला जातोय कोणाचं घर ?'

'राहू द्या राहूद्या- सारं काही माहीत आहे! परवा मंगसुळीला जाऊन काय करून आलात ? आमच्या पासून कशाला दडवताय ?' म्हणत तिनं त्याचं पाप बरोबर त्याच्या पदरात बांधलं.

भीमप्पाची स्थिती मुद्देमालासकट एखादा चोर सापडला जावा तशी झाली. चाचरत म्हणाला, 'काय करून आलो ? अशानं तर काय सर्वांचीच लग्नं जुळतील ! घरात छानदार सुरेख सून आहे. दुसऱ्या लग्नासाठी मुलगी देईल तरी कोण ? चिम्मव्वा उभ्या गावात नफ्फड म्हणून नावाजलेली आहे. बदनाम आहे. एक तुमची तारक्का म्हणूनच हे तिचं असलं वागणं सहन करून जाणे !'

'कसलं सहन करत्येय ? ती तर याचीच वाट पाहतेय की कधी एकदा या घरातनं आपली सुटका होतेय आणि कधी आपण इथनं बाहेर पडतोय ! अडकित्त्यात धरलेल्या सुपारीसारखी पोरीची स्थिती करून टाकलीय-'

'ती तर वेडी बाई आहे.'

'वेडी कां म्हणून ? ती तर चांगली हुशार आहे- फार शहाणी आहे. ती तर याचीच वाट पाहतेय, की कधी एकदा पोराचं दुसरं लग्न लावून देत्येय !' भीमप्पा जायला निघालेला पाहून रत्नव्वाच्या आवाजाला आणखीनच धार चढली.

'का उगीच उखडतेस- जीवाचा त्रागा करून घेतेस ? चार दिवस नखरे करील आणि आपली आपण गप्प बसेल- स्वतःची स्वतः शत्रू बनेल- उद्या हिच्या कापल्या करंगळीवर दोन थेंब मुतायलाही हिला कोणी मिळणार नाही.' भीमप्पानं सावकाश हे सांगत बाहेरचा दरवाजा पार केला.

'गप्प कशाला बसेन, करू देत आपल्या पोराची दहा लग्नं ! आमचं काय जातय ? कुठेही राहो, आमच्या पोरीला दोन घास जेवण मिळेलच. हेच तिच्या बोडक्यावर दुसरी

कोणी पोरगी आणून बसवायला निघालेत. आम्ही आमच्या पोरीला सरळ घरी घेऊन येऊच येऊ.' भीमप्पाला सुनावण्यासाठी तिनं ही गोष्ट जरा जोरातच ठासून सांगितली.

तिचं ते बोलणं भीमप्पाच्या कानांना कडू तर लागलं असणारच, पण त्यामुळे त्याचं मन नाही म्हटलं तरी प्रसन्न होऊन गेलं असणार.

दुसऱ्या दिवशी सकाळी तांबडं फुटायच्या आधीच भीमप्पा कोणाला या कानाचा त्या कानाला पत्ता लागू न देता चिम्मव्वाला बरोबर घेऊन मंगसुळीला गेला. त्याला वाटलं होतं की आपण इथं जी मुलगी पाहिली तिच्याविषयी कोणाला काही एक कळलेलं नसणार. परंतु काल रत्नव्वाचं बोलणं ऐकून तो थक्कच होऊन गेला. आता त्याला याची चिंता लागून राहिली होती की न जाणो कोणी तरी या मंडळीचे कान फुंकायचे आणि हे स्थळ बोलबोल म्हणता हातचं जायचं! एकदा का हे स्थळ हातचं गेलं, की दुसरी मुलगी शोधायसाठी पुन्हा आकाश पाताळ एक करावं लागेल. म्हणून ते त्याच दिवशी त्यांच्या साऱ्या अटी मान्य करून संध्याकाळच्याला घरी परतले. बसमधून उतरून गावच्या रस्त्याला लागल्यावर भीमप्पा म्हणाला, 'आता आणखी काही होणार नाही!' मुलगी एकदाची पक्की झाली. आपल्या डोक्यावरचं ओझं उतरल्यासारखं त्याला झालं.

'गोष्ट पक्की झालीय खरी-पण आता हे सारं निर्विघ्नपणे पार पडून कडेला लागलं पाहिजे.' पुढचा विचार करीत चिम्मव्वानं म्हटलं.

'कडेला लागायचं काय आहे? लग्नाच्या कटकटी बाबत विचार करतेयस जणू! तेही होऊन जाईल. जास्तीत जास्त फार तर चार पैसे ज्यादा खर्च करावे लागतील-आणखीन काय?'

'मी ते नाही म्हणत. पैशाची काय गोष्ट आहे? ते कसं ना कसं तरी जमून जाईलच. हे एक काम तर झालं-पण पोरीच्या बाबतीत मला जरा धाकधुक लागून राहिलीय.'

'अग, ती माणसं अशी नाहीएन. आपल्या पोरीचं पक्कं होईपर्यंत तेही त्रस्तच होते. तसं नसतं तर त्यानी कशाला येवढी घाईगर्दी केली असती? त्यांचे मामा आल्यावर लगेचच त्यांनी निरोप धाडला. अक्कातायीला त्या घरी असं दिलं नाहीस, तर काय तुझ्या लेकाचं लग्न होईल म्हणत्येस? अशा शब्दात भीमप्पानं आपण केलेल्या कामाचं महत्त्व तिला स्पष्ट करून सांगितलं.

'म्हणून तर मी ही गप्प आहे. आमच्या मुलीला तर करून घेतीलच. पण पोराच्याही डोक्यावर दोन अक्षता तर पडोत!'

'हे ही झालंच म्हणून समज. आता काय बाकी उरलंय?' भीमप्पा थोडं थांबून म्हणाला, 'तू हे असं इकडनं जा. मी शेतावर जाऊन येतो. आपण दोघांनी गावात असं बरोबर जाणं बरं नाही.' पाच सहा पावलं पुढं गेल्यावर काहीसं आठवून तो परत

आला आणि म्हणाला, 'आता अगदी आनंदात घरी जा. चांगले ताशावाजंत्री लावून दोन्ही लग्नं धुमधडाक्यात साजरी करू.'

'आता गावात कोणाकडे या गोष्टीची वाच्यता करायची नाही- नाही तर...'

चिम्मव्वाला पुढे काही बोलू न देता मध्येच आडवीत भीमप्पा म्हणाला, 'तुला वेडबिड तर लागलं नाहीए?'

## 15

उन्हाळ्यातला पहाटवारा अनंताच्या खोलीत झुळझुळायला लागला, की रात्रभर जागा असलेल्या अनंताला झोप यायला लागते. सूर्यकिरण खिडकीतून उतरून त्याच्या तोंडावर खेळायला लागले की त्याला जाग येते. परंतु त्याच्या अंगात कसला काही उत्साह संचारत नाही. सारं शरीर आळसटल्यासारखं होऊन गेलेलं असतं. तोंड नेहमी चिंतेनं म्लान झालेलं असतं, अभ्यासाला बसला की एकदा उघडलेली पुस्तकं जशीच्या तशी पडून राहिलेली असतात. बसल्याबसल्या त्याच्या मनता दुसरेच कसले तरी विचार चाललेले असतात. आईनं सांगितलं म्हणून विमनस्कपणे शाळेत जातो- येतो. कसलं सुख - समाधान नव्हतं, मन:शांती नव्हती, शिकण्यात उत्साह नव्हता. आपल्याला कुठल्या दु:खानं घेरलं आहे, याचीही त्याला जाण नव्हती, कल्पना नव्हती. आनंदाची आशा तर त्यानं कधीच सोडून दिली होती. जणू जन्मदद्रियाला धन सापडावं आणि पाहता पाहता ते दुसऱ्याच्या हाती जावं अशी त्याची स्थिती झाली होती. अनंताला वाटलं की आपल्या जीवनातील सुखाचं रोपटं जरा कुठं अंकुर धरू पाहतेय न पाहतेय तोच जळून गेलंय- ते आता आयुष्यात पुन्हा कधी पालवलेलं, डेरेदार उंच वृक्षात उभारलेलं पाहायला मिळणार नाही. आता त्याचं मन म्हणायचं: अभ्यासाची आणि परीक्षेची गरजच काय आहे? कधी कधी तो सारं सोडून बिछान्यावर नुसता या कुशीचा त्या कुशीला होत लोळत पडलेला असायचा. दिवा जसाच्या तसा ढणाढणा जळत राहिलेला असायचा. सुंदराबाईनं हे कित्येकदा पाहिलेलं होतं. ती विचारायची, 'अनंत, अभ्यास झाला का ?' तसं तो 'हो' म्हणून. दिवा विझवून झोपी जायचा. अनंताच्या या अवस्थेची त्यच्या वडिलांना- रामप्पाला कल्पना नव्हती. मॅट्रिकचा अभ्यास आहे, रात्रंदिवस अभ्यासात मग्न आहे. या विचारानं त्यानं इकडे लक्ष दिलेलं नव्हतं.

कल्पना नाही काय विचारानं सुंदराबाई कधीकधी नवऱ्याला सुनेला घेऊन यायला सांगायची. म्हणायची. 'आजकालची मुलं येत जात राहणं बरं असतं.' या गोष्टीचा रामप्पानं असा अर्थ घेतला, की बायकोला बहुदा वाटत असणार, की एकदा का वाढलेली मुलगी घरी आली की मग तिला आपल्याला हवं तसं घरचं वळण लावता येणं शक्य होणार नाही! म्हणून तो म्हणायचा, 'जरा मोठी होऊंदे-येऊ घेऊन. अशी काय मोठी घाई आहे ?' आणि आपल्या दुकानच्या कामकाजात बुडून जायचा.

एक दिवस न राहवून नवरा घरी येताच तिनं त्याला विचारलं, 'अनंत असा काय झालाय ?'

'काय झालंय त्याला ?'

ती तेच विचारीत होती. ती काय बरं याचं उत्तर देणार ? अनंताच्या मन:स्थितीचा दोघांनी आपल्याआपल्या परीनं विचार केला. जेवता जेवता रामप्पा मध्येच म्हणाला, 'मॅट्रिकचा अभ्यास आहे. फार अभ्यास करावा लागतो म्हणून असा झाला असणार !'

'अभ्यास करावा लागतोय म्हणून काय झालं ? घरात ज्याच्या त्याच्यावर एवढ्या तेवढ्यावरून नुसता वस्करून धावून येत असतो. एखादं चावरं कुत्रं अंगावर धावून यावं तसं !'

'अभ्यास कर करून थकल्यामुळं असं चिडचिडल्यासारखं करीत असणार...'

त्याला मध्येच आडवीत सुंदरा म्हणाली, 'राहून द्या, आपण आपलं उगाचच काहीतरी सांगताय झालं, तो तर उन्हाळ्याच्या सुट्टी नंतरच काहीसा असा वागायला लागलाय. आत्याच्या घरी सुट्टीत राहून आल्यापासूनच तो असा झालाय. वर्ष झालंय. मुलगी तिकडे दिसमास मोठी होत चाललीय, घेऊन या.' असं म्हणत सुंदराबाईनं सुनेला घेऊन येण्याबाबतच्या आपल्या प्रस्तावाकडे बोलण्याची गाडी वळवली.

रामप्पाला ही गोष्ट विशेष रूचली नाही.

पुढे साताआठ दिवसानंतरची गोष्ट: रामप्पा सकाळी आंघोळपांघोळ उरकून दुकानावर गेला- आणि तासाभरातच घरी परत आला. तो गावाला जायच्या तयारीत होता. नवऱ्याला असं अचानक घरी परत आलेलं पाहून सुंदरव्वा स्वयंपाक घरातनं बाहेर येत विचारायला लागली, 'यावेळी असं घरी परत आलायत ते ?' प्रवासाला जायला निघालेल्याला हटकणं बरं नाही असा विचार करून तिनं अधिक चौकशी केली नाही.

'दोन दिवसासाठी चांदूरला जातोय. हा आत्ता आत्ताच रत्नाचा निरोप आलाय.'

चांदूरचं नाव ऐकताच अनंत आपल्या खोलीतनं बाहेर येत मध्येच म्हणाला, 'आता बोलवलंय तुम्हाला...'

'येत्या शुक्रवारी चिम्मी भरमाचं दुसरं लग्न लावून देणार आहे. आम्ही त्याच वेळी सांगितलं होतं की तिथं मुलगी देऊ नका- पण मल्लप्पानं माझं एक ऐकलं नाही.'

'हो, पुन्हा दुसरं लग्न करतायत, कां ?' विचलित मनानं अनंतानं विचारलं. त्याच्या स्वरात आवेग होता. मनात एक प्रकारचं भय ठाण मांडून बसलं होत.

'मुलीला न्हाण आलं तेव्हापासून यांचं आपसात बिनसलं. सासू सुनेचं पटेनासं झालं. कोण जाणे काय प्रकार आहे तो !'

सुंदरव्वानं विचारलं, 'पुढं तिचं काय ? वाटलं तर घरात रहावं. नाही तर चालतं व्हावं- त्यांना काय त्याचं ?'

'तारा सध्या कुठं आहे ?' अनंतानं विचारलं.

'पोरीचं तर आयुष्य बरबाद झालं!' सुंदरव्वानं एक प्रदीर्घ श्वास घेत म्हटलं. तिचे डोळे आसवांनी डबडबले.

रामप्पाच्या डोळ्यातही अश्रू दाटून आले. डोळ्यातली आसवं हातांनी पुसता पुसता तो म्हणाला, 'परवा तिला माहेरी घेऊन आलेत. येवढ्यातच भरमाचं दुसरं लग्न त्यांना लावून द्यायचं होतं- म्हणून त्यांनी पोरीचा भारी छळ मांडला- इतका की पोरीला वेळेवर जेवायला देखील घालीत नसत- आणि जेवायला घातलंच तर खायला फक्त बाजरीची भाकरी आणि मिरची! कित्येकदा एक-एक दोन-दोन दिवस उपाशीही ठेवलं. शेजार पाजऱ्यांना तिचे हे हाल न बघवून त्यांनी तिला चोरूनमारून दोन घास खायला घातले.' गळा दाटून आल्यानं त्याच्या तोंडून पुढं शब्द फुटेनासा झाला- मग जराशानं स्वतःला सावरीत म्हणाला, 'सून बरोबरीची झाली. याची काही लाज शरम न बाळगता तिच्या अंगावर सरळ झाडू घेऊन मारायला धावली. काय अर्थ काय याचा ? पोरगी बिचारी माराला घाबरून गल्लीत पळून गेली.'

'ही चिम्मी पहिल्यापासून ही असलीच होती. तुम्ही तरी जाऊन काय करणार ?' सुंदरव्वानं निराशेनं विचारलं.

'काय करावं लागेल हे इथूनच कसं सांगू ? तिथं गेल्यावरच उमजेल काय झालं-काय नाही ते! मग विचार करावा लागेल काय करायचं- काय नाही याचा. अशा प्रसंगी आम्हीच गेलो नाही तर कसं दिसेल ते ? कधी-कधी असं काही घडतं की जाणं भागच असतं माणसाला! जरा चिम्मव्वाशी बोलून पाहतो. इकडे रत्ना ऊर बडवून घेतेय...... धाय मोकलून रडतेय... तिच्याकडेही पाहायला हवं-तिचंही सांत्वन करायला हवं-बघतो काय काय करता येणं शक्य आहे ते...' असं म्हणून तो जायला निघाला.

'बिचाऱ्या त्यांना तरी काय कल्पना आहे-' मग जरा थांबून सुंदरव्वा, 'दोन घास खाऊन तरी जा, कोण जाणे तिथं गेल्यावर कधी जेवायला मिळेल ते-' म्हणत दारापर्यंत गेली.

'आता नकोय काही, सायकलवरनं जातोय- मागची हवा आहे.' म्हणत तो जरा पुढं गेला- आणि पुन्हा मागे वळून येत म्हणाला, 'घराकडे लक्ष ठेव. अनंताला म्हणावं संध्याकाळी तासभर जरा दुकान उघडून बस-' आणि चालू लागला.

सुंदरव्वा आत आल्यावर अनंतानं विचारलं, 'अशा परिस्थितीत ती आता तिथं कशी राहू शकेल ? दुसऱ्या लग्नानंतर तिचं तिथं काय ठेवलं आहे ?' तेव्हां सुंदरव्वाला मुलाच्या चेहऱ्यावर गेल्या संबंध वर्षात कधी प्रत्ययास आला नाही असा संतोष तरळताना दिसला.

दोन तीन्न दिवस गेले. एक दिवस दुपारच्या वेळी रामप्पा तारक्कासह घरी परतला.

तो जरा कुठं दारात पाऊल टाकतो तोच सुंदरव्वानं आतुरतेनं विचारलं, 'काय घडलं ?' रामप्पानं तिला डोळ्यानं दाबीत गप्प बसायला खुणावलं-आणि म्हणाला, 'काय घडायचंय ? तारक्काला काही दिवसांसाठी आपल्याकडे रहायला घेऊन आलोय-' एवढं म्हणून गप्प बसला. तारक्काही मागोमाग आत आली. तिचं तोंड उतरलेलं होतं. डोळे लालीलाल झाले होते. मामीला पाहताच हा वेळपावेतो आवरून धरलेला अश्रूंचा बांध फुटला. सुंदरव्वानंही रडतरडत तारक्काला छातीशी धरीत तिला धीर दिलासा देत, 'का रडत्येस बाळ, आता काय करणार ? चल आत चल' म्हणत आत घेऊन गेली. तारक्का आत जाऊन गुपचूप बसली.

संध्याकाळी तिनं हळूच मामीला विचारलं, 'मुलं कुठं आहेत ? दिसत नाहीत ती !' कोणजाणे अनंताचं नाव घेऊन विचारायला तिला का संकोच वाटत होता ते! तसं सुंदरव्वा म्हणाली, 'शाळेत गेलाय, बाळ. अभ्यासाशिवाय त्याला काही सुचतच नाही. अहोरात्र अभ्यास आणि अभ्यास !' त्यावर तारक्का गप्प बसली. एक पोतं अंथरून त्यावर गुपचूप पडून राहिली. सुंदराबाईच अधूनमधून काही काही विचारायची. त्या सर्वाला 'हो' वा 'ना' करून तारक्का उत्तर देत राहिली.

संध्याकाळी अनंत शाळेतून परत आला. घरात तारक्काला पाहून हसत हसत विचारलं, 'कधी आली तारा ?' तारानं विशेष उत्साह न दर्शविता केवळ आशाळभूत दृष्टीनं त्याच्याकडे पाहत म्हटलं, 'दुपारी आल्ये.' अनंताला तिला कितीतरी गोष्टी विचारायची इच्छा होती. परंतु आई तिथं असल्याकारणानं काही एक विचारू शकला नाही. यापूर्वी तो आईसमोर तिच्याशी बोलत असायचा -पण आता तसं काही करायला त्याचं मन कचरत होतं. अनंत आपल्या खोलीत निघून गेला-पण तरीही त्याच्या डोळ्यासमोर तारक्काची उदासमूर्ती उभीच होती. तिच्यात पहिल्या सारखा खेळकरपणा नव्हता आणि उत्साहही नव्हता. आजची ही उतरलेल्या मुद्रेची आणि निरूत्साही मनाची पूर्वीची तीच पूर्वीची तारा आहे ? असा विचार करीत काही वेळ तसाच विचार मग्न स्थितीत उभा राहिला. त्या दिवशी रात्री रामप्पा आणि त्याची बायको सुंदरव्वा यांच्यात बराचवेळ पर्यंत बोलणं चाललं होतं.

'दुपारी तू आल्या आल्याच मला विचारलंस- पण तेव्हा तारा बरोबर होती- तिच्यासमोर कसं सांगणार- पोरगी फार फार दुखावली गेलीय- म्हणून मी तुला डोळ्यानं खुणावलं. तिनं तुला काय सांगितलं ?'

'काहीही नाही. गपचिप पडून होती. संध्याकाळी चहा घे म्हटलं. तर तोही घेतला नाही. थेंबभर पाणी देखील तोंडात घेतलं नाही दिवसभरात. तिथं काय घडलं ?' सुंदरव्वानं नवऱ्याकडे तोंड करीत विचारलं.

'काय व्हायचं ? काडीमोड झालाय-'

'हं! सारी कालपरवाची तर पोर. आपल्या अनंताहून बस दोन वर्षांनं तर मोठी आहे. तुम्ही मंडळींनी काडीमोड कसा होऊ दिलात. त्यानं दुसरं लग्न केलंही असतं, तरी ही त्याच्याबरोबर राहू नसती का शकली?' सुंदरव्वाच्या स्वरात एक व्याकुळता होती. कासाविशी होती.

''कशी राहिली असती? रत्ना म्हणाली, 'पोरगी तिथं जगू शकणार नाही. तिला तिथं ठेवण्यात काय लाभ? मागितला तर आता लग्नाचा खर्च तरी परत करू शकतील. पण एकदा लग्न होऊन गेल्यावर काय ते आमचं ऐकतील म्हणता?'

'ठीक आहे खड्ड्यात गेला खर्च, त्यांना काय अशी मोठी दहाबारा मुलं आहेत-' मग थोड्यावेळानं विचारलं, 'किती परत केले त्यांनी?'

'तीनशे रूपये.'

'काय दिलं! रत्नानं घर धुवून हजारो रूपये खर्च केले होते. वाटलं होतं तिला: कसा झाला तरी आपल्या नणंदेचा मुलगा आहे!'

'आता ह्या सगळ्याचा विचार करण्यात काय फायदा! एखादं चांगलसं स्थळ पाहून लग्न करून देऊ. म्हातारा म्हातारी निदान नातवंडांचं तोंड तर पाहतील. काही ना काही होईलच म्हणून आपलं हिला येताना बरोबर घेऊन आलो.'

'चिम्मीशी एकदा बोलून घ्यायला हवं होतं- काय तिला कोणी विचारणारा पुसणारा नाही की काय, जे मनाला येईल ते आपलं करीत असते ते?'

'इथनं गेलो त्याच दिवशी संध्याकाळी मी तिथं पोहोचलो. मी जाईसतो मल्लप्पाचा विचार काही वेगळाच होता. भाऊबंदातल्या काही लोकांनी मिळून हे लग्न थोपवायला हवं असं म्हणत होता. पण मी म्हणालो, असं केलंत तर ते लोक इथं नाही तर बाहेर कुठं दुसरीकडे जाऊन लग्न करू शकतील. आता हे इथंच थांबण्यासारखं नाहीए. मी चिम्मीला बोलवायाला माणूस पाठविला. म्हटलं तिच्याशी जरा बोलून पाहावं, पण ती आली नाही. नाइलाजानं मग मी चार माणसं बरोबर घेऊन तिच्या घरी गेलो.'

'म्हणजे तुम्ही तिच्या घरी एकदा जाऊन आलात तर?'

'जायला नको होतं? भाची दिली होती ना! तिला खूप समजावलं, पण तिनं साफसाफ सांगितलं: त्याचं आमचं बिनसलंय, आता काय वाट्टेल ते केलंत तरी गोडी होणार नाही. मी मुलाचं दुसरं लग्न लावीन तेव्हाच राहीन.'

'पण असं बिनसण्यासारखं बाई घडलं होतं तरी काय?'

'हूवण्णा वारल्यावर म्हणे यानी पोराच्या हातावर साधा एक रूपया ठेवला नाही, की म्हणाले नाहीत-घे हा रूपया आणि शीव नवा सदरा- म्हणाली: काय मी त्याचे पैसे स्वत:जवळ ठेवून घेतले असते?'

'ती काय मनाला येईल तसं वागत राहिली- आणि आता साऱ्या दोषांचं खापर मात्र यांच्या डोक्यावर फोडू पाहतेय!'

बायकोचे हे उद्गार ऐकल्यावर रामप्पाची छाती अभिमानानं फुगल्यावाचून राहिली नाही. त्याच्या मनात विचार आला: बायको शहाणी आहे- समजदार आहे.

'आता त्याला ते काय करणार ? सासू सुनेला नीट वागवित नाही या काळजीनं रात्रंदिवस तिळतिळ झिजून पिचून तो मेला. हिनं त्याला मारलं. खड्ड्यात जावो आता आम्हाला तिच्या बोलण्याचं काय ? आता पोरीचं उद्या कसं होणार ?'

'कुठंही चांगलसं घरदार पाहून लग्न करून देऊ - आणखी काय मरणार ? तरण्याताठ्या पोरीला घरात तशीच कशी ठेवता येईल ? तिथं ते दोन दोन लग्न करायला निघालेत-तिथं कशाला ठेवायची म्हणून ताराला येताना बरोबर घेऊन आलो.'

'अक्कातायीला कोणाकडे दिलंय ?'

'तिला दिलं नसतं तर याना मुलगी कोण देणार होतं ? मंगसुळीकराला यानी आपली मुलगी दिली आणि त्याच्या बहिणीशी हे भरमाचं लग्न लावणार.'

'ओ हो हो- तर एकूण हे असलं आहे तर कर्तृत्व! साटं लोटं!! चला छान झालं. आता या सुनेला हिनं काही केलं तर लगेच तिकडे तिच्या लेकीच्या त्यांनी उपटल्याच झिंज्या म्हणून समजा! आमच्या सोन्यासारख्या पोरीचे हे हाल केले, या पापाचा तळतळाट त्याना भोवल्यावाचून थोडाच राहणार आहे ? एक घास अन्न मुखात घेतलं नाही- लाजेनं बिचारीला आतल्याआत मेल्याहून मेल्यासारखं होत असणार. मोठी मानी पोरगी आहे.'

'हिचं काय सांगत्येयस ? दोन दिवस झालेत रत्नाच्या डोळ्याचं पाणी खळत नाहीए. रात्रंदिवस एकच आक्रोश करत्येय: हाय, काय झालंय हे माझ्या पोरीचं! किती किती म्हणून समजावून पाहिलं- तिची समजूतच पटत नाही.' रामप्पानं आपल्या बहिणीची दशा वर्णन करून सांगितली.

'तर मग मी उद्या जाऊन येऊ ? तारा तुम्हाला आणि अनंताला दोन भाकरी करून घालील. अनंताला ताराकडे लक्ष ठेवायला सांगून जाईन.

# 16

अनंताला ही गोष्ट माहीत नव्हती. त्याला ते कोणी सांगितलंही नव्हतं- आणि सांगितलंच असतं तर कोणजाणे त्याची मन:स्थिती कशी झाली असती...! तरी पण एक खरं की तारक्का घरी आल्यापासून तो जरा उल्हसित वृत्तीनं वागायला लागला होता. दुसऱ्याच दिवशी त्याची आई- सुंदरव्वा चांदुरला गेली. रामप्पा सारा दिवस दुकानावर असायचा. घरात फक्त अनंत आणि तारक्काच असायचे. नाभिराजही आईबरोबर गावाला गेलेला होता, तरीही अनंत तारक्काबरोबर पूर्वी सारखं मोकळेपणानं वागत नसे, साधं तिच्याशी बोलत देखील नसे. कदाचित त्याला आता असं वाटत असावं, की परस्त्री बाबत अधिक आत्मीयता बाळगणं- तिच्याशी जादा घसट वाढविणं हे बरं नव्हे. आजवरच्या अनुभवावरून त्याला हे ही जाणवलं असणार की, तिच्यावर प्रेम करणं म्हणजे-पदरी फक्त पश्चाताप पाडून घेणं होय ! परंतु एखाद्या दु:खी कष्टी व्यक्ती बरोबर जेवढं सांत्वनपर, जेवढं दिलासा देणारं बोलायला हवं- जसं वागायला हवं तसा तो तिच्याशी वागत बोलत होता. तो तारक्काची सासू आणि नवरा यांची मनातल्या मनात निर्भर्त्सना करीत होता- धिक्कार करीत होता.

एक दोन दिवसानंतर तारक्काच्या वागण्यात सहजपणा आला. मामी गावाला गेल्यामुळं घरचं सारं काम तिलाच करावं लागत होतं. कदाचित तिनं मनाशी विचार केला असावा की आपण आता निराधार आहोत. तेव्हां सर्वांची मर्जी संपादून... जुळतंमिळतं घेऊन वागायला हवं. घरचं सारं काम ती मन लावून करीत होती. मामाला वेळच्यावेळी चहा करून देणं, जेवायला वाढणं काम ती मोठ्या हुशारीनं सांभाळीत होती- त्याचप्रमाणे अनंताची सेवाही ती मन लावून करीत होती- परंतु अनंताचं वागणं पाहून ती निराश झाली. एक दिवस दुपारचा अनंत घरी आला आणि त्यानं अगदी सहजगत्या विचारलं, 'तारक्का, तू आपल्या सासरी कधी परत जाणार आहेस ?' त्या बरोबरच त्याचं तोंड उतरलं, कारण त्याला वाटलं की आपण हा प्रश्न तिला विचारायला नको होता, कोण जाणे त्यामुळे ती किती व्यथित होईल ! परंतु तोंडून गेलेला शब्द काय पुन्हा परत घेता येतो ..? त्याला वाटलं होतं तसा काही त्याच्या या विचारण्याचा तारक्कावर परिणाम घडून आला नाही. उलट तिनंच हसत हसत विचारलं, 'आता कुठं जाणार ?' तिच्या हास्यात एक आत्मीयता दडलेली होती. त्याला वाटलं- तिला जणू म्हणायचं होतं

आता तूच काय तो माझा आधार आहेस, हेच माझं घर आहे.

अनंत गप्प राहिला. ही गोष्ट आणि हे घर त्याला असह्यसं झालं. त्यानं मनात विचार केला- ही खेडवळ स्त्री आहे. त्या दिवशीचा तो प्रसंग त्याच्या मन:पटलावर काही काळ तरळून गेला. त्याला लगोलग बाहेर जायची इच्छा झाली- पण त्याच्या मनानं ते मानलं नाही. 'अच्छा, तर अशी गोष्ट आहे ?' असं म्हणत खाली बसला.

तसं तारक्कानं माजघराच्या खिडकीतनं बाहेर डोकावून पाहिलं आणि नंतर डोळ्यात पाणी आणून म्हणाली, 'काय तू तुझ्या हाताचा आधार काढून घेशील ? मला तशीच वाऱ्यावर सोडून देशील ?'

अनंताचं हृदय द्रवलं- त्याचे डोळेही ओलावले- त्याला समजेना की तिला उत्तर तरी काय द्यावं ? तसं खुळ्यासारखं बोलून गेला, 'यासाठी आता मार्ग तरी काय ?'

तारानं त्याला एक प्रश्न विचारून टाकला, 'दोन बायका तुला एकत्र नांदविता येणार नाहीत की काय ? दोघींबरोबर तू एकत्र राहू शकणार नाहीस ?'

'प्रेम एकीवर केलं जातं-ते दोघीत कसं वाटता येणार ? जे मी तुला एकदा दिलं आहे- ते मी दुसऱ्या कुणाला कसं देणार ? माझंही लग्न करून दिलं गेलं आहे. त्याला काय लग्न म्हणायचं ?'

अनंताचा तो प्रेमविषयक सिध्दांत तारक्काच्या काही ध्यानी आला नाही. म्हणून काही एक उत्तर न देता ती मनातल्या मनात गुपचूप विचार करायला लागली.

'कां विचारतेय ते तूच सांग ?' उत्तरादाखल तारक्कानं त्यालाच उलट प्रश्न केला.

'ते बरोबर आहे. पण तू जे म्हणत्येस तसं करता येणं कसं शक्य आहे ? कसं जमेल ते ?'

'कां नाही ?' हसत हसत तारक्का म्हणाली.

'पुरूष दोन बायकांशी लग्न करू शकतो. कबूल. पण एक स्त्री दोन पुरूषांबरोबर कशी काय लग्न करू शकेल ? तू तर एखाद्या खुळ्यासारखं बोलत्येयस झालं !

'स्त्री काही दोन लग्नं करू शकत नाही, पण पुरूष मात्र दोन लग्नं करू शकतात, होय की नाही ?' अनंताचा हात घट्ट धरून ठेवीत करूणार्द्र स्वरात तारक्कानं विचारलं.

'तुझ्या नवऱ्यानं केलीत की नाही ?'

'कोणी ?'

'भरमानं ?'

'असं विचारतोयस की जणू तुला यातलं काही माहितच नाहीए ! त्यानं मला सोडून दिलंय... काडीमोड देऊन दुसरीशी लग्न केलंय...' तारा खिन्नपणे मान खाली घालीत म्हणाली.

अनंताला आश्चर्य वाटलं. आता हे ऐकून त्याला थोडा आनंद झाला नाही असं

नाही. तिच्या केसावरून प्रेमभरानं फिरणारा त्याचा हातच याचा साक्षी होता. त्यानं आश्चर्यानं विचारलं, 'खरंच का हे ? मला काही म्हणता काही माहीतच नव्हतं यातलं !'

अनंताच्या तोंडाकडे पाहत तारका म्हणाली, 'मी तुला खोटं का सांगत्येय हे ?'

थोडावेळ गप्प राहिल्यावर मग अनंत म्हणाला, 'तुझा नवरा दुसरं लग्न करणार आहे असं सांगून बाबा चांदुरला गेले, त्या पलिकडे मला खरंच काही एक माहीत नव्हतं.'

तारकानं अविश्वासानं हसत म्हटलं, 'तुला सारं माहीत आहे'

'तुझी शप्पत- खरंच मला काही एक माहीत नव्हतं.''

'मामा सासुबाईला जाऊन भेटले- खूप समजावून सांगून पाहिलं- पण काही वळलं नाही. आई तर पहिल्यापासून म्हणत होती की काडी मोड घ्यायला हवा... पोरीला मोकळी करायला हवी. शेवटी तसंच झालं.' तारकानं थोडक्यात सारं सांगितलं.

अनंत ऐकून चकित झाला. तिच्या सांगण्यावर त्याला एकदम विश्वास बसेना. मानवी स्वभावच मुळी असा आहे की आपल्या आवडीची काही गोष्ट असेल तर तिच्याविषयी संपूर्ण खात्री करून घेतल्यावाचून त्याच्याच्याने रहावतच नाही. तद्नुसार अनंतानं पुन्हा विचारलं, 'काय हे सारं खरं आहे ?'

'होय - खरं आहे हे.'

'तर मग एवढी उदासशी का झालीस ?'

तारकाची मुद्रा काहीशी म्लान झाली- जराशानं म्हणाली, 'जाऊं दे झालं- तू अशा काही पध्दतीनं विचारतोस, की मग मी उदास न होईन तर काय !'

अनंताला आता भारी आनंद झाला. उन्हाळ्यात आटलेली नदी जशी पावसाळ्यात दुथडी भरून वाहायला लागते तसं अनंत आणि तारकाचं प्रेम गुपचूप हृदय भरून ओसंडून वाहायला लागले.

मध्यंतरी मल्लू एकदोन वेळा लेकीला परत घेऊन जाण्यासाठी चांदुरहून आला- तेव्हा सुंदराबाईनं म्हटलं, 'इथंच राहू दे, इथं राहिली म्हणून काय झालं. एकूण एकच तर आहे. जो पर्यंत तिचं दुसरीकडे कुठं पक्क होत नाही तोवर ते तिला तिथं आपल्याला हवं तसं सतावत राहतील- तिथं कशाला घेऊन जाताय ?' असं सांगण्यामागे कदाचित तिचा असाही हेतू असेल, की तारका जर गेली, तर सारं घर काम तिच्यावरच येऊन पडेल.

मल्लूला सुंदराबाईचं म्हणणं पटलं. मुलीला आनंदात पाहून त्यानं मनाशी विचार केला: निदान पोर इथं तरी चार दिवस सुखात राहू दे. म्हणून जाताना म्हणाला, 'तर मग इथंच राहून दे वर्ष सहा महिने. सून येईपर्यंत तुम्हाला तरी कुठे दुसरी मुलगी !'

अनंताच्या खोलीची झाडलोट करणं, तिथल्या वस्तू साफसूफ करून नीटनेटक्या ठेवणं याची सारी जबाबदारी तारकावरच होती. तेव्हा ती आपल्या समजुतीनुसार त्याची

पुस्तकं व्यवस्थित लावून ठेवायची. आता त्यामुळे अनंताला आपल्याला हवं ते पुस्तकं चटकन शोधून काढणं जरा अडचणीचं जायचं- पण तारक्काचं काम पाहून तो खूष व्हायचा-आणि तिची स्तुतीही करायचा. कधी कधी दुपारच्या चहाच्यावेळी तो बोलावलं असताही अभ्यास सोडून आला ना, तर तारक्कालाच त्याला त्याच्या खोलीत चहा नेऊन द्यावा लागे. तारक्का चहा देता देता एखादवेळ हसली तर अनंतही चहा पिता पिता हसायचा. यानं चहा अंगावर सांडून घेतला तर ती खळाळून हसायची- तिचं हसणं ऐकून सुंदरव्वा विचारायची, 'काय रे काय झालं, अनंत ?'

त्यावर हसत हसत अनंत उत्तर द्यायचा, 'बघ आई, हिनं माझ्या सदऱ्यावर चहा सांडलाय !'

'नीट लक्ष देऊन काम कर, बाळ तारा-' म्हणत सुंदरव्वा तिला समजवायची.

'मी काय करू ? त्याचा हात लागला,' असं खोटंच सांगून कृतक्कोपानं ती त्याच्याकडे पाहायची. माहीत नाही असे कितीतरी प्रसंग घडायचे.

एक दिवस सकाळी अनंत काही लिहीत बसला होता. त्याची आई काही कामानिमित्त खोलीत आली. काही खास काम असल्यावाचून ती त्याच्या खोलीत कधी जात नसे. अनंतानं लिहिणं थांबवून मान वर करून विचारलं, 'तुझं सारं काम आटोपलेलं दिसतंय !'

'हो', म्हणत हसत ती अनंतापाशी जाऊन बसली. तिच्या चेहऱ्यावरून ती काही तरी सांगू इच्छितेय हे जाणवत होतं. अनंतानं आपलं लिहिणं चालू ठेवलं. जराशानं सुंदराबाई म्हणाली, 'तारा फार चांगली मुलगी आहे- घरकामात मोठी सुगरण आहे-पण काय करणार ? पोरीचं नशीब खराब आहे.'

अनंतानं लिहिता लिहिताच विचारलं, 'कसं काय ?'

'बिचारीला असं रूप, असे गुण लाभूनही चांगलं घर मिळालं नाही. पोरीतही अशी बुध्दी- असं शहाणपण नाहीए.' मध्येच अनंतानं विस्मयानं विचारलं, 'कोणाविषयी म्हणत्येस तू हे ?'

'हिची गोष्ट नाही रे- इंदिराची गोष्ट सांगत्येय मी! तिला घरी आणून काही शिकवावं-वळण लावावं म्हणत्येय मी. पण हे ऐकायला तयारच नाहीत. आणि तेही मुलगी मोठी होईपर्यंत धाडायला राजी नाहीत.'

'आपल्या पाशीच ठेवून घ्या म्हणावं, इथं कोणाला हवीय ती !'

सुंदराबाईच्या मुद्रेवर नाराजीची लकेर तरळून गेली.

आईच्या मनात काय आहे याची जणू आपल्याला कल्पनाच नाही असं दर्शवीत हसत हसत म्हणाला, 'तुझं आणि तिचं पटायचं नाही. तिला तिथंच राहू दे, सुनांनी घरात पाऊल टाकलं रे टाकलं की सासवा ठाणेदार बनतात !'

'सगळ्याच चिम्मव्वासारख्या असतात होय ?'

अनंतानं आपलं लिहिणं चालूच ठेवलं- त्यानं तिच्या या पृच्छेला काही एक उत्तर दिलं नाही. तसं सुंदरव्वाच पुढं म्हणाली, 'आता तारानं काय करावं सांग ? तिचे वडील-मल्ल तिच्यासाठी इथं तिथं वर शोधून शोधून थकलेत. कुठं चांगलं स्थळच आढळात येत नाहीए. सहासात महिने झालेत चांगल स्थळ मिळावं काळजी मिटावी- निश्चिंतपणे झोप लागावी, यासाठी रात्रंदिवस प्रयत्नांची पराकाष्ठा करताहेत.'

अनंतानं कसला तरी विचार करीत लिहायचं थांबवीत विचारलं, 'आता तिचं दुसरं लग्न करणार आहेत काय ?'

'आता दुसऱ्यांदा लग्न करणार असतात का ? दुसऱ्यांदा घरठाव करावाच लागतो !'

'तिच्या नवऱ्याचं तर लग्न झालं - मग हिचं कां नाही ?'

'तो तर पुरूष आहे बाबा- तो काय वाट्टेल ते करू शकतो. बायका म्हणजे मातीचं मडकं- एकदा शिवलं, की संपलं सारं !'

अनंताचं हृदय धडधडले. कदाचित त्याला आपल्यातिच्या संबंधाबाबतची आठवण झाली असावी. सुंदराबाई पुढं म्हणाली, 'आता तरी तिला चांगला नवरा मिळो !'

'कां ती कोणाबरोबर लग्न वगैरे न करता राहू शकणार नाही ? कुठं चांगलं घर पाहूनच. तिला आई-वडलांना जिणं असह्य होऊन गेलंय.'

'कां ?' अनंतानं विचारलं.

'तुला काय कल्पना, बाळा- तू आपला नुसता आपल्या अभ्यासात आणि लिहिण्यावाचण्यातच तेवढा हुशार आहेस.' सुंदरव्वा तिथून उठून जाता जाता म्हणाली.

त्या दिवशीच संध्याकाळचा असा मल्ल ऐनापूरला आला. तो तारक्कासाठी एक मुलगा पाहायला गेला होता. ऐनापूर पासून दहाबारा मैलावर हारोगेरी मध्ये एक स्थळ होतं तो पाहून आला होता. ते स्थळ त्याला बरं वाटलं. आल्या आल्याच तो आपल्या लेकीला म्हणाला, 'हारोगेरी मध्ये 'आकिवाटे' आडनावाचं एक कुटुंब आहे. घरात आई आणि मुलगा असे दोघेच आहेत. मुलाचं नाव अप्पण्णा आहे. आई खूपच म्हातारी आहे-मला वाटतं तिला डोळ्यानंही धड दिसत नाही. स्वत:चं घर आहे, शेती आहे, एक बागही आहे- आणि बागेतच वस्तीला असतात. पण गावातही घर आहे- चांगलं चार खोल्याचं घर आहे. आणखी काय हवंय ?' वडिलांचं बोलणं ऐकून तारक्कावर वीज कोसळल्यासारखं झालं. ती तिथल्या तिथच मटकन खाली बसली.

बाहेरून येताच अनंताला ही बातमी समजली. उगाचच शुष्कसं हसत त्यानं विचारलं, 'घर कसं आहे ?'

'घर तर चांगलंच आहे. घरात सासू असून नसून सारखीच आहे. खायला प्यायला कसली काही ददात नाही.' मल्लनं सांगितलं.

'मुलगा कसा आहे ?'

'मुलगा तीसपस्तीस वर्षाचा असेल. दिसायला चांगला आहे. त्या मेंगळट भरमापेक्षा तर खूप चांगला आहे.'

'त्याची पहिली बायको आहे ?'

'अंहं- दहा वर्षामागंच त्यानं तिला सोडून दिलंय. पोरंबाळंही नाहीएत.'

'तर मग आता दुसरी कशासाठी करतोय ?' अनंतानं विचारलं.

मल्लनं या बाबतीत फारशी खोलवर चौकशी केलेली नव्हती. म्हणून जरासं थांबून म्हणाल, 'ऐकलंय की तो आधी लग्न करायलाच मुळी तयार नव्हता. आईन अन् भावकीतल्या लोकांनी फारच आग्रह धरल्यावरून तो आता कुठंसं राजी झालाय. आता ते त्याच्यासाठी मुली शोधताहेत.'

'जरा नीट विचार करून मगच काय ते करा. उगाच वाट्टेल त्याच्या गळ्यात बांधू नका. आधीच एक वेळ भोगून चुकलात. हाही तशातलाच न निघो. एकदा ठोकर खाल्ल्यावर नीट डोळे उघडे ठेवून चाललं पाहिजे.'

'ह्या साऱ्याची जबाबदारी मी एकटा नाही घेऊ शकणार. मागच्या वेळेला कोणाचं न ऐकता दिली. एकदा गाढवपणा झाला म्हणून आता यापुढे कानाला खडा ! ताराची आई रात्रंदिवस रडरडून स्वतःचा जीव पाखडतेय. या वेळेला तुम्ही सारे जण आहात, नीड हडसून खडसून पाहून मगच द्या.' असं म्हणून मल्लनं स्वतःवरची जबाबदारी कमी करण्याचा प्रयत्न केला.

'येवढी कसली काय घाई आहे, सावकाश आरामात पहा.'

'सावकाश करून काय करणार, कुठं जमलं तर ठीकच आहे. उद्या ते कधी चांदूरला येतील. इथनं आपण मंडळीही चला. पाहा काय म्हणतायत ते. नीट बघून घ्या आणि काय ते एकदाचं ठरवूनच टाका. ते लोक तिथं ताराला पाहायला म्हणूनच येताहेत.'

हे ऐकून अनंत गप्प झाला. जवळच उभ्या असलेल्या तारानं त्याच्याकडे पाहात काही बोलू नकोस म्हणून त्याला खुणावलं. अनंताला तिच्या खुणावण्याचा अर्थ उमगला. पण खरं म्हणजे याबाबतीत काही बोलण्याच्या मनःस्थितीतच तो नव्हता, की काही बोलायचं धैर्यही त्याच्यात नव्हतं. म्हणूनच बहुदा त्यानं तारकाचं खुणावणं आपल्याला समजलंच नाही असं नाटक केलं. त्या दिवशी चांगलं पहाटेपर्यंत त्याचा डोळ्याला डोळा लागला नाही. रात्रभर आढ्याचे वासे मोजत पडून राहिला.

सकाळी तारका अनंताचा निरोप घ्यायला आली तेव्हां अनंत आपल्या खोलीत येरझारा घालत होता. तारका कितीतरी वेळ त्याचे पाय धरून रडत राहिली. तिच्या तोंडून शब्दच फुटेनासा झाला. अनंतही काही बोलला नाही. गुपचूप उभा राहिला. दोन मोठाले कढत अश्रू बिंदू तारकाच्या डोक्यावर ओघळले. तिनं अनंताकडे पाहिलं. त्याचवेळी मल्ल तिला हाक मारीत तिथं आला. तिच्या हातात एक हार देत म्हणाला,

'हा तुझ्या मामीचा आहे. गळ्यात घाल. उद्या ते लोक तुला पहायला येणार आहेत.'

'ठीक आहे -' म्हणत बापापासून अश्रू लपवीत तारा तिथून निघून गेली.

अनंताचा बाप चांदूरला गेला होता. तीन दिवसात ताराचा संबंध ठरवून घरी परतला. परत आल्यावर तो अनंताला म्हणाला, 'या रविवारी ताराचा संबंध पूर्ण करायचं ठरलं आहे. शनिवारी तू चांदूरला जा आणि त्या लोकांच्या बरोबर जाऊन सारं काम उरकून ये.'

'मला पुष्कळ अभ्यास आहे, मी नाही जाणार. परीक्षाही जवळ आलीय.'

'तुझा तर नेहमीचाच अभ्यास असतो. मी जाऊ शकत नाही; घर आणि दुकान दोन्ही पाहायचंय. ती जाऊ शकणार नाही, आता तू वगळता घरात जाण्यासारखं दुसरं कोण आहे!' काहीशा रागारागानंच रामप्पा म्हणाला. अनंत अधिक बोलू शकला नाही. त्याला जावंच लागलं.

अनंत आलेला पाहून तारक्काच्या निराशेतही आशेचा किरण चमकून गेला.

रविवारी भल्या पहाटेसच सर्वलोक बैलगाड्या जोडून हारोगेरीकडे रवाना झाले. एका गाडीत बायका आणि दुसरीत पुरूष. पुरूषांच्या गाडीत अनंताही बसलेला होता. बायकांच्या गाडीला ताट्या लावलेल्या होत्या. उन्हं झाल्यावर तारक्कानं 'अनंताला उन्ह लागेल' असं म्हणून आपल्या गाडीत बसायला बोलावलं. बायकांनाही अनंताकडून गोष्टी ऐकायला मिळतील याची ओढ होती. परंतु अनंत तिथं जाऊन गुपचूप बसला. तो कोणाशी काही विशेषसं बोललाही नाही. रात्री एक वाजता दोन्ही बैलगाड्या, हारोगेरीला पोहोचल्या. तिथं यांना रहायसाठी दुसरं एक घर जानोसा म्हणून दिलं होतं. तिथं जाऊन हे सगळे उतरले.

दोन तीन तास गेले. गाड्यातनं सामान उतरवून घेऊन आत ठेवलं गेलं. व्याह्या कडच्यांनी गुळपाणी आणून दिलं. अनंत काही न खाता एका कोपऱ्यात घातलेल्या अंथरूणावर पसरला. रात्रीच्या जेवणासाठी व्याह्यांकडून बोलावणं आलं. सगळे जायला निघाले परंतु अनंत 'मला भूक नाही' म्हणत तसाच पडून राहिला. तारक्का यावेळी त्यांच्याघरी जेवायला जाऊ शकत नव्हती. रत्नव्वानं अनंताला पुन्हा एकवार आग्रह करीत म्हटलं, 'भूक नाही म्हणून कसं चालेल, बाळ.. दुपारी असं काय मोठसं खाल्लं होतंस ?' तरीही अनंतानं 'भूक नाही' म्हणून सांगितलं. तसं रत्नव्वा तारक्कापाशी जान म्हणाली, 'अनंत काही जेवायला जात नाहीए- तू त्याला डब्यातनं दोन लाडू काढून दे- म्हणजे तो ते खाऊन पाणी तर पिईल.' आई काय सांगतेय इकडं तारक्काचं लक्षच नव्हतं. रत्नव्वानं पुन्हा विचारलं, 'मी काय म्हटलं ते ऐकलं नाहीस का ?'

'हूं', तारा म्हणाली.

सर्व मंडळी जेवायला गेली. अनंत बिछान्यावर अस्वस्थपणे या कुशीचा त्या कुशीवर

होत पडला होता. मनात विचार करीत होता: आजवर माझं लग्न झालं नसतं आणि मला मुलगी निवडण्याचं स्वातंत्र्य असतं, तर मी ताराला नसतं का निवडू शकलो ? तसं होतं तर मी किती सुखी झालो असतो..! ते सुख आता या जन्मी हाती लागण्याची शक्यता आहे ? नाही. असं का ? कां म्हणून असं घडलं ? हे सारं सामाजिक रूढींपायीच तर घडलंय.

तारक्का सारीजण जेवायला गेलेत की नाही हे पाहून आली. नंतर अनंतापाशी जाऊन डोळ्यातनं टिपं गाळीत म्हणाली, 'माझी एक गोष्ट ऐकशील ?'

अनंतही फार दु:खी होता. तारक्काला मिठी मारून रडायला लागला. रडण्याचा आवेग जरा कमी झाल्यावर त्यानं विचारलं, 'काय आहे तुझ्या मनात- मी काय करावं म्हणत्येस ?'

'ही रात्र संपताच सारं काही संपुष्टात येईल. तुझा माझा काही एक संबंध उरणार नाही. जे काही करायचं ते आत्ताच केलं पाहिजे.'

गोंधळल्यासारखा होत अनंतानं विचारलं, 'काय करावं लागेल ?'

'ते मी सांगेन, पण....'

'पण काय ?'

'ते फार वाईट काम आहे.'

'वाईट काम ?'

'हो, सारे लोक नांव ठेवतील- शिव्या देतील, काय.'

'तर मग काय करायचं ?'

'केल्यावाचून गत्यंतर नाहीए.'

'कां ?'

'ते मला नाही माहीत, पण एक सांगत्ये- ते केलं नाही तर मरेपर्यंत आपल्याला दोघांनाही सुख लाभणार नाही.'

'केलं तर सुख मिळेल ?'

'मिळू शकेल-'

'तर मग करूया-'

'आम्ही दोघांनी आत्ताच इथून निघून जायला हवं.'

'कुठं ?'

'कुठंही-'

'हे असंच ?'

'त्यात काय आहे ?' माझ्या अंगावर दागिने आहेत. ते विकून दुपारची वेळ भागवू-'

'तर मग निघूया, लगेच उठ'.

'तारक्काचं मन थोडसं हलकं झालं. तोंडावर उत्साह आला, समाधान दृष्टीस पडलं.

काही काळ तशी शांत चित्तानं बसून राहिली. मनाशी काही विचार करू लागली. कदाचित जाताना बरोबर कोणकोणते कपडे न्यावेत याचा विचार करीत असावी.

अनंत म्हणाला, 'तारा...'

'काय ?'

'पुढं काय करायचं ?'

'जायचं .'

'जायचं ठीक आहे- पण नंतर पुढं ?'

'पुढची गोष्ट पुढे.'

कपाळाला आठ्या घालून अनंत विचारात बुडाला.

'मी कष्ट करून आणीन. आणि दोन वेळेला मिळालंच नाहीत तर कुठं आडात नाही तर विहिरीत उडी घेऊन मरून जाऊ.'

'हूं-ऊं'

'उठ निघूया-'

अनंत पुढं काही बोलला नाही. पाषाणवत् बसून राहिला. काय बोलावं हे त्याला उमगेनासं होऊन गेलं. काही काळ असाच गेला. चहुबाजूस नीरवता पसरली. तारक्का अनंताकडे पाहत होती. पाल चुकचुकली. तारक्का पापणीला पापणी न लावता टकाटका पाहात होती. पेट्रोमॅक्स ढणाढणा जळत होता. शेवटी तारक्काच म्हणाली, 'अनंत, पहिलं सारं विसरलास की काय ? तुझ्यासाठीच तर आजवर मी जीव जगवलाय- तुला आता चलावंच लागेल.' अशा प्रकारे आग्रह करायला लागली. या आग्रहाचं कारण असं, की ती समजून चालली होती- तिला वाटत होतं, की त्याच्यावर आपला काही एक अधिकार आहे. तिच्या आपल्या भावनेनुसार हा अधिकार होताही. यद्यपि हा अधिकार तिला कोणी दिलेला नव्हता, निसर्गाकडूनच तो तिला प्राप्त झाला होता. ही गोष्ट तिची तिलाच माहीत नव्हती. तिची अशांत- अस्वस्थ मन:स्थिती अजाणतेपणानं हा अत्यंत दृढ अधिकार संपादून बसली होती आणि त्याची तिला कल्पना नव्हती. त्यासाठी अनंतानंही वाव दिला होता. या अधिकाराची इतकी स्पष्ट जाणीव नसतानाही तो फुकाफुकी नष्ट होताना पाहून तिचं हृदय पिळवटून निघालं.

# 17

त्या दिवशी रात्री जवळजवळ अकरा वाजण्याच्या सुमारास तारकाला ती मंडळी अन्यत्र घेऊन गेली. चार विधवांनी तिला न्हाऊ घातलं. एक सफेद साडी नेसवून तिला देवघरात घेऊन गेल्या. त्या आधीच अप्पण्णा तिथं जाऊन बसला होता. अप्पण्णाचं वय चाळीसच्या आसपास होतं. वाढलेल्या काळाकरड्या मिशा होत्या. देहयष्टी छोटी आणि अंगानं जरा जाडजूड होता. धोतर नेसून अंगावर एक प्रशस्तशी शाल पांघरून तो देवाच्या मूर्तीसोमर पाटावर पूर्वेकडे तोंड करून अवघडून बसला होता. तारकाला नेऊन तिथं त्याच्या शेजारी बसविण्यात आलं.

पुढं सारं व्यवस्थितच मार्गी लागलं.

दुसऱ्या दिवशी सकाळी उपहारानंतर तारकाच्या अंगावर चारपाच दागिने झळकायला लागले. त्याच दिवशी लग्नाचं जेवण होतं. अप्पण्णा खुशीत धावपळ करीत काम करीत होता. मन उत्साहानं दाटून आलं होतं. तारकाला आता हे आपलंच घर समजून तिथल्या घरात काम करायचं होतं. तिची मैत्रीणी सुमती तिला पाहायसाठी मुलाला कडेवर घेऊन आज आली. हसत हसत ती म्हणाली, 'चला आमच्या डोक्यावरचं एक मोट्ठं थोरलं ओझं कमी झालं!'

तिथं दुसरं कोणी नव्हतं तारका काहीशी थबकून म्हणाली, 'सुळावर चढवून तुम्ही मंडळी बाजूला झालात. सांगणारे हजार आहेत, पण प्रत्यक्ष सुळी जायला कोणी नाहीए.'

'असं कां म्हणत्येस ?'

'म्हणायचं काय ! तुला काय माहीत नाहीए सारं ?''

तारा अनंतावर प्रेम करत्येय याची सुमतीला थोडीशी कल्पना होती. म्हणून विषय बदलीत ती म्हणाली, 'अनंत आज जेवणानंतर परत जाईल.'

तारका चकित होऊन तिचा हात पकडीत म्हणाली, 'कां ? आणखी एक दिवस या पातकी घरात राहून मग नाही का जाऊ शकणार !'

सुमतीचा गळा दाटून आला. म्हणाली, 'त्याला थांबवून घ्यायचा कशाला विचार करत्येस ?'

'हुंगलेलं फूल देवाला वाहायच्या कामी येत नसतं...' पुढं तिच्या तोंडून शब्द फुटेनासा झाला. नजर धरणीला खिळली. हातावर दोन अश्रुबिंदू ओघळले.

तेवढ्यात अम्मव्वा-ताराची नवी सासू, 'काय करत्येस गऽ ?' म्हणत आत आली.

दोघीही आसवं पुसत, 'काही नाही-' म्हणत बाहेर गेल्या.

दुपारचं भोजन आटोपताच अनंत जायला निघाला. आत्याचा नवरा आणि आत्या दोघांनीही त्याला आग्रह करीत म्हटलं, 'उद्या आपण सारे बरोबरच जाऊ. आलाच आहेस तर जाताना प्रथम आमच्या घरी राहून नंतर पुढं घरी जा.' पण तो थांबला नाही. जाताना सर्वांचा निरोप घेतला.तारका दारामागे उभी होती. तिचाही त्याला निरोप घ्यावा लागला. त्यावेळी त्याला येवढं म्हणून दुःख झालं की जणू शंभर विंचवांनी आपल्याला एकाच वळी डंख केलाय असं त्याला वाटून गेलं. त्याचा आवाज कापरा झाला. आता आपण भ्रमिष्ट होतोय की काय असा त्याला भास झाला. हलके हलके तो तिथून निघून गेला. त्याचं मन त्याला सांगत होतं चल पळ निघ इथनं, हो लवकर या लोकांच्या दृष्टीआड ? पण त्यानं तसं केलं नाही. तो गेल्यावर एक बाई म्हणाली, ' कोण जाणे का, काल पासून हा पोरगा काहीसा मलूलच होता, काही खाल्लंबिल्लंही नाही त्यानं.'

सुमतीचं मन म्हणत होतं: 'विचित्र प्राणी आहे झालं !'

अनंत कडुची स्टेशनवरनं तेरदालकडे जाणाऱ्या राजमार्गावर जाऊन पोहोचला. थोडा वेळ बसची वाट पाहिली. नंतर कडुचीच्या डाक बंगल्याकडे जायला निघाला.

फर्लांगा नंतर फर्लांग आणि मैलामागे मैल असा नुसता चालतच राहिला. मागून एक बस आली. तिला थांबवून तिच्यात बसावं हे मुळी त्याच्या ध्यानीच आलं नाही. विचाराच्या वावटळीत तो चालतच राहिला. सूर्यास्त झाला. काळोख पसरला. यातल्या कशाकडेही त्याचं लक्ष नव्हतं, कसा तरी रात्री दहा वाजता तो कडुची स्टेशनवर जाऊन पोहोचला. तिथं एका बाकावर जाऊन बसला.

अनंताला अतिशय दुःख होत होतं-यातना होत होत्या. त्याला काही शारीरिक पीडा वगैरे नव्हती, परंतु त्याच्या मनाला मात्र एक अनिर्वचनीय असं दुःख होत होतं. त्याला असं वाटत होतं की आपण आपल्या हातानं आपलं सारं सुख घालवून बसलो आहोत. त्याची स्थिती अशी होतीकी जणू कोणी एखाद्या व्यक्तीनं कसल्या तरी अलभ्य गोष्टीची अभिलाषा धरुन असावं, ती त्याला प्राप्त होण्याची सारी अनुकूल लक्षणं दिसू लागावीत-आता ती आपलीच झाली म्हणून समजा असे त्यानं गृहीत धरलेले असावे-आणि तेवढ्यात पाहता डोळ्या देखत ती त्याच्या हातनं छिनावली जावी तसं त्याचं झालं होतं.एखादी गोष्ट हातनं निसटल्यावरच मग तिचं खरं महत्त्व माणसाला पटायला लागतं. त्या रात्री अनंताला त्या गोष्टीचा भास व्हायला लागला. आपली वस्तू दुसऱ्याच्या हाती जातेय हे स्पष्ट दिसत असताना ती नीट सांभाळून ठेवायचा-वाचविण्याचा प्रयत्न आपण का केला नाही ? याचं उत्तर अनंताला आता

गवसत नव्हतं.आता त्याच्या आत्म्याचा एक अंश त्याच्या पासून विलग झाला होता. आपण तो भाग त्याला फिरुन कधीही पुन्हा प्राप्त होणार नव्हता. आज निव्वळ स्मृती आळवीत बसणं हा शुध्द मूर्खपणा होय.

अशा प्रकारे अनंत विचार सागरात बुडालेला असतानाच पूर्व दिशेला प्रकाश उमलू लागला. तेव्हा मग त्याच्या ध्यानी आलं की आपल्याला घरी ज़ायचंय, आपण अद्याप कड्डुचीच्या स्टेशनावरच आहोत. जागचं उठून त्यानं ऐनापूरचा रस्ता धरला. वेड्यागत पायपीट करीत चालत राहिला. रात्रभरच्या जागरणानं डोळे लालीलाल झाले होते. अंगावरचे सारे कपडे मलीन होऊन गेले होते. कसं तरी रडत खडत उठत बसत चालत चालत संध्याकाळ होता होता तो घरी पोहोचला.

तेव्हा सुंदराबाई आतल्या खोलीत काही काम करीत होती. बाहेर कोणाच्या तरी पावलांची चाहूल कानावर पडल्यानं तिनं 'कोण ?' म्हणून विचारलं.

अनंत उत्तर देण्याच्या अवस्थेत नव्हता. तो काही बोललाही नाही. सुंदरव्वा झटकन उठून बाहेर आली आणि त्याला पाहून आश्चर्यानं विचारलं, 'कारे अनंत म्हणाला, 'होरोगेरीहून आलोय.-'

'तुम्ही मंडळी केव्हा निघालात ? तोंड उतरलेलं दिसतय तुझं - तू चांदूरला जाऊन नाही का आलास ?'

'मी परवा तिथनं निघालो-ते लोक तेव्हा अद्याप तिथंच होते.' तिनं आश्चर्यानं विचारलं, 'परवा निघालास म्हणतोस तर मग आज दिवसभर कुठं होतास ?

'कड्डुची स्टेशनवर होतो-'

'माहीत नाही बाबा- तू काय मनाला येईल तिकडं भटकत असतोस. अशानं काही मागं लागलं तर ?' मग थोडा वेळ गप्प राहून तिनं पुन्हा विचारलं, 'सारं कार्य व्यवस्थित पार पडलं ?'

अनंत उभा होता तिथंच मटकन खाली बसला. सुंदरव्वा घाबरुन त्याच्या जवळ जात म्हणाली, 'काय रे अनंता, तब्येत बरी नाही का ?' मग त्याच्या धोतराला हात लावीत म्हणाली, 'अरे, सारं धोतर भिजलंय ? नदीतनं येताना धोतर चांगलं वर खोवून नव्हतं का यायचं ? तसं येरव्ही देखील तुला थंड पाणी सोसत नाही-'

आपलं धोतर भिजलंय याचा आत्ता अनंताला पत्ता लागला; तो म्हणाला, 'हां !सारं धोतर भिजलंय...'

तेवढ्यात रात्रीच्या जेवणासाठी त्याचे वडील घरी आले. अनंताला पाहून, 'सारं काम ठीक - ठाक झालं ? ताराचा नवरा तुला कसा काय वाटला ? तू कधी आलास ?' त्यानं अंगातनं सदरा काढता काढता विचारलं. अनंतानं काही एक उत्तर दिलं नाही.

'कुठं हॉटेलमध्ये वगैरे खाऊन आला असेल!' म्हणत सुंदव्वानं नवऱ्याला जेवायसाठी हाक मारली.

रामप्पा म्हणाला, 'तू तिथं गेला होतास, तर आणखी चार दिवस राहिला असतास तर काय बिघडलं असतं? वीस वर्षाचा झालास, आता आम्ही तुला काय सांगणार?'

सुंदरव्वा मनाशी काही विचार करीत उद्गारली, 'लग्न आटोपल्यावर येताना घेऊन येईल अशा समजुतीनं मी गळ्यातला हार काढून दिला होता-' नवऱ्याच्या कानी पडावं म्हणून बुद्ध्याच ती हे म्हणाली होती. जेवण मध्येच थांबवीत रामप्पानं विचारलं, 'कोणाला?'

'ताराच्या गळ्यात काहीच नव्हतं, मल्लप्पाभाऊ म्हणाला होता, उद्या पाहायला येणार आहेत- एक चार दिवसांसाठी दे- म्हणून मग तारा जायला निघाली तेव्हां मी तिला दिला होता.' ती जरा घाबरतशी म्हणाली.

'गांवढळ मुलगी आहे, माहीत नाही कुठं टाकून देईल ते, चार दिवसात पाहा पार तोडून टाकील; कोण जाणे आता पुन्हा कधी परत करतील ते? आता तर ती आपल्या सासरीच राहील. एक एक वस्तू बनविता बनविता इथं जीव जायची वेळ येतेय!' रामप्पा रागारागानं म्हणाला.

'लग्नाच्या दुसऱ्याच दिवशी लग्नाला आलेल्यापैकी कोणातरी बरोबर धाडून देईन, असं एक जबाबदार व्यक्तीनं आश्वासन दिल्यावर मग मी तरी त्याला कसं नाही म्हणणार?'

'हा इकडे निघून आला, आता ते कोणाच्या हाती पाठविणार?'

सुंदरव्वा म्हणाली, 'लग्नानंतर सुंदरव्वानं अगदी आठवणीनं तो स्वत: बरोबर घेऊन गेली, तर चार-एक दिवसात मल्लप्पाच्या हाती धाडून देईल. पण जर का ती घेऊन यायला विसरली असेल तर मात्र लौकर मिळणं कठीण आहे...!'

'जाताना तू पोराला आठवण नव्हती करून द्यायचीस? पहिली गोष्ट म्हणजे तुला स्वत:ला अक्कल नाही- आणि आता पोराच्या नावावर खपवते आहेस...'

सुंदरव्वा त्याला तोडीत मध्येच म्हणाली, 'अहो, जायच्या वेळी याला मी आठवण करून दिली होती. कार्याच्या घाईगर्दीत नसेल त्यांच्या लक्षात राहिलं- पण यानं तर त्यांना आठवण करून देऊन येताना घेऊन यायला हवा होता ना? जसा काही म्हातारा झालाय- याला एवढी समज असू नये!'

'बस-पुरे झालं. आता गप्प बसा. जे व्हायचं ते होऊन गेलं आता ते पुन्हा पुन्हा उगाळून काय फायदा? पोराला उगाच वाईट वाटायचं-' असं म्हणत रामप्पानं तो विषय तिथंच संपविला.

गोष्ट पाहून दसपट जरी अधिक असती तरी वाईट वाटून घ्यायच्या मन:स्थितीत अनंत नव्हता. त्यानं पुढं अभ्यासात मन गुंतविण्याचा प्रयत्न केला- त्यातही त्याला

अपयश आलं. शेवटी परीक्षेला बसायची परवानगीच मिळाली नाही तसं त्यानं शाळेत जाणं सोडून दिलं. रामप्पानं पुन्हा एकवार जरा नेट लावून अभ्यास कर आणि परीक्षेला बस म्हणून म्हटलं, तसं अनंत 'उन्हाळ्याच्या सुट्टीनंतर बघेन' असं म्हणून गप्प बसला. उन्हाळ्याची सुट्टी संपली. दिवाळीची सुट्टीही येऊन ठेपली तरी अनंत काही शाळेत गेला नाही. अभ्यास सुरू केला नाही. जर मनाला आलंच तर तो दोन तीन तास दुकानावर जाऊन बसायचा, नाहीतर शेताकडे चक्कर टाकायचा. त्याचाही कंटाळा आला की, मित्रांच्या घरी जाऊन पत्ते कुटण्यात वा सोंगट्या खेळण्यात वेळ घालवायचा. या वेळी रामनवमीच्या दिवशी सात आठ मित्रांनी मिळून सोंगट्या (सारीपाट) खेळायचा कार्यक्रम ठरवून टाकला होता. हा कार्यक्रम पुढेही चालू राहिला. एक दिवस रात्री बारा वाजेपर्यंत सोंगट्या खेळून घरी येऊन झोपला. सकाळी शरत्कालीन गार वाऱ्यानं जाग आल्यावरही तो बिछान्यातल्या बिछान्यात लोळत पडला. तेव्हाही त्याला झोप येतच होती. अंग जड झालं होतं. आळसटल्या सारखं वाटत होतं; म्हणून पुन्हा चादर पांघरून घेऊन झोपायचा प्रयत्न करीत होता. तेवढ्यात त्याला भाऊ नाभिराज तिथं धावत आला आणि हर्षभरानं त्याच्या कानात कुजबुजला, 'तेरदाळच्या वहिनीला न्हाण आलंय...'

अनंतानं कपाळाला आठ्या घालीत, 'हट बाजूला, पुरे तुझी वटवट' म्हणत त्याला दूर ढकलून दिलं.

जवळच बाहेर उभी असलेली सुंदरव्वा म्हणाली, 'काय रे, असं रागवायला काय झालंय ? तुझ्या बायकोला न्हाण आलं म्हणून सांगितलं, तर मिठाईनं तोंड गोड करायचं सोडून उलट रागराग करतोयस होय ?'

यावर अनंतानं काही एक उत्तर दिलं नाही. जांभई देत आणि आळोखे पिळोखे काढीत उठून तो आत तोंड धुवायला गेला. सुंदरव्वा म्हणाला, 'जा बाळ नाभू, दुकानावरनं यांना बोलावून आण, म्हणावं: तेरदाळहून भटजी मिठाई घेऊन आलेत...' नंतर आलेल्या भटजींकडे वळून विचारलं, 'कधी झाली बाहेरची; मुहूर्त चांगला होता ना, गुरूजी ?'

'काल सकाळी झाली. मुहूर्त चांगला होता. सकाळी उठून दोन्ही वहिनी तांब्ये घेऊन जंगलात गेल्या होत्या. तिथं झाली असावीशी वाटतं. तिथून आल्यावर इंदिरा बाजूलाशी उभी राहिली, तेव्हा घरातल्या सर्वांना कळलं.'

'अजून लहान तर आहे- कोण जाणे पदर व्यवस्थित आला होता की नाही ते !'

'पदर असलेलीच साडी होती- हिरवी होती साडी ती. सारं काही व्यवस्थित होतं ताई. साऱ्यांना भारी आनंद झाला बरं का...' म्हणत भटजी तोंडात जमलेला पानाचा चोथा थुंकून आले.

'ते बसविणार आहेत की नाही ?'

'बसवतील. लग्न तर आपण मंडळींनी एका रात्रीत उरकून घेतलं, तेरदाळच्या या

ब्राह्मणाला वगळून असं कुठं होत असतं की काय ? नागप्पाला कशाला काही कमी आहे का ? बसविणारच.'

तेवढ्यात रामप्पा दुकानावरनं आला- दारातनंच विचारलं, 'कधी आलात गुरूजी ?'

'हे आत्ता सकाळच्या मोटरनं आलो.' नंतर स्वयंपाकघराकडे वळून म्हणाला, 'वाकप्पाना येताना यांना बरोबर घेऊन यायला बजावलंय- काही सल्लामसलत वगैरे करायची असेल.'

रामप्पानं बायकोला विचारलं, 'गुरूजींना काही चहा बिहा द्या- चहा करा नं ?'

'त्याची काय आवश्यकता आहे ? मी हा आत्ताच येता येता स्टेशनवर घेऊन आलोय ना.'

'घेऊन आलात म्हणून काय झालं, आणखी एकदा घेऊन जाऊदे. संकोच करायचं काही कारण नाही- आमच्याकडे चहा नेहमीच तयार असतो.'

सुंदरव्वानं घाईघाईनं दोन कप चहा आणून दोघांना दिला.

गुरूजी चहाचा कप हातात घेत म्हणाले, 'आम्ही संकोच केला, तर भाऊ सारंच आटोपलं की ! अहो रोज कोणा न कोणाकडे जेवायचं आमंत्रण असतं. संकोच केला तर रोज उपाशी रहायची पाळी यायची. आवश्यकता तर स्वत: मागून घेऊन आडवा हात मारीत असतो.'

'हं त्यात काय असं मोठसं ! आमच्या घरी तर उजाडल्या पासून दिवस मावळेपर्यंत चुलीवर चहासाठीचं आधण सदैव उकळतच असतं यांच्यासाठी. त्याची निकड असतेच मुळी...' सुंदरव्वानं गुरूजींच्या म्हणण्याला मध्येच खो देत स्वत:ची बढाई सांगत म्हटले.

रामप्पानं चहा घेता घेता विचारलं, 'अनंत उठला का ?' तेवढ्यात अनंत बाहेर आला तसं तो त्याला म्हणाला, 'जा बाळ, जरा दुकानावर जा. तिथं लेकरू एकटंच आहे. मी ही हा तुझ्या पाठोपाठ आलोच...'

अनंत दुकानाकडे गेला. रामप्पानं सुनबाईला मासिकपाळी कधी सुरू झाली ? मुहूर्त कसा होता ? वगैरे सर्व गोष्टी विचारून घेतल्या. गुरूजींनी सर्व गोष्टींचा विस्तारपूर्वक खुलासा केला. शेवटी कप खाली टेवत विचारलं, 'त्यांचा तिला न्हाणवली म्हणून बसविण्याचा विचार आहे की नाही ?'

'ते सारं आपण तिथं आल्यावर विचार विनिमय करून नक्की केलं जाईल.'

'मीच कशाला यायला हवं, बसवायला हवं- त्यात कसली काय अडचण आहे ?'

अशा प्रकारे बोलणं चालणं करून रामप्पा भटजींना बरोबर घेऊन दुकानावर गेला. अनंत घरी परत आला आणि आंघोळ पांघोळ आटोपून रोजच्यासारखा मित्रांना भेटायसाठी घराबाहेर पडला. तेवढ्यात त्याचा एक दोस्त समोरून येताना दिसला. त्याच्या हातात काहीसं होतं, ते त्यानं पाठीशी लपवलं होतं. अनंतानं, 'तुझ्या हातात काय आहे रे..

काय लपविलंयस ते ?' असं नुसतं कुठं विचारलं न विचारलं तोच त्यानं झटकन् पुढं होत त्याच्या अंगावर रंग उडवला आणि खो खो करून खिदळायला लागला. अनंतानं डोक्यावरची टोपी काढीत झाडीत म्हटलं, 'काय केलंस तू हे ?'

'काय केलंस हे ? पेढे खिलवलेस तू आम्हाला ?'

'तुम्हा सर्वांना पेढे हवेत पण....' येवढ्यावरच बोलणं थांबवीत अनंतानं चटकन आपली जीभ चावली.

अनंताच्या मनातलं न समजून जोरानं खिदळत दोस्त म्हणाला, 'आम्हाला पेढे आणि तुला घरात बायको मिळणार... बायको येणाराय ना आता घरात ?'

'मोठी आलीय बायको !'

'पण माझी गोष्ट वेगळी आहे.'

'ते सारं चार दिवसातच कळेल म्हणा- उद्या बायको येऊ दे, घरा बाहेर पडलास तर माझं नाव नाही... आता तर आपला सोंगट्यांचा कंपू फुटलाच म्हणून समज.'

'ते सारं तुला नंतर कळेल-' अनंतानं हताशपणे उत्तर दिलं.

तरीही त्याच्या मित्रानं त्याचा हात आनंदानं दाबीत आणि त्याला ओढून नेत म्हटलं, 'बरं बरं राहूं दे- चल आता, आतापासूनच घरात दडी मारून बसू नकोस.'

'हे रंगलेले कपडे तर बदलून येऊ दे-'

'कशाला ते ? लोकांनाही जरा कळू दे की- का दुसरे कपडेही रंगानं माखून घ्यायचेत ?'

दोन्ही मित्र बरोबर जायला निघाले. तिथं दरवाजाशी येत लेकाच्या अंगावर रंग उडविला गेल्याचं पाहून आनंदभरानं डोळे विस्फारीत सुंदरव्वा म्हणाली, 'अनंता, जेवायला जरा लौकर ये. गुरूजींकडे पहावं लागेल. हेही कदाचित गुरूजींबरोबर तेरदाळला जातील. तू घरी राहिला नाहीस म्हणून रागावतील.तिकडेच बसून राहून नकोस. लौकर घरी ये.'

# 18

तिकडे तारा ?

तारक्काच्या नव्या सासरकडच्यांचं आडनाव 'अकिवाटे' होतं. अकिवाटे मंडळी अप्पण्णाच्या लग्नासाठी तीन दिवसाकरिता गावात आली होती. लग्नासाठी आलेले इष्टमित्र गेल्यावर ती मंडळी पुन्हा मळ्यातल्या घरी परत गेली. मुली समवेत चार दिवस राहून परत जावं, अशा विचारानं रत्नव्वाही होरीगेरीमध्ये राहिली होती. रत्नव्वानं मुलीचं घर मोठ्या प्रेमानं व्यवस्थित लावून दिलं. पोरीला तिच्या हाताच्या दोनचार गोष्टी समजावून सांगितल्या. अम्मव्वालाही सुनेला जीव लावण्याची विनंती केली. आधीच्या सासूची थोडीबहुत निंदाही तिच्याकडे केली. जावयालाही दोन गोष्टी सांगून ती आपल्या गावी निघून गेली.

एक दिवस तिन्ही सांजचं अम्मव्वानं सुनेला जवळ बसवून म्हटलं, 'पोरी, तूच या घराची मालकीण आहेस; तुलाच सारं काही संभाळावं लागेल. घरात जे काही धान्यधुन्य येईल, ते नीट निवडून पाखडून साठवावं लागेल. माझे डोळे तर काही कामाचे नाहीत-मला अजिबात दिसत नाही. तुझ्या हातानंच हे घर उभं राहणार आहे. मात्र एक ध्यानात ठेव: माझ्या मुलाला बायकांनी परपुरूषाशी बोललेलं मुळीच खपत नाही. बस् बाकी इतर काही नाही. खायला प्यायला, कपड्यालत्त्याच्या वगैरे या घरात कशाची काही कसली कमतरता नाही.'

तारक्का यावर काही बोलली नाही- फक्त सासूकडे तिनं अर्थपूर्ण दृष्टीनं पाहिलं. सासू पुढं म्हणाली, 'आधीचीचा सत्यनाश झाला! म्हणून माझा लेक इतके दिवस बायकोविना राहिला. ती जर व्यवस्थित राहती तर आता पावेतो मी चारपाच नातू-नातींचं तोंड पाहती.' सुरूवातीला रूक्ष वाटणारा स्वर करूणेनं भरून आल्यासारखा झाला. तारक्कालाही सासू सांगत असलेल्या या गोष्टींविषयी कुतुहल वाटायला लागले होते. नंतर ती सासूच्या जवळ आणखी सरकून बसली. तिनं विनयानं विचारलं, 'काय झालं होतं, आई ? त्याना जाऊन किती वर्ष झालीत ?' सासू आता अगदी निस्संकोच मनानं सारं काही घडाघडा सांगायला लागली- म्हणाली, 'ती मेलीय कुठं, केली असती तर किमान एक चिंता तर मिटती- माझा लेक मग दुसरं लग्न तर करून घेता. ही परमानही गावची मुलगी आहे. मुलगी चांगली आहे असं समजून, चार पाच वर्षं नीट शोध

घेऊन लग्न करून घरात आणली. तेव्हा आम्ही मंडळी गावातच राहत असू. त्या काळात तो चांडाळ सत्या माझ्या मुलाकडे सारखा येत जात असायचा. मीही आपल्या मुलाला कोणी सख्खा भाऊ नाहीए, अशा लोकांच्या सहवासात राहिल्यानं त्यालाही तेवढाच जवळचा आधार होईल, अशा विचारानं त्याला खूप खाऊ पिऊ घालायची. कल्पना नाही त्यानं हिला फशी पाडलं, की हिनं त्याला देवाला ठाऊक! संध्याकाळची वेळ आहे- उगाच स्वत:च्या डोळ्यांनी पाहिल्याशिवाय खोटं कशाला बोलू? एक दिवस एक गोष्ट घडली. माझा लेक मळ्यातनं घरी येत होता. बागेत जाताजाता ही न्याहारीची टोपली घेऊन सत्याच्या घरी जाऊन बसली होती. हे समजताच हा संतापानं लालीलाल होऊन घरी आला. 'तिला आज जिवे मारतो-' म्हणत कुऱ्हाड घेऊन जायला निघाला. विचारलं तर हा काही एक सांगायलाच तयार नव्हता. चार सहा जण त्याला समजावता समजावता थकले. त्याच दिवशी आम्ही तिला तिच्या माहेरी पोहोचती करून आलो. तेव्हांपासून आम्ही इकडे आणि ती तिकडे. वर्षभरानंतर तिचे आईबाप इथं आले आणि माझ्या हातापाया पडून लग्नात हुंडा-मानपान-करणी म्हणून दिलं होतं ते घेऊन गेले. मुलगा ते परत करायला मना करीत होता- पण लोकांनी त्याची कशीबशी समजूत काढून ते परत द्यायला लावलं. आणि बाईमाणसाची चीज वस्तू कशासाठी उगाच ठेवून घ्यायची! आता ती कुरूंदवाडमध्ये कोणाबरोबर तरी राहतेय झालं.'

तारानं विचारलं, 'मुलबाळ वगैरे काही झालं होतं का?'

'तिला मुलं कोठून होणार, न्हाण आलेल्याला कुठं वर्ष होतं न होतं तो हे सारे गुण उधळून मोकळी झाली ना! हिच्या नंतर दुसरी कर म्हटलं तर त्याला त्याची तयारी नव्हती. मोठा जिद्दी आहे. डोकं फिरावू आहे. माझा मुलगा आहे म्हणून त्याच्या विषयीचं मी उगाच काही लपवून ठेवणार नाही. दुसरी बायको कर म्हणून म्हटलं की हा लागलीच भडकून उठायचा. संतापायचा. माझ्या सासूसासऱ्याच्या पुण्याईनं तू लाभलीस. भाऊबंद वगैरे आहेत, पण सारे मत्सरी- आमच्यावर खार खाणारे. उगाचच जळणारे! त्या लोकांनी आपण होऊन पुढाकार घेऊन या बाबतीत काही करणं तर राहिलंच, उलट आम्ही जिथं काही जुळवायला- करकायला म्हणून जावं, तिथं हे त्यांचे कान फुंकून यायचे. या वेळीच ते तुम्हा लोकांपर्यंत कसे पोहोचले नाहीत कोण जाणे! हां, कदाचित यासाठी त्याना पुरेसा वेळ मिळाला नसणार- चार दिवसातच गोष्ट नक्की झाली आणि लग्नही झालं.

ताराला हा विषय नवीन होता. नव्या घरी प्रवेश केल्यावर मुलींना बऱ्याचशा नवीन गोष्टींचा शोध लागतो- बऱ्याचशा नवीन गोष्टी माहीत होतात. कित्येक वेळा या गोष्टी न उमगल्यानं त्यांच्या मनात चुकीचे ग्रह निर्माण होतात आणि त्या पायी चुकीची पावलं उचलली जातात. कित्येक प्रकारच्या चुकीच्या कल्पनांची शिकार बनल्याने

बऱ्याचशा मुलींचं फुलासारखं कोमल जीवन नष्ट होऊन जातं. घरात नवी सून आली की वडीलधाऱ्यांनी तिला या नव्या घराचे रीतिरिवाज आणि जवळच्या नात्यागोत्यातल्या मंडळींच्या स्वभाव विशेषाचा तिला परिचय करून देणं खरं तर अगत्याचं असतं- पण असं काही करायची खेडेगावातनं पध्दत नाही; म्हणून मुलींना स्वत:लाच पाचसहा वर्ष बारकाईनं निरीक्षण करावं लागतं आणि सासूच्या तोंडाकडे पाहावं लागतं.

तारक्का अशा बाबतीत आपल्या समवयस्क मुलीच्या मानानं जरा जास्तच हुषार होती- समजदार होती. चिम्मव्वाच्या हाताखाली दिवस काढावे लागल्यामुळे बहुदा हे शहाणपण तिला प्राप्त झाले असावे. तरीही या नव्या नवऱ्याच्या बाबतीत काही अधिक जाणून घ्यायची तिला इच्छा झाली म्हणून तिनं पुढं विचारलं, 'हो, आपल्याला डोळ्यांनी दिसत नाही, तर मग घरातलं स्वयंपाकपाणी वगैरे कोण करायचं ?'

'मी आपली तशीच अंदाजा अंदाजानं काही तरी शिजवायची झालं. कधी कोणी शेजारीण पाजारीण येऊन भाकऱ्या थापून द्यायची- कधी कधी तो स्वत:च काही तरी करून घ्यायचा- पण तो इथं मळ्यात कुठं रहायचा ?'

तारक्कानं मध्येच प्रश्न केला, 'मळ्यात नव्हते राहत, तर मग कुठं रहायचे ?'

'रात्रंदिवस गावातच भटकत असायचा- घराकडे त्याचं मुळी लक्षच कुठं होतं ? कधी केव्हातरी मळ्यात जेवायला यायचा, एरव्ही चार चार दिवस त्याचा घरात पत्ता नसायचा- त्याची वाट पाहून पाहून इकडे माझे प्राण कंठाशी येत.

तारक्काला वाटलं की सासू आपल्यापासून काहीतरी लपवून ठेवते आहे. तलावाचं पाणी वरवर कितीही स्वच्छ दिसत असलं तरी तळाला घाणगदळ आहे की नाही हे पाहण्यासाठी त्यात एक दगड भिरकावून देऊन पाहायच्या इच्छेनं तारक्कानं विचारलं. 'आणि त्यानं जेवण खाणं ?'

'त्याला जेवायला खायला घालणाऱ्यांना काय तोटा...?' असं म्हणत अम्मव्वानं बोलणं तिथंच थांबवीत जीभ चावली. अंधारात कदाचित ते तारक्काच्या नजरेस पडलं नसणार.

नव्या लग्नानंतर अप्पण्णानं मळ्यातल्या कामकाजाकडे लक्ष द्यायला सुरूवात केली. तो सदैव नोकरांसमवेत कामात गढलेला असायचा, गावाकडे कधी साधा फिरकायचा देखील नाही. एका माणसाला कामावरून कमी करून त्याचं काम तो स्वत: करायला लागला. घर प्रपंचासाठी आवश्यक असलेलं सामानसुमान गावात फेरी टाकणाऱ्या कोणा नोकराचाकराकरवी मागवून घ्यायचा. काही दिवस झाले त्यानं चहा सोडला होता. तारक्का चहा पीत असे म्हणून त्यानं घरात चहासाखर आणवून ठेविली होती. आता दोन्ही वेळो जेवायला अगदी वक्तशीर यायला लागला. अधून मधून काम टाकून घरी यायचा- बायकोबरोबर हास्य विनोद... जरा थट्टामस्करी करून फिरून कामावर परत जायचा. नवऱ्याची मर्जी राखण्यासाठी तारक्काही त्याच्या बरोबर हास्य विनोदात भाग

घ्यायची- त्याच्याशी गप्पा मारायची. कधी कधी अप्पण्णा आपल्या आईला म्हणायचा: 'आता तू चुलीपाशी जात जाऊ नकोस- तिथं जाऊन उगाचच सांडलवंड करत्येस -त्या पेक्षा ती घर कसं सांभाळते इकडे जरा लक्ष ठेव.'

'हां बाळा, तू चांगलं पुण्य केलं होतंस ते अखेर फळाला आलं. इतके दिवस वाट पाहिल्याचं सार्थक झालं- चांगली सून मिळाली. मी मेली कशाला पाहू आता तोंड त्या चुलखंडाचं ? ती तिन्ही त्रिकाळ जे व्यवस्थित खायला करून घातले ते खाऊन आरामात पडून राहीन की'

घरात दोन नोकर होते. बारामहिने अन् अठरा काळ बागेत कामाची ही थडी लागलेली असायची; त्यामुळे कामासाठी नोकराचाकरांची नेहमीच गरज भासायची. म्हणून मग तारक्काला पाच सहा गडी माणसांसाठी स्वयंपाक करायलाच लागायचा. या पूर्वी गडीमाणसं आपआपल्या घरी जेवत; त्यामुळे त्यांना अधिक मजुरी द्यावी लागे. इतकंच नव्हे तर ते जेवायला घरी गेले की इकडं कामं अडून राहायची. या सर्व कटकटीतून स्वत:ची सोडवणूक करण्यासाठी अप्पण्णानं नोकरांना इथं आमच्या घरीच जेवत जा म्हणून सांगितलं. या सर्वांचं जेवण, घरातल्या गाईम्हशींकडे लक्ष पुरविणं- या साऱ्या कामात तारक्काला वेळेचं भानच उरत नसे. इथं आल्यावर तारक्कानं म्हशींची धार काढणं शिकून घेतलं होतं. सात आठ दिवस तिथं राहिल्यावर तारक्का उमजून चुकली की तिच्या नवऱ्याला भाऊबंदांविषयी विशेषसं अगत्य वगैरे नाहीए. म्हणून ती या मंडळींशी फार थोडं बोलायची, पण प्रेमानं. सुरूवातीला नोकर चाकर बेधडक घरात शिरत पण आता जेवायला ते अंगणातच बसत. फक्त अप्पण्णा तेवढा आत बसायचा. आरंभी अप्पण्णा म्हणाला देखील की, 'अरे असं बाहेर काय बसता- आत घरात कां नाही येत ?'

तेव्हां नोकर आपआपसात एकमेकांच्या तोंडाकडे पाहत मनातल्या मनात हसले आणि म्हणाले, 'आत कशाला भाऊ, इथंच बरं आहे की !'

तसं त्यांच्या हसण्याला फटकारीत तिथंच बसलेल्या अम्मव्वानं विचारलं, 'कारे हसायला काय झालं ?'

हसत हसतच एकानं विचारलं, 'कुठं काय, तुम्हाला कसं काय दिसलं आम्ही हसतोय ते ?'

'सासूला डोळ्यानं दिसत नाही या विचारानं, सून आणखी काही करायला लागली तर-' असं म्हणून गड्यानं आपलं बोलणं आवरलं. दुसऱ्यानं विचारलं, 'सगळ्या तशाच असतात होय ?' आणि चटकन आपली जीभ चावत गप्प बसला. ते अशा थाटात बोलत की ते काय म्हणतायत ते वाढणारणीच्या बिल्कुल ध्यानी येऊ नये. परंतु तारक्का सारं समजून उमजून जणू काही आपल्याला काही समजलंच नाही अशा थाटात हसत सर्वांना जेवायला वाढायची. तिचं ते हसणं त्याना अगदी सहज निरागस असं वाटायचं.

तारक्का आपला आणि गडी माणसांचा स्वयंपाक वेगवेगळा असा करायची नाही. सर्वांना सारखंच जेवण मिळायचं. त्या लोकांचं जेवण काही दिवस पाहिल्यावर अप्पण्णाला वाटलं की हिला बहुदा नोकराचाकरांसाठी कसा स्वयंपाक करायचा ते येत नसणार-म्हणून मग त्यानं तिला सूचना करीत म्हटलं, 'त्यांच्यासाठी वेगळा स्वयंपाक करायला हवा. आपण जेवतो तेच त्यांना वाढून कसं चालेल ? त्याना जाड्याभरड्या भाकरी आणि मठ्ठा वगैरे करून वाढायला हव्यात. कष्टाची कामं करून ते येतात- भात खाऊन पोट कसं भरेल त्यांचं ?' पण ती पहिल्यासारखाच स्वयंपाक करीत राहिली. वेगवेगळा स्वयंपाक शिजविण्याचा तिला कंटाळा होता अशातला भाग नव्हता- पण तिला वाटायचं की मेल्यावर कोण हे सारं उरावर बांधून घेऊन जाणार आहे ? नोकरांसाठी वेगळं आणि घरच्यासाठी वेगळं, असा पंक्तिप्रपंच करून कशाला उगा पाप माथी घ्यायचं ? सर्वांकडे समभावानं पाहिलं पाहिजे. जोवर जिवंत आहोत तोवर लोकांचं भलेपण कमवावं. आपल्या मागेही लोकांनी आपल्याविषयी भलंच बोलावं. भलेपणा घेऊनच हे जग सोडावं. एवढ्यासाठी तिनं नवऱ्याचं बोलणं कानाआड टाकलं. अप्पण्णाही घरात लागणारं आवश्यक ते सामान सुमान आणवून द्यायचा. दुसऱ्या बायकोचं मन दुखवायची त्याची इच्छा नव्हती.

एक दिवस सकाळी ती आत स्वयंपाक करीत होती. सिध्दा नावाचा गडी विहिरीवर रहाट चालवीत होता- तेवढ्यात पाचसहा वर्षांची एक मुलगी आत घरात जायला लागली-त्या मुलीच्या पावलांची चाहूल कानी पडताच तारक्का वळून पाहणार तोच कोणी तरी त्या मुलीला उद्देशून, आत तुझा बाप नाहीए ग- असं म्हटलेलं तिनं ऐकलं.

आलेल्या मुलीनं थबकून विचारलं, 'हो, कुठं गेलाय ?' आवाज मोठा लोभस होता.

तेवढ्यात विहिरीवर रहाट चालवता चालवता सिध्दा म्हणाला, 'तिची आई आता इथं कशाला येईल. ही लहानी कोणाबरोबर आलीय ?'

'कोणाबरोबर तरी आली असणार झालं !'

'मुलीला कुठं असं पाठवीत असतात हो ?' असं म्हणत आत येत तारक्काच्या चुलत सासूनं थट्टेच्या स्वरात म्हटलं, 'तारा, बघ तुझी मुलगी आलीय.'

तारक्काला समजेना की ही आजवर आपल्यापासून दडवून ठेवलेली एखादी गोष्ट आहे की चुलत सासूनं केलेला तो निव्वळ विनोद आहे. बाहेर चाललेलं संभाषण ऐकून तिनं आश्चर्यानं विचारालं, 'कोणाची मुलगी ?'

'तुझीच मुलगी, वाटतं की अद्याप तुला या कशाचा काही पत्ता नाहीए ?' तारक्का यावर थोडावेळ गप्प बसली. ती इथं नवऱ्याकडे नांदायला आली तेव्हा पासून आपल्या नवऱ्याच्या आणि या घराच्या बाबतीत रोजच काही ना काही नवं तिला माहीत होत होतं. म्हणून ती कुठल्याही गोष्टीनं घाबरून न जाता आनंदानं जे येईल त्याचा स्वीकार

करीत होती. स्वागत करीत होती. तिच्या पुढं त्याविना दुसरा काही मार्गच नव्हता.

'ठीक आहे. मुलगी आहे तर ती काय डोक्यावर कोसळणार आहे!' ती चुलत सासूला म्हणाली.

तसं चुलत सासू उमजली की मुलीच्या बाबतीत काही एक कल्पना नसल्यामुळं ही असलं काही तरी बोलतेय झालं. म्हणून मग ती म्हणाली, 'आमच्या स्वप्नात देखील नव्हतं की अप्पू दुसरी करील - मुलगा हाताबाहेर गेला असं समजून आईनं त्याच्या विषयीची आशा कधीच सोडून दिली होती.'

तारानं विचारलं: 'का ?'

या प्रश्नांचीच जणू ती वाट पाहत होती. ती पुढं म्हणाली, 'गावात एक बाई ठेवलीय त्यानं, तिचं नाव आहे सोना. अवदसेच्या पायी पोराच्या आयुष्याचं पार वाटोळं झालं. गावात चार लोकांशी वैर निर्माण झालं. स्वत:च्या घराचा पार इस्कोट झाला. तिचा खर्च चालवणं अंगावर तर आलंच आलं -आणि वर शिवाय स्वत:ला विकतची बिमारी लावून घेतली. जे काही कमवलं ते सारं डॉक्टरांच्या खिशात गेलं. इतकं झालं तरी दुसऱ्या लग्नाचं एवढं सुध्दा मनावर घेतलं नाही. आताच कुठून शहाणपण सुचलं कोण जाणे! तुला पाहिल्याबरोबर लग्नाला राजी झाला. मला वाटतं आता तो तिकडं तिच्याकडे जात बित नसणार- हो ना ?'

तारका शांतपणे म्हणाली, 'मला काही कल्पना नाही - भाग्यात जे काही लिहिलं असेल, ते होणं अटळ आहे... ते होणारच. आणखी कोणी असेल तर ती आनंदात राहो.'

हे बोलणं ऐकून तारकाची चुलत सासू चांगलीच वैतागली. खरं तर काहीही करून हे घर फोडावं अशा विचारानंच ती हे विष पेरू पाहत हेती- पण ताराचं बोलणं ऐकताच तिचे सारे मनोरे पार ढासळले. म्हणून मग काहीशा छद्मीपणानं ती म्हणाली, 'आता तर हे असं म्हणणं भागच आहे. हातातला घास खाली सांडला की तो उचलून साफसूफ करूनच खावा लागतो. आजवर बागेत तर सोनाचंच राज्य होतं- त्या काळतोंडीनं तर आम्हा लोकांनाही सदैव दोन हात दूरच ठेवलं होतं. काय बडेजाव... काय थाट होता तिचा. आता मेली कुठं तोंड काळं करून दडी मारून बसलीय झालं!'

'तोंड लपवायची काय जरूर आहे ? येत जात राहायला हवं तिनं.'

'काय झालं काय तुला हे ? अग काय वेडबिड का लागलंय तुला ? तुझ्याशी लग्न झाल्यामुळं ती या घरातनं एकदाची निघाली. आता तिचं या घरात कसलं काय काम आहे ? हळूच आमच्या पोराला फूस लावून स्वत:च्या नावावर एका नांगराखाली येऊ शकेल अशी जमीन करून घेऊ पाहत होती.'

'यांना जर ती एवढी आवडतेय तर तिच्यासाठी यांनी एवढंही करू नये होय ? तिलाही

काही आधार-आसरा हवाच की नको..? या पुरूषांचा काय भरवसा? या पुढे आता तिला थोडंच कोणाशी लग्न करता येणार आहे? नाही म्हटलं तरी आज गेली सात आठ वर्ष ती यांच्या बरोबर राहिली आहे...'

तारक्काच्या या बोलण्याकडे तिच्या चुलत सासूचं लक्ष नव्हतं. ती पुढं म्हणायला लागली, 'हो. ते सारं हातचं निसटलंय म्हणून तर ती हे असं वागायला लागलीय. काल तिनं कोणाच्या तरी हाती निरोप धाडला होता - पण अप्पू गेला नाही. तुझ्याशी लग्न झाल्या पासून तो तिकडे साधा ढुंकला देखील नाही. तुला पहिल्यांदा पाहून आल्यावर एकदा या दोघात खूप जोरदार भांडण झालं होतं. अप्पूनं सरळ सांगून टाकलं तिला-तुझ्या नाकावर टिचून तुझ्याहून सुंदर बायको आणू शकेन मी म्हणून! तेव्हां पासून त्यानं तिचं तोंड देखील पाहिलं नाही.' तेवढ्यात दुरूनशी अम्मव्वा येताना दिसली, तसं ती तिथून सटकायला पाहू लागली.

त्यावर सिध्दा गडी म्हणाला, 'कुठं आमच्या मालकीणबाईंचं रूप आणि कुठं तिचं! ती यांच्या पासंगाला तरी येईल काय?'

'तीही एकेकाळी सुंदर होती. तुझ्या मालकांच्या सावलीला असताना तिला कुठल्या गोष्टीची कमतरता होती. आता ती पूर्वी सारखी राहिली नाही- झालंच तर वयही उतरणीला लागलंय. काही काळापूर्वी ती पुण्याकडेही गेली होती. तिकडच्या कित्येक लोकांना बरबाद करून इकडे आली. इथल्या लोकांचाही सत्यानाश केला. माहीत नाही ही मुलगी चुकून कशी तिच्या पोटी जन्माला आली..! काकी, तुम्हाला वाटतं तिला मुलंबाळं होऊ शकली असती म्हणून? सिध्दानं जणू काय आपल्याला काही माहितच नाही असं दर्शवीत विचारलं. त्याला अधिक काही पुढं बोलू नकोस म्हणून तिनं खुणावलं. पण ते त्याच्या ध्यानी आलं नाही. 'तर मग आता आमच्या धन्याना तरी मूलबाळ कसं होणार हो?' त्यानं शांतपणे आपल्याला जे काही बोलायचं होतं ते बोलून टाकलंच. अम्मव्वाच्या हात धरून मुलीला येताना पाहून त्यानं विषय बदलण्याच्या उद्देशानं विचारलं, 'अरे ती लहानी कुठं गेलीय?' मग सहज समोर पाहिल्यासारखं करीत म्हणाला: 'आहो! ही तर काय आपल्या आजीचा हात धरून इकडेच येतेय की!'

तारक्काला सारं काही कळून चुकलं. मनातल्या मनात तिनं भले पुरूषजातीला शिव्यांची लाखोली वाहिली असेल पण वरकणी तसं काही दर्शविलं नाही- की काही व्यक्त केलं नाही. पहिल्यासारखीच शांत, प्रसन्न राहिली.

एक दिवस मल्लप्पा तिला घेऊन जायला म्हणून आला. त्यानं जावयाला विचारलं, 'चार दिवसासाठी हिला घेऊन जाऊ का?' अप्पण्णा तारक्काच्या समोरच त्याच्याकडे पाहत म्हणाला, 'तिलाच विचारा. येत असेल तर घेऊन जा.' नवऱ्याच्या मनात काय आहे ते ओळखून तारक्का म्हणाली, 'बाबा, घरात स्वयंपाकपाणी सारं पाहावं लागतं,

सासूबाईना नीट दिसत नाही - खेरीज दोनतीन गडीमाणसंही दुपारची इथं जेवायला असतात.

मल्ल हसला आणि मनाशी विचार करायला लागला: 'पोरीला आता घर प्रपंचात गोडी वाटायला लागले दिसत्येय!' मग घरी परतल्यावर बायकोला म्हणाला, 'आता ती कुठची यायला? आता संसारात तिचं मन छान रमलंय. घरात गाईम्हशी आहेत. दुधादह्याचं पाहावं लागतं- नोकर चाकर आहेत, पोरगी आता कसची येऊ शकतेय?'

मुलगी आली नाही म्हणून हिरमुसली होण्याऐवजी तिच्या सुखी संसाराचं वृत्त ऐकून रत्नव्वा उलट आनंदली आणि जरा अधिक सुखावून म्हणाली, 'आली नाही म्हणून काही हरकत नाही. आपणच फराळा आराळाचं काहीतरी गोडधोड करून घेऊन तिला भेटून येऊ.'

काही दिवसांनी ती लहानगी मुलगी चंपा- जी नात्यानं तारक्काची मुलगी लागत होती, बागेत आली. तारक्कानं तिला जवळ बोलावून आपल्या वडिलांनी चांदूरहून आणलेल्या लाडवातले लाडू तिला खायला दिले. परंतु त्या पोरीनं लाडवांना तोंड लावलं नाही - तसेच हातात घेऊन उभी राहिली. तारक्कानं दोनदा तिला खा म्हणून म्हटलं तरी तिनं खाल्लं नाही- तारक्कानं फारच आग्रह केला तसं नाईलाजानं म्हणाली, 'घरी घेऊन जाईन...'

तारा म्हणाली, 'घरी घेऊन जायला आणखी देते- तू हे खाऊन टाक.' पण पोरीनं तरीही ते खाल्ले नाहीत. जवळच बसलेली अम्मव्वा म्हणाली, 'तिच्या आईनं तिला मना केलं असणार- म्हणून लहानी खात नाहीए.' मग चंपाला स्वत: जवळ बोलावून विचारलं, 'का ग आमच्या घरचं काही खायचं नाही म्हणून सांगितलंय आईनं?' पोरीनं मान हलवीत 'नाही' म्हणून म्हटलं.

तारानं आणखी नेट धरून विचारलं, 'तर मग खात का नाही?' पोरगी गप्पशी उभी राहिली. तारानं अंमळ विचार करीत थोडं थबकून विचारलं, 'मी दिलेलं काही खायला मना केलंय होय ग?'

'हूं' म्हणत चंपानं डोकं हलवलं. तारक्का क्षणभर दु:खी झाली. तिचे डोळे टचकन पाणवले.

तिच्या मनात पुन: पुन्हा एक गोष्ट यायला लागली: एवढ्याशा ह्या चिमुरडीला विष घालून ते पाप या जन्मात मी कुठं फेडीन? हाच एक विचार सतत तीनचार दिवस तिचं मन चक्रावून टाकीत होता. तिला उमजेना की ह्या बाईच्या मनात आपल्या विषयी ही अशी दुष्ट आणि घाणेरडी शंका आली तरी कशी? आपण तर या पोरीला मायेनं-प्रेमानंच वागवत आलो आहोत. एक वात्सल्य वा ममतेच्या विना तिच्याविषयी दुसरा कुठलाही भाव आपल्या मनात कधी डोकावला देखील नाही.

हल्ली अप्पण्णा मळ्यात दमून भागून रात्री लौकर झोपायचा. त्याचं जेवण आटोपे

आटोपे पर्यंत तारक्का त्याचं अंथरूण पांघरूण व्यवस्थित, घालून ठेवायची, त्या आधी अंगणातल्या खाटेवर सासूसाठी बिछाना घालून ठेवायची. अम्मव्वा सूर्य मावळेपर्यंत आपलं जेवण उरकून तिथं जाऊन पडायची. तारक्का घरातली मागची सारी आवरा आवर उरकून नवऱ्यापाशी जाऊन झोपायची. हा तिचा रोजचा कार्यक्रम होता. ज्या दिवशी खूप थकलेली असे त्या दिवशी ती नवऱ्याची झोपमोड न होईल याची काळजी घ्यायची. कधी कधी तो जागाच असायचा- अशावेळी तो तिच्याशी प्रेमानं गप्पा गोष्टी करता करता तिला आपले पाय दाबून द्यायला सांगायचा. कां कोण जाणे तारक्काशी आत्मीयतेनं बोलताना त्याला भारी अवघडल्यासारखे होऊन जाई- संकोच वाटत राही. कधी कधी पाय दाबीत बसलेल्या तारक्का विषयीचं आपलं प्रेम व्यक्त करताना त्याच्या तोंडून सहज निघून जायचं: 'चार आठ वर्षं वाट पाहिल्याचं सार्थक झालं- चांगलंच फळ लाभलं!'

तारक्का पाय दाबता दाबता म्हणायची, 'चांगलंच झालं ना!'

त्यावर तो म्हणायचा, 'तू आली नव्हतीस तोवर, या बागेत एक एक तास मला एक एका वर्षासारखा वाटायचा बघ-'

तारक्काला नवऱ्याच्या एकूण चालचलवणुकीच्या स्मरणासरशी मनोमन घृणा वाटायची खरी-पण तिनं आपल्या ओठावरचं हसू कधी मावळू दिलं नाही. एक दिवस तिच्या ओठावर तरळणाऱ्या त्या हास्याकडे पाहत तो म्हणाला, 'ती चंपा पोरगी किती सुरेख आहे नाही? तिला पाहिलं की आतून प्रेमाचं नुसतं भरतं येतं- पोर मोठी लाघवी आहे, हुशार आहे. तिच्या आईनं नको म्हणून तिला बजावलेलं असतानाही ती इथं पळून येते.' तो पुढं आणखी काही बोलू पाहत होता- पण एका अनामिक संकोचामुळे त्याच्या तोंडून शब्दच फुटेना. तो एकाएकी गप्प झाला.

त्याच्या त्या संकोचावर पांघरूण घालीत तारक्का म्हणाली, 'मला माहीत आहे-ती तुमचीच मुलगी आहे-'

'हां माहीत झाल्यावाचून कसं राहील? आज ना उद्या हे माहीत होणारच होतं-माहीत झालंच असतं. घागरीचं तोंड बंद करता येतं- पण लोकांचं तोंड थोडंच कुठं बंद करता येत असतं? जरा थांबून पुन्हा म्हणाला, 'सोनिया फार सुंदर आहे.

ही पोरगी म्हणजे आईची निव्वळ प्रतिमाच आहे- अगदी तश्शी!'

तारक्कानं जरा आणखी जवळ सरकत नवऱ्याच्या कृष्णसर्पागत हातावरून हळुवारपणे हात फिरवीत वरकरणी म्हटलं, 'का आता काय झालं? तिलाही येणं जाणं चालू ठेवायला सांगावं- तिला इकडे यायसाठी निरोप धाडावा.'

'कसं शक्य आहे ते? तुला खरंच का वाटतं हे असं? आवडेल तुला तिनं आलेलं?' त्यानं विनवणीच्या स्वरात तिला विचारलं.

'आवडणार का नाही, जी तुम्हाला आवडते ती मला का नाही आवडणार?'

'तर मग उद्या बोलवूया ? ऐकलं की काल ती सिध्दाच्या पुढ्यात रडत होती.'

'सकाळी उठल्या उठल्याच सिध्दाला धाडावं - किंवा आपणच जाऊन घेऊन यावं.' तसं अप्पण्णानं तारक्काला जवळ ओढीत घट्ट मिठीत घेतलं. प्रेमभरानं तिचं मस्तक कुरवाळीत म्हणाला, 'तुझ्यासारखी मोठ्या मनाची स्त्री मी कुठं पाहिली नाही. अशी बायको मोठ्या नशीबानं मिळते. असं म्हणून तारक्काला मिठीतनं मोकळं करीत बाजूला सरकला, कल्पना नाही त्याच्या मनात कुठले विचार डोकावत होते! मग पुन्हा जवळ येत म्हणाला, 'ती तुझ्या सारखी चांगली स्त्री नाहीए.' बोलताना त्याचे डोळे काहीसे लाल झाले, ओठ थरथरायला लागले. तो मनोमन पुटपुटला मी हिच्याशी लग्न करायची गोष्ट काढली तेव्हां तिनं कोण तमाशा केला- केवढी भांडली! जर तिचं ते मी ऐकलं असतं तर ही मला मिळाली असती का- असं म्हणत तारक्काला जोरानं घट्ट मिठीत घेतलं. तशा त्या घट्ट बिलगलेल्या अवस्थेतच विचार करायला लागला: 'तुझ्या घराचा सत्यनाश होवो...' म्हणणारणीला घरी घेऊन येऊ? पण ही माझ्यावर किती प्रेम करत्येय-काय निरंतर ही माझ्यावर असंच प्रेम करीत राहील... विचार करता करता त्यानं आपले ओठ तारक्काच्या कानाशी नेले. तोवर तारक्का पेंगायला लागली होती. म्हणून ती गप्प पडून राहिली. त्यानं विचार केला- मी नाही तिला आता घेऊन येणार-तेवढ्यात तारक्काला जाग आल्यासारखी झालं. म्हणाली, 'आपण इतके दिवस लग्न का नाही केलं?'

'हो. मला लग्न करायची इच्छा नव्हती- बायका विश्वास ठेवायच्या लायकीच्या नसतात. तुझ्या आधीचीला मी किती प्रेमानं वागविलं होतं. अंगावर दहा तोळे सोन्याचे डागडूग घातले होते. सतत तिच्यावर सुखाची सावली धरली. बाहेरचं उन्ह तिला जरा देखील कधी लागू दिलं नाही. काहीही म्हणा बायका विश्वासू नसतात हेच खरं.'

नवऱ्याचं हे बोलणं ऐकून तारक्का अशी काही हसली की जणू काही साऱ्या पुरूष जातीची तिनं थट्टाच आरंभिली होती 'साऱ्या अशाच असतात की काय?' तिचे हे शब्द करपलेल्या काळजाच्या अगदी मर्मस्थानातून उमटले होते.

'मी असं कुठं म्हणालोय की तूही तशीच आहे म्हणून!' असं प्रेमानं म्हणत उठून बसला - आणि परस्परातील नवरा- बायकोचे नातं विसरून मायेनं तिला कुरवाळीत त्यानं तिचं चुंबन घेतलं. तिच्याविषयी वाटणाऱ्या ममत्वाला कदाचित त्याद्वारे त्यानं पूर्ण वाट करून दिली असावी. नंतर म्हणाला, 'मी तर बुवा तिला काही आणणार नाही.'

'कां? कां नाही आणणार तिला? आम्ही दोघी बरोबर नांदू-' तारक्का म्हणाली. दुसऱ्या दिवशी सकाळी तारक्कानं सोनाला बोलावून घ्यायची आठवणही तिनं त्याला करून दिली. अप्पण्णा ताराच्या तोंडाकडे आणखी एकदा न्याहाळून पाहत आपल्या

कामाला निघून गेला. काही बोलला नाही. जराशानं गावातनं चंपा आली. त्या पोरीला तारा म्हणाली, 'तू आपल्या आईला एक दिवस इथं बागेत घेऊन ये.' ती पोरही ताराकडे विस्मित नजरेने पहात राहिली. तिला माहीत होतं की आपली आई काही बागेत येणार नाही. म्हणून ती म्हणाली, 'मी नाही तिला बोलावू शकणार.'

तारक्का तिला मायेनं गोंजारत म्हणाली, 'असं नाही हां म्हणायचं. तुझे बाबा बोलावताहेत असं सांगून आईला घेऊन ये तू तुझ्या. तुला किनई मी छानसा नवा फ्रॉक शिवीन हो.'

चंपानं लाडेलाडे विचारलं, 'मला नवीन फ्रॉक शिवशील ? बाबा तर जत्रेच्या वेळी शिवीन म्हणत होते-'

'नाही ग, उद्याच सिध्दाला धाडून तुझ्यासाठी नवा फ्रॉक शिवून आणवीन मी. तू तेवढं आपल्या आईला घेऊन ये झालं.'

दुसऱ्या दिवशी ताराचं अंत:करण सोनाच्या भेटीसाठी भारी उत्सुक होतं- पण ती काही आली नाही. पुढं काही पाच सहा दिवसांनी अप्पण्णानं यायसाठी निरोप धाडला तरीही आली नाही. एवढंच नव्हे, तर जो बोलवायला गेला होता त्यालाच म्हणाली, 'जा सांग त्यांना, म्हणावं की माणूस आहात का कोण आहात ? आता मी कशाला येऊ ? मला आज बोलावणं धाडणारा गेले पाच सहा महिने कुठं दडी मारून बसला होता ? साधं तोंड देखील दाखवलं नाही ह्या इतक्या दिवसात ! तो आला नाही म्हणून काय जन्माला घालणारा देव दोनवेळच्या भाकर तुकड्याची सोय करणार नाही होय ? अरे, म्हणावं आम्ही गवत खाऊन दिवस काढू. देव कुठे ना कुठे तरी निवारा देईलच की. त्याच्या सावलीला येऊन पडायला मी का कोणी कुत्री थोडीच आहे त्याची ?' हा सारा तिचा जळफळाट होता- आग आग करणारी काळजातली खदखद होती.

हे ऐकून अप्पण्णा म्हणाला, 'येणार असशील तर ये, नाही आलीस तरी त्याची पर्वा नाही. आमची मुलगी येते जातेय, बस आहे.'

पुढच्या आठवड्यात तेरदाळला जाणाऱ्या कोणा ओळखीच्या माणसाकरवी तारानं दोन साड्या आणि फ्रॉकचं कापड आणवून घेतलं. सिध्दाच्या हाती ते त्यानं सोनाकडे धाडून दिलं. सिध्दा ते कापडाचं गाठोडं जसंच्या तसं परत घेऊन आला- म्हणाला, 'सोना म्हणाली: गरज नाही आम्हाला याची- कोणा जोगतीणीला देऊन टाका म्हणून सांगितलंय तिनं.' ही गोष्ट ताराला आपल्यावर कोणी तलवारीचा घाव घालावा तशी जखम करून गेली. पण वरकरणी तसं काही न दर्शविता अगदी सहज काही बोलावं तसं म्हणाली, 'ती साड्या ठेवून घेईल तरी कशी ? ती काय केवळ अंगभर वस्त्र आणि दोनवळचं जेवण याच्या लालचीनं थोडीच यांच्यापाशी राहिली होती ? पुरूष भारी निर्दय असतात हेच खरं !' तिला वाटलं की आपली स्थितीही काही तिच्यापासून फारशी

वेगळी नाहीए. ती आपल्या आपणच काही तरी बडबडायला लागली. तिच्या मुखातून नकळत एक उष्ण नि:श्वास बाहेर पडला. त्यासरशी सारं वातावरण तत्पर होऊन गेल्या सारखं झालं.

त्याच दिवशी दुपारी चंपा बागेत येताच तारानं तिला विचारलं, 'तू तुझ्यासाठी धाडलेलं फ्रॉकचं कापड परत का केलंस ?'

'कुठाय माझं फ्रॉकचं कापड ? तू काही तरी खोटं सांगत्येस...' आनंदानं तोंड वाकडं करीत पोरीनं विचारलं.

तारा म्हणाली, 'अग, सकाळीच तुमच्या घरी धाडलं होतं मी- पण तुझ्या आईनं परत केलं ते.' पोरगी काही काळ तशीच गप्प बसून राहिली मग स्वत:च्या नकळत बोलून गेली: 'अस्सं. ह्यासाठी ती माझ्यावर रागावली होती तर!'

'का - कशासाठी रागावली होती ? काय म्हणत होती घरात ? माझ्या विषयी काही म्हणत होती का ?' आपल्या उत्सुकतेला आवर न घालता तारानं विचारलं.

'नाही. तुझ्या विषयी काही नाही बोलली. सारं बाबांच्या विषयीच चाललं होतं.'

तेवढ्यात वरनं अप्पण्णा आला - त्यानं विचारलं, 'का ग- तुझ्या आईनं साडी परत धाडली. तुलाही इकडे यायला नको म्हणते की काय ? तिचं का नाही ऐकत-का नाही राहत तिकडेच ?'

'ती काय म्हणून थांबवील इकडं येणं जाणं ? ती सोडू शकेल पण ही कशी सोडू शकेल ?' लेकाच्या प्रश्नाचं म्हाताऱ्या अम्मव्वानं उत्तर दिलं.

'ती तरी कुठं सोडू शकणार आहे ? चार दिवस हे असं वागणारच. यांनी तर काय म्हणून एवढा हट्ट करावा अन् आपलाच हेका चालवावा- तिच्याकडे एखादी खेप टाकायला नको का यांनी ?' हसत हसतच तारा म्हणाली.

तारकाच्या तोंडून म्हातारीनं प्रथमच असलं काही ऐकलं होतं- म्हणून तिला काहीसं आश्चर्य वाटलं. ती आपल्या लेकाला म्हणाली: 'केवढी धीराची- कशा भक्कम काळजाची बाई आहे ही!'

त्यावर अप्पणा काही एक न बोलता निमूटपणे तिथून चालता झाला.

'यात भक्कम काळजाची काय गोष्ट आहे म्हणा! नशीबात जे काही लिहिल असेल ते भोगावंच लागतं- त्यात अडथळे आणून काय फायदा ?' निराशेनं कुठं तरी दुसरीकडेच नजर लावीत तारा म्हणाली.

'आता चार दिवस सुखानं रहायचं- ते सोडून उगाच भलत्या सलत्या गोष्टींचा विचार कशाला करत्येस ?' असं म्हणत अम्मव्वानं विचारलं:

'चंपी कुठं गेलीय ?'

'ती आहे कुठं इथं, यांच्या मागे मागे कधीच पानमळ्यात गेलीय!'

अम्मव्वा पुढं म्हणाली, 'पुरूष बाहेर असं शेण खायला लागले तर कसं भागेल ? तिचं तिला काय ते पाहू दे. उगाच चूड दाखवून वाघ कशाला घरात आणायचा ! तिला तू जेवढं म्हणून दूर ठेवशील तेवढा तुझा नवरा प्रेमानं वागेल. मुलं बाळं होतील, तू सुखात राहशील.' कोण जाणे अम्मव्वा आणखी काही बोलणार तेवढ्यात तारक्का मध्येच म्हणाली, ' सुख देवाची आळवणी करून मागून आणायला तर हवं.. आता प्रत्येक जणच मागायला लागला तर मिळणार आहे थोडंच ?'

काही दिवसांनी ऐनापूहून तारक्काचा मामा रामप्पा मिठाई घेऊन आला. अप्पण्णा कुठं दुसरीकडे कामाला गेला होता. तारा बागेतच होती. मामा येताच हर्षभरानं तिनं त्याना हातपाय धुवायला पाणी दिलं- बसायसाठी सतरंजी अंथरली. रामप्पा बसला. नंतर तारक्कानं विचारलं, 'एकदा घर पाहून गेलात, त्यावर आता एक वर्षानं माझी आठवण झाली होय ? मध्ये कधी एकदा देखील दर्शन दिलं नाहीत. एकदा सोयरीक जुळवून दिली की आपली सारी जबाबदारी संपली- असं तुम्ही समजून चाललेले दिसताय !' त्याना टोमणे ठेवून देत तारा म्हणाली. मामा मामी एकदा तरी ऐनापूरहून येऊन नक्की आपल्याला भेटून जातील अशी तिला आशा होती; ती कधी पुरी न झाल्यानं रागारागानं ती हे सारं म्हणत होती.

'अशातलं काही नाहीए- यायची फार इच्छा होती, पण घर कसं सोडणार; माझ्या शिवाय दुकानाचं काम काज कसं चालणार- माझ्या खेरीज दुकानाकडे पाहायला दुसरं कोणी नाही ना, काय करू ?' त्यानं स्पष्टीकरण करीत म्हटलं.

'एखाद्या दिवसा पुरतं अनंताला दुकानावर बसून तुम्हाला येता आलं नसतं होय ? असं सांगा ना, मामा- तुम्ही आपली उगाच काही तरी सबब सांगून सारवासारव करताय ते ?' आपुलकीच्या रागानं ती फुरंगटून म्हणाली. अनंताचं नाव घेताना मनातनं कसंसच वाटायला लागलं.

'हूं- आता बसवा त्याला दुकानावर-' असं म्हणत त्यानं एक उष्ण निःश्वास टाकला. म्हणाला, 'पोरी, अनंत चांगला नाही निघाला गं- वाईट मुलांच्या नादाला लागलाय. त्याच्या भरवशावर दुकान टाकता येत नाही. काय करू ? एवढा मोठा झालाय, पण मनाला येईल तिथं राहतो- आणि मनाला लागेल तिकडं आपला भटकत असतो. शिक्षणही पूर्ण केलं नाही. घरात नाही कुठलं काम की धंदा. स्वतःला शहाणपण नाही अन् दुसऱ्यानं सांगितलेलं ऐकायचं नाही असा एकूण खाक्या आहे त्याचा. आमचं नशीबच मुळी असं आहे !'

व्यथित मनानं तारानं विचारलं, 'प्रकृती तरी बरी असते का त्याची ?'

'प्रकृतीला काय धाड भरलीय त्याच्या ? पहिल्या सारखाच दोन्ही वेळेला जेवतो-कधी काळी मनाला आलं तर घराकडे पाहतो, शेतीकडेही लक्ष देतो; नाही तर काहीही नाही.

माहीत नाही मध्ये दोन दिवस कुठं गायब झाला होता. तिसऱ्या दिवशी आपल्या आपण घरी परतला. कुठं गेला होतास, विचारलं तर उत्तर नाही. बसला तर दोन दोन तास आपला एका कोपऱ्यात नुसता गप्प बसून राहिला. समजत नाही की स्वारी कसल्या घुश्यात वावरतेय की त्याला ही सवयच जडलीय !'

कसलासा विचार करीत तारानं विचारलं, 'असं का ?'

'काय झालंय ते देवालाच माहीत- पोरगा सरळ मार्गानं आयुष्य जगेल असं काही वाटत नाही. एवढ्यासाठीच का आम्ही स्वतःच्या पोटाला चिमटा घेऊन याला शाळेत शिकायला धाडलं होतं ?'

'आम्हाला तुम्ही या कशाचीच काही कल्पना दिली नाही ?'

'यात सांगण्या कळविण्यासारखं काय होतं ? काही दुखणंबाणं आहे, आजारी पडलाय, बिछान्याला खिळलाय, काय कळवायचं ? यातलं काहीही नाही, आहे तसाच आहे. कधी कधी बोलायला लागला की काय एक एक शहाणपणाच्या गोष्टी सांगत असतो. कधी कधी एखाद्या जाणकाराला विचारावं तर याला काहीही झालं नाही म्हणून सांगतात. आता पुढं बघायचं, बायको घरात आल्यावर तरी हा जरा वळणावर येतोय की नाही ते पाहायचं' असं म्हणत रामप्पानं डोक्यावरचं पागोटं उतरवीत गुडघ्यावर ठेवलं.

'इंदिराही आता मोठी झाली असेल ?' तारानं विचारलं- तेव्हां तिला वाटलं की कोणी आपला अंतरात्माच ओरबाडतोय. ती एकदम धप्पकन खालीच बसली. रामप्पाला वाटलं की ती बराच वेळ उभीच होती. आता बसून बोलेल. तारक्काला अनंताची ही माझ्यामुळे अवस्था झाल्याचं ऐकून काहीसा अभिमान वाटला- पण लगेचच तिला दुःखही झालं. ती आपल्या मनाशी म्हणाली, 'मला माहीत आहे असं कां झालंय.'

त्यानं गाठोड्यातून मिठाईचा पुडा काढीत ताराच्या हाती देत म्हटलं, 'परवा ती महिन्याची झाली, म्हणून मी तुम्हा मंडळींना मिठाई द्यायसाठी आलो आहे.'

मिठाईचा पुडा हातात घेत तारा तक्रारीच्या स्वरात म्हणाली, 'तर अशी गोष्ट आहे होय ? हां म्हणून तर तुम्ही आलात !' मग थोडं वरवरचं हंसू हसत तिनं विचारलं, 'मुलगी कुठं आहे ?'

'तिथं तेरदाळमध्येच आहे. बसवायचं नक्की झालंय. कालच तेरदाळला जाऊन बोलणी वगैरे करून आलोय. तिथून परतताना वाटेत इथं उतरायचा विचार होता- पण नंतर विचार केला आधी रत्नाला भेटावं म्हणून मग प्रथम सरळ तिकडेच गेलो.' अशा प्रकारे त्यानं चांदुरला जायचं कारण स्पष्ट केलं. बायकोनं दिलेला गळ्यातला हार कुठं आहे हेही बहिणीला विचारून घ्यायचं होतं; कारण तारक्काला एकदम तिच्या नव्या सासरी जाऊन विचारणं बरं दिसलं नसतं.

तारक्कानं काहीशा समाधानाने विचारलं, 'आई - बाबा कसे आहेत ? इंदिराची ओटी भरायला कोण येणार आहे ?'

'सारे तयारी आहेत. उद्या रत्ना ऐनापूरला येईल. म्हणत होती की ओटी भरणाचा सोहळा आटोपला की इथं तुझ्याकडे एक दिवस राहून परत जाईल. तुमच्यापैकी कोण येतंय ?' म्हणत रामप्पानं कोट काढून खुंटीला टांगून ठेवला.

'बघूया. याना विचारल्या खेरीज मी तरी काय सांगू शकणार ?'

'अप्पासाहेब कुठं गेलेत ?'

'आज सोमवार आहे, तेव्हां नांगरणीचं काम नाही, इतरही तरकड असं खास काम नव्हतं- शेतावर गेलेत.'

'आता परत कधी येतील ? मला संध्याकाळपर्यंत घरी पोहोचलं पाहिजे. घरी खूप कामं पडलीत.'

तारक्का म्हणाली, 'पहिल्यादांच तर आला आहात. आजचा एक दिवस थांबा. हेही सायंकाळपर्यंत येतील. भेटीगाठीही होतील.'

'नाही रे बुवा, थांबता नाही येणार मला.'

अम्मव्वा हलकेच उठून आत आली आणि म्हणाली, 'एक दिवस तर रहा भाऊ. तुम्ही जाऊ कसे शकाल ? आल्या आल्याच जायच्या गोष्टी करायला लागतात ते. उद्या आम्ही तुमच्या घरी आलो, तर असं वागता येईल का आम्हाला ? हे का कोणा परक्याचं का घर आहे. भाची आणि मुलगी यात फरक काय आहे ?'

'अशातली काही गोष्ट नाही, थांबायलाही काही हरकत नाही- पण घरी जरा अडचण आहे यासाठी जाणं भागच आहे. तुम्हीही चलाना सुनेची ओटी भरायला. बैल गाड्या इकडे येऊनच पुढे जातील, तुम्हीही या त्या गाडीतनं.'

'आता म्हातारी झालेय. येणं जाणं मुष्किल होऊन बसलंय. डोळ्यानीही धड दिसत नाहीए. जमलंच तर हे दोघे नवरा - बायको येतील. सोहळा कुठं व्हायचाय, कधी व्हायचाय ?'

'शुक्रवारी ओटी भरायचीच. माहेरीच न्हाण आलं- म्हणून ते तेरदाळलाच तिला न्हाणवली बसवतील.'

'म्हणून तर जायची घाई करतोय. अप्पासाहेबांची भेट नाही का होणार त्या आधी ?'

'त्याची भेट कशी होऊ शकणार, रात्री एक दोन पर्यंत तो येणार. आणि तुम्ही तर पायाला चाकं बांधून आलात...' मग ताराकडे वळून म्हणाली, 'लौकर स्वयंपाक उरक पोरी, थोड्या शेवया कर. भाताला आधण ठेव. जेवूनच जातील तुझे मामा. दह्याला विरजण लावलं होतंस का ? दूध आहे ?'

'अद्याप नाही. दूध आहे. ही आता स्वयंपाकाला लागते-' असं म्हणत तारक्का चुलीकडे गेली.

अम्मव्वा उठून बाहेर येत म्हणाली, 'मला सांगायची जरूर पडत नाही. सारं काही आपल्या आपण सांभाळते. इतका वेळ स्वस्थच होती म्हणून हे आपलं आत्ता सांगावं लागलं इतकंच...' असं रामप्पाला उद्देशून म्हणत ती फिरून तारक्काकडे वळत शांतपणे म्हणाली, 'तारा, शेजारी रामप्पाना मिठाई घेऊन ये कसं ? तसं त्यांचं येणं जाणं नाहीए-पण उद्या म्हणायचे की आम्हाला त्यानी बोलावलं देखील नाही ! इथवर आल्यावर देऊन यायला हवं-'

'हो - थोडा चहा करते- पितील आणि येतील देऊन.'

रामप्पा चहा पिऊन झाल्यावर भावकीतल्या घरी गेला आणि मिठाई देऊन ओटी भरायला यायचं आवतन करून आला. त्यांनी चहा आणल्यावर नको नको म्हणतानाही पिणं भाग पडलं. थोडावेळ इकडचं तिकडचं बोलणं झाल्यावर पुन्हा एकदा यायचा आग्रह करून तारक्काच्या घरी परतला. तारक्काच्या आणि त्यांच्या घरामध्ये एक भिंतच काय ती आड होती.

त्या व्यतिरिक्त अम्मव्वा जरा त्यांच्या घराकडे सरकून कान लावून अंगणात बसली होती. म्हणून त्यांनी रामप्पा बरोबर फारसं बोलणं वाढविलं नाही. रामप्पा तिथून येताच घाईघाईनं जेवायला बसला. जेवता जेवता इकडच्या तिकडच्या गोष्टी करता करता भाचीकडं त्यानं हाराचा विषय काढला. तारा म्हणाली, 'वर्ष झालय इथंच पडलाय तो. मध्यंतरी तुम्हीही आला नाहीत आणि आईही आली नाही, म्हणून इथंच राहिलाय तो.'

तसं रामप्पानं, 'इथं राहिला म्हणून काय बिघडलंय असं ? आणि तिथं तरी कोण घालतोय रोज रोज तो ? उद्या घरात कार्य आहे म्हणून आपलं सहज आठवलं...' असं दाखविण्यापुरतं वरवरचं बोलत जेवणानंतर हार मागून घेऊन खिशात ठेवून दिला. नंतर पान खाऊन जायला निघाला.

तारक्का मामाला निरोप देण्यासाठी विहिरीपर्यंत गेली. रामप्पानं वळून अम्मव्वाला म्हटलं 'आता निघतो मी, तुम्ही मंडळीनी आवश्य यायचं हां- गाड्या मळ्यालगतच्या रस्त्यांनंच जाणार आहेत.'

'अच्छा, गाड्या इकडनंच जाणार असतील तर जरा लौकर यायचं करा. इथंच जेवणी खाणी उरकून उन्हं उतरल्यावर पुढं जा. रेल्वे लायनीच्या रस्त्याच्या मानानं हा रस्ता तसा जवळचा आहे.'

'हा म्हणूनच तर या रस्त्यानं जाणार आहोत. सगळ्या लोकानं गोळा करीत जायचं म्हटलं की उशीर हा होणारच. तुम्ही सारे निघायच्या तयारीतच असा. अप्पासाहेबांनाही

सांगा-' मग थोडं थांबून म्हणाला, 'इथं तुमच्यासाठीही एक वेगळी स्वतंत्र गाडी पाठवायचं मनात होतं-पण हंगामाचे दिवस आहेत. तिकडे चांदूरलाही एक गाडी धाडावी लागणारच आहे. मी एकटा, सगळीकडे मलाच पाहावं लागतं.'

अम्मव्वा त्याला मध्येच टोकत म्हणाली, 'वेगळी गाडी कशाला, इकडनंच तर जावं लागणार आहे.'

'तारक्काला सारं काही समजावून सांगितलं आहे. शुक्रवारी दुपारचं तयार राहायचं. अप्पासाहेबानाही माझ्यावतीनं आग्रहानं सांगायचं-' म्हणत तो चालू लागला.

संध्याकाळी नवरा घरी आल्यावर तारानं मामा येऊन गेल्याचं सांग्तिलं- तसं तो म्हणाला, 'मी येईस्तो त्याना थांबवून का नाही घेतलंस ?'

'ते थांबले नाहीत; घरी खूप कामं पडलीत असं सांगून निघून गेले.'

'घरी कार्य निघालंय, भाचीला आमंत्रण केल्यावाचून कसं भागणार, म्हणून आले असणार. आता इथं कोण सुजलाय म्हणा जायला, अप्पण्णा काहीसा थट्टेनं म्हणाला-पण आवाजात कडवटपणा होता.

आवाज जरा चढल्या कारणानं अम्मव्वाच्या ते सारं कानी पडलं. म्हणून ती म्हणाली, 'नाही रे फार फार आग्रहानं बोलावणं करून गेलाय-' तारक्कानही, 'धाडायचं मनात नाही म्हणून काहीतरी सबबी सांगणं सुरू केलंय झालं-' मनातनं जरा रूसल्यासारखं दर्शवीत म्हटलं नवऱ्याला वळणावर आणायसाठी तिनं वापरलेलं ते एक हुकुमी अस्त्र होतं. अस्त्रापुढं नमणं भागच असतं... आणि तसंच झालं. अप्पण्णा म्हणाला, 'मी जायला नको का म्हणतोय ? जाऊन ये- सिध्दाला उद्याच तेरदाळला पाठवून पोलकी, धोतर, रूमाल वगैरे आणवून घेतो. घेऊन जा आणि सोहळा आटोपून परत ये. लग्नाच्या वेळी तो मुलगा आला असताही तसाच परत गेला- तेव्हांही आम्ही त्याच्यासाठी काही केलं नव्हतं.'

तारक्काच्या लेखी हे आपलं एका दगडात दोनपक्षी मारल्यासारखं झालं. दुसऱ्याच दिवशी सिध्दाकरवी तिनं कपडे आणि ओटीआहेराचं सामान आणवून घेतलं.

तारक्का आज सकाळी उठल्यापासूनच गाडीची वाट पाहत होती. मध्येच एकदा शेजारची गाडी पाण्यासाठी आली तेव्हा तिला वाटलं, की आपल्या आप्तांचीच गाडी आलीय म्हणून ती धावत बाहेर पाहायला गेली. वेळ सरत चालला पण गाड्या काही आल्या नाही. तिला वाटलं येऊ शकतील. इथून तेरदाळ म्हणजे सारा दोन तीन तासांचा रस्ता- अजूनही येतील. संध्याकाळ व्हायला आली तशी तिची आशा मावळली. वाट पाहून पाहून ती कावली. शेवटी एक दीर्घ सुस्कारा टाकीत कंटाळल्यागत बसून राहिली. अम्मव्वाही वाट पाहून पाहून थकली; एक दोनदा तारक्काला म्हणाली, 'अजुनी गाड्या कशा आल्या नाहीत, गं ? आणि आज आल्या तरी ती मंडळी थोडंच थांबतील ?

चटकन त्याना चहा देउया, चुलीवर जरा चहासाठी आधण ठेव. बोलावून ते तुझ्या घरी कधी मुद्दाम येणार आहेत; माहेरहून येताहेत, जरा चहा पिऊन जाऊ देत. तुझे मामा येत जात राहणारच आहेत.' तसं ताराची आशा पुन्हा पालवली. बाहेर जाऊन, डोळ्यावर आडवा हात धरून दूरवर निरखून पाहून आली. दूर कुठे धूळ उधळलेली दिसत होती खरी, पण तिची आशा फलद्रूप होण्याचं चिन्ह काही दिसेना. संध्याकाळ होत आली. दिवस मावळायला फारतर एखादा तास उरला असेल. तारक्का सासूला म्हणाली, 'आता गाडी यायला वेळ तरी उरलाय कां काही, अम्मा ?' आणि मरगळल्या मनानं आत निघून गेली.

अम्मव्वा म्हणाली, 'आता कसचे यायला ? संध्याकाळ झालीय एव्हाना तर गाड्या तेरदाळला जाऊन पोहोचायला हव्या होत्या. रामप्पा एवढं ठामपणे सांगून गेला होता तरीही गाड्या काय रेल्वेलाईनीच्या रस्त्यानं निघून गेल्या की काय ?'

सासूनं म्हटल्यावर तारक्कालाही तसंच वाटलं. तिच्याही तोंडून हेच शब्द बाहेर पडले: 'हो शक्य आहे असं झालं असणं-'

# 19

गाड्या तेरदाळच्या तळ्याशी पोहचता पोहचता रात्रीचे आठ वाजून गेले होते. सकाळ पासून गाडीत बसून बसून लोक कंटाळले होते. ते सारे खाली उतरले. सर्वत्र पिठूर चांदणे पसरले होते ते पाहून सर्वांची मनं शांत झाली. काही बायका उरतल्या आणि तळ्याच्या पाळीवर जाऊन हातपाय धुवून आल्या. सुंदराबाईनं खाली उतरताच गुरूजींना निरोप द्यायसाठी दवडलं, नंतर रत्नव्वापाशी येऊन म्हणाली, 'पुरूष असते तर त्यांनी सारं पाहून घेतलं. असतं, आपल्यावर कसली जबाबदारी पडते ना. मी चांगलं म्हणाले देखील की मी घरी राहते- पण हे कुठचं माझं ऐकायला! स्वत.च घरी राहिले. म्हणाले: तुझं माहेर आहे- तूच जा आणि सारं उरकून ये- आणि सारं काही माझ्याच गळ्यात अडकवलं.' ही गोष्ट रत्नव्वाला माहीत नव्हती, अशातली काही गोष्ट नव्हती- पण आपल्या नणंदेला आणि बरोबरच्या इतर बायकांनाही जबाबदारीची थोडीबहुत जाणीव व्हावी ह्या उद्देशानं सुंदरव्वानं मुद्दामच हे सांगितलं.

रत्नव्वा, कोण जाणे का काहीशा गंभीर स्वरात म्हणाली, 'कोणीही आलं म्हणून काय असा विशेष फरक पडणार आहे; काम कसं ना कसं तरी मार्गी लागतंच म्हणा!'

नणंदच्या या गांभिर्ययुक्त बोलण्यानं सुंदरव्वा उमजून चुकली की आता जास्तीत जास्त जबाबदारी आपल्या एकटीलाच सांभाळावी लागणार आहे. अशा या निराश मन:स्थितीत ती अधिक काही बोलण्याच्या अवस्थेतही नव्हती, तेवढ्यात नातेवाईक बोलावायला आले. बोलावायला आलेल्यातला एक नातेवाईक काहीशा आत्मीयतेनं म्हणाला, 'हे बघ बाई सुंदरव्वा, तुझ्या मुलाला वाजत गाजत न्यायचं असेल तर आत्ताच सांग, मागाहून मग टोमणे नकोत.' ते गाव तिच्या माहेरचं होतं.

सुंदरव्वानं ही तेवढ्याच आत्मीयतेनं उत्तर दिलं. म्हणाली, 'गावच्या पाटलाचा जावई का आहे माझा मुलगा, असं वाजत गाजत न्यायला?'

त्यावर तिची जरा मस्करी करीत तो म्हणाला, 'पाटलाला जसा त्याचा जावई मोठा तसाच आम्हालाही आमचा जावई मोठाच आहे!' त्याच्या त्या उद्‌गारासरशी वातावरणातलं गांभीर्य काहीसं निवळल्यासारखं झालं.

मग सारे जण मिळून गावाकडे जायला निघाले. काही मुलं गाड्यातच बसून होती. बाकी मंडळी घोळक्या घोळक्यानं गाड्याच्या मागनं चालू लागले. एक घोळका बायकांचा

अन् दुसरा पुरूषांचा ऐनापूरहून बरोबर आलेला तुतारी वाजविणारा गाड्यांसमोर अधनं मधनं तू- तू- तू- करीत तुतारी फुंकत चालला होता. पुढच्या गाडीवाल्यानं त्याला मध्येच हटकत दटावलं: 'तुला कापडचोपड काय फुकटात मिळणार आहे होय ? व्याही मंडळी आली आहे. तुतारी वाजवीत राहा. पोहचल्या पोहचल्याचं तुला विडीचं एक आख्खं कट्टल दिईन प्यायला...' त्याला जरा जोर देत- बक्षिसीच्या मधाचं बोट लावीत तो त्याला पुन: पुन्हा तुतारी वाजवायला लावीत होता. गाड्या चांदण्यात घराकडे निघाल्या.

मोठ्या सडकेनं बायकांच्या घोळक्यातनं चालता चालता सुंदराबाईनं रत्नाकडे वळून विचारलं, 'आज अनंताचं तोंड एवढं असं का उतरलेलं दिसतं ?'

'तुम्हा मायलेकानाच माहीत असणार-' असं म्हणत तिनं तोंड दुसरीकडे वळविलं. तेवढ्यात मागनं येत असलेल्या गुरूजींनी थट्टेनं म्हटलं, 'उद्याच त्याच्या चेहऱ्यावर चांगली टवटवी आलेली दिसेल. उगाच चिंता कशाला ?'

तशी साऱ्या बायका खुदुखुदु हसल्या. त्यांना त्याचं बोलणं खरंच वाटलं असणार ! जराशानं सुंदराबाई म्हणाली, 'बघ भाऊ, जावयाला हट्टबिट्ट करणं नाही जमणार. किती सोनं देणार आहेत. ते तू त्याच्या सासूसासऱ्यांना आधी भेटून काढून घे,'

'आता विचारायचं काय बाकी राहिलंय ? ऐनापूकर मंडळी दिल्या शब्दाला कधी जागत नाहीत ? रामू येऊन काय करायचं काय नाही हे सारं ठरवून गेलाय.' गुरुजीनी म्हटलं.

तसं रत्नव्वा जरा तोंड उघडून म्हणाली, ' हट्ट काय म्हणून करील ? हट्ट करुन उगाच त्यांचं मन कशाला दुखवायचं ? सासू सासरे जे देतील ते आनंदानं स्वीकारणंच उत्तम असतं. त्यात दोघांचही भलं असतं.' तिनं आपला अनुभव सांगितला.

ते सारं खरं आहे - पण जावयाला काय काय मिळणार आहे ? सुंदराबाईनं विचारलं.

'अरे, त्यांच्या देण्यानं काय तुमचं घर भरणार आहे थोडंच ? जगात देऊन घेऊन कोणी काही कोणाला पुरा पडत नसतो. देणारा स्वखुशीनं जे काही देतो तेवढं पुरेसं आहे. आमच्या तारक्काचं काय झालं माहीत नाही होय ?' रत्नानं म्हटलं.

ओटी भरायचा मुहूर्त येऊन ठेपला. अनंतानं गुरुजीना बोलावून म्हटलं, ' मी फार काळ तिष्ठत बसू शकणार नाही. तुम्ही तुमचं सारं काम आटोपलं की मग मला बोलवा.'

'नवी वस्त्रं परिधान करीपर्यंत तर बसाल की नाही ? गुरुजींनी विचारलं.

ते बोलणं सुंदरव्वाच्या कानी पडलं तसं लेकाला उद्देशून ती समजावणीच्या स्वरात म्हणाली,'असं काय करतोयस ते, किती सुरेख मखर बनवलंय त्यांनी. जाऊन जरा घडीभर तर बसशील की नाही ? जन्माला आल्या सरशी कधी ना कधी ना तरी हे करावंच लागतं - पुन्हा पुन्हा का कोणाला या असल्या गोष्टी कराव्या लागतात ?'

रत्नव्वानं तिला मध्येच अडवीत अनंताचा शब्द न मोडता, त्याचा जरा मान कायम

ठेवीत म्हटलं, 'राहू दे ना आता, नवे कपडे घालायला तो तयार झालाय ना? काल तर त्यालाही त्याची तयारी नव्हती. आज कालच्या मुलांचं काय? त्यातनं शिकल्या सवरल्या मुलांना या असल्या गोष्टी आवडत नाहीत. त्याच्या मनाप्रमाणे त्याला करू दे ना.'

इंदिराला प्रथम नटवून थटवून बसविण्यात आलं. अनंत चौरंगावर येऊन बसताच, त्याच्या म्हणण्यांनुसार गुरूजींनी विधी झटपट उरकून घेतला. अनंत तत्क्षणी उठायला लागला तसं गुरूजी म्हणाले, 'अजून आणखी चारपाच जण आहेर करणार आहेत.' नको होतं तरी अनंताला बसणं भाग पडलं. सर्व मंडळींचा आहेर करून झाला. अनंत जायसाठी उठणार तेवढ्यात जमलेल्या मुलींनी त्याला बायकोचं नाव घ्यायचा आग्रह केला. अनंत चिडून म्हणाला, 'काय आहे हा सारा चावटपणा- बस्स करा.' नंतर तो बाहेर जायला लागणार तोच दारापाशी उभ्या असलेल्या एका व्यक्तीनं म्हटलं, 'जरा थांबा. हा आणखी एक आहेर आलाय, तो घ्या अन् मग उठा.'

'आता कोणाकडून आलाय आहेर?' मनातल्यां मनात बडबडत अनंतानं दाराकडे पाहिलं. कापडाचं एक गाठोडं या हातातून त्या हातात होत होत त्याच्यापर्यंत पोहोचलं. सुंदराबाई मनाशी विचार करायला लागली, 'पोरासाठी त्याच्या सासरकडनं एक पोषाख आला होता- त्या व्यतिरिक्त दुसरा पोषाख नव्हता. लोकांना वाटलं असणार यांना कोणी काही फारसे नातेवाईक नाहीत. चला झालं हे छानच झाले.' नंतर अनंताकडे पहात म्हणाली, 'हा पोषाख घाल बाळ- छान कपडे आहेत.'

'का कशाला, फक्त हात लावून स्वीकारावा.' जवळच बसलेली अनंताची सासू रूकव्वा म्हणाली.

रत्ना काहीशा आढ्यतेनं म्हणाली, 'त्यांनी होरागेरीहून इथवर हौसेनं धाडलाय. ओटी भरायच्या वेळी घाल ना?'

होरागेरी हा शब्द कानी पडताच अनंतानं किंचित उद्विग्नतेनं विचारलं, 'तारा नाही आली?'

दरवाजातच उभा असलेला सिध्दा म्हणाला, 'कशी येणार? दिवस मावळेपर्यंत तुमच्या गाड्या यायची वाट पाहत बसली होती. अखेर नाईलाजानं मला इथं धाडलं, उद्या पुन्हा कोणी काही बोलायला नको म्हणून!'

तसं सुंदरव्वा म्हणाली, 'गाड्या तर रेल्वेलाइनीच्या रस्त्यानं आल्या. तिकडचा रस्ता खराब होता. म्हणून इकडनं आलो.'

'बरोबर आहे, रामण्णानं तर मळ्याकडच्या रस्त्यानं यायला सांगितलं होतं. तुम्ही लोकांनी विचारलं कोणीकडनं जायचं? तर मी काय म्हणू की मळ्याकडच्या रस्त्यानं गाड्या घ्या म्हणून! तुम्हा मंडळीना उगाच वाटायचं की मला माझ्या मुलीला घेऊन

यायचंय यासाठी सांगत्येय मी, म्हणून आपली गप्प बसल्ये झालं मी.' रत्ना जरा घुश्यातच म्हणाली.

'बाबा माझ्या, आक्का काय म्हणत्येस तू हे? त्याच वेळी तू म्हणाली असतीस तर आम्ही नको का म्हटलं असतं? तारक्काच्या मनात काय आलं असेल कोण जाणे?' सुंदरव्वा आश्चर्य दर्शवीत म्हणाली. तेवढ्यात अनंतानं आधीचा पोषाख उतरवून हा पोषाख परिधान केला. तो पोषाख पाहून जवळच बसलेली एक बाई म्हणाली, सासरकडच्या पोषाखाहून हा पोषाख अधिक चांगला आहे. पूजेच्या वेळेपर्यंत हाच अंगात राहू दे.'

तिथंच उभी असलेली इंदिराची आई म्हणाली, "आम्ही काय करणार, ताई- त्यांनी सांगितलं तसं आम्ही केलं. आम्ही चांगले उत्तम कपडे करा म्हणून म्हटलं होतं- पण याच्या वडिलांनीच मना केलं- म्हणाले, 'कपडे काय शेवटी पेटीचीच धन- पुन्हा तो वापरणारही नाही- त्या ऐवजी पैसे द्या म्हणजे झालं.' म्हणून मग आम्ही आपले गप्प बसलो. आता तुम्हीच पाहा चार लोकात वाईट कोण ठरलं ते- ? पुन्हा आमचा खर्च व्हायचा तो झालाच...!" आपल्या नवऱ्याकडे पाहात तिनं सर्वांना हे ऐकवलं.

तो म्हणाला, 'यात वाईट ठरण्याची काय गोष्ट आहे म्हणा? जे काही देणार ते त्यांच्याच घरी पोहचणार आहे. लपवून छपवून कशाला द्यायचं? सारं दाखवून सवरून उघडपणे देणंच बरं असतं..!'

'राहू दे बाई आता. तुम्ही दिलं नाही असं कोण म्हणेल - दोनशे रूपये नाही का दिले तुम्ही?' सुंदरव्वानं सर्वांना ऐकवून विषय तिथंच संपविला.

तो दिवस! पति - पत्नीनं एकमेकांच्या स्नेहपूर्ण सहवासानं सुख-आनंद मिळविण्याचा दिवस असतो. पत्नी पतीच्या छत्रछायेत नव्या जीवनाला त्या दिवशी आरंभ करते. अनंताचा कसा हा खुळेपणा! विवाहित पत्नीपासून किती दिवस दूर रहाणं शक्य होईल? लोकांचा गलबला कमी झाला. रात्रही बरीच झाली हाती. बायकांनी अनंताला आणि इंदिराला एका खोलीत नेऊन बिछान्यावर बसविलं, औक्षण करुन आशीर्वाद दिला, आणि खट्याळ हसू हसत त्या दोघांना तिथं एकांतात सोडून त्या बाहेर गेल्या. एकीकडे दिवा तेवत होता. साऱ्या खोलीभर सुगंध दरवळत होता. मध्ये पानाच्या विड्यांचं तबक होतं - त्याच्या एका बाजूला अनंत आणि दुसऱ्या बाजूला इंदिरा बसलेली होती.

अनंतानं डोळे वर करुन एकवार इंदिराकडे पाहिलं. त्याच्या लेखी आपल्या आयुष्यातला हा एक फार मोठा अगतिकतेचा - असहाय्यतेचा क्षण होता. शेजारी मुग्ध बाला बसली होती. तिची मन:स्थिती अशी होती की, आता आपण काय करायला हवं हे तिचं तिलाच उमजेनासं झालं होतं. नकोशी झालेली - नावडती पत्नी होती ती! तिला एकदा वाटलं की दार उघडून सरळ इथनं बाहेर पडावं - पण ती तशीच्या तशी तिथं मूकपणे बसून राहिली. अशावेळी पतीनं आपल्याशी प्रेमानं गुजगोष्टी कराव्यात असं पत्नीला

वाटत असेल नाही? अनंताचं मन म्हणालं, 'जरा एकदा बोलून तर पाहा.' पण त्यानं कच खाल्ली - तो कष्टी झाला. मग अनंत जागचा उठला आणि एकीकडे खिडकीशी जाऊन बाहेर पाहत उभा राहिला. बिच्चारी! कल्पना नाही तिच्या मनाला त्यामुळे काय वाटलं असेल ते? अवघ्या बारातेरा वर्षाच्या इंदिरेला अनंताची मन:स्थिती समजण्या इतपत शहाणपण कुठून असणार? ती त्याचं ते तसलं वागणं पाहून संत्रस्तपणे बसून राहिली. खिडकीतून आलेल्या गार वाऱ्याच्या झुळकीनं अनंताचं मन शांत करण्याचा प्रयत्न केला. चांदण्याकडे पाहता पाहता त्याला कदाचित स्वत:च्या मन:स्थितीचं विस्मरण घडलं असेलही, पण विसरणार तरी कसं? त्यानं वळून पाहिलं - तसं लगेचच इंदिरा उठून उभी राहिली. बिछाना सोडून अनंताच्या दिशेनं एक दोन पावलं पुढं सरकली. अनंताच्या दृष्टीला तिचं येणं - उभं राहणं असह्यसं झालं. त्याचं तोंड घामानं डवरुन आलं. वर्ण काळा होता. नाक जरा मागल्या बाजूला दबल्या सारखं झालेलं होतं, जाडसर ओठ. बाळपणी कधी पडल्यामुळं कपाळाला पडलेल्या खोकेची खूण. तिला पाहून अनंतानं तोंड फिरवलं. एक नि:श्वास आपोआप त्याच्या तोंडातून बाहेर पडला. पुन्हा वळल्यावर तीच मूर्ती, तेच रुप - उभं राहण्याचाही तोच थाट! तिला पाहून अनंताच्या तोंडून निघालं: 'डोकं दुखतंय!'

कोण जाणे अनंत कधी बिछान्यावर जाऊन पडला. जवळच ती थरथरल्या हातात पान घेऊन भेदरल्यासारखी बसली होती. अनंतानं खिडकीकडे नजर टाकली - तसं एका अभ्रखंडानं चंद्र झाकोळून टाकला. चंद्र निस्तेज झाला होता. एक स्मृति अनंताच्या मन:पटलावर तरळून लुप्त झाली. एक उष्ण श्वास अडत अडखळत नाकपुड्यातनं बाहेर पडलाच. तशाच स्थितीत इंदिराकडे पाहत तो म्हणाला, 'मी सांगितलंय ना, माझं डोकं दुखतंय ते -' त्या वेळी ती थरथरत होती. अशा प्रकारे किती वेळ गेला कोण जाणे! बाहेरचं हसणं खिदळणं आणि गलबला कधीच बंद पडला होता. शांत रात्र, सर्वत्र निस्तब्धता. या दोघांच्या श्वासाशिवाय दुसरा कसलाच आवाज कानावर पडत नव्हता. दूर कुठं तरी एक घुबड घुत्कारले. तसं दोघांच्या काळजात एकदम लक्कन् झालं... थरथरलं. अनंत हलकेच जाऊन बिछान्यात एका अंगाला पसरला, लगेचच तिच्या बाजूला वळला. ती अंग आक्रसून देहाची धनुकली करुन अनंताला अगदी लगटून पहुडली होती. डोळे फाड - फाडून एकटक विस्फारीत नजरेनं ती अनंताकडे पाहत होती. त्या डोळ्यात शांती प्रतिबिंबित झाली होती. एका बाजूला हे आणि दुसऱ्या बाजूला त्रस्त, चकित, भयभीत डोळे. म्हणजे ती अनंताला काही सांगू बोलू का पाहत होती? लाल ओठ विलग झाले, हलले; थरथरले. अनंतानं तोंड फिरवून तोंडावरुन शाल ओढून घेतली. झोप कधी लागली की नाही ते एक त्या परमेश्वराला ठाऊक. सकाळी उठताच अनंतानं पाहिलं: ती उठून खोलीतनं आधीच बाहेर पडली होती. त्यानं

इकडे तिकडे पाहिलं. त्याचं उसं भिजलं होतं. अनंत मनोमन दु:खी झाला, पण एक क्षणभरच - नंतर त्यानं अतिरेकाचा मार्ग अंगीकारला.

अनंत खोलीतनं बाहेर पडताच त्याला स्नान घालण्यात आलं. त्या आधीच त्याच्या बायकोचं न्हाणं आटोपलं होतं. शेजारी शेजारी पाट मांडून त्यावर या दोघा नवरा बायकोना बसविण्यात आलं - खायसाठी त्याना शेवयाची खीर वाढली गेली. कसं बसं खाणं आटोपून अनंत बाहेर आला. त्या दिवशी सायंकाळपर्यंत सारं घर खाण्यापिण्याच्या आनंदातच बुडून गेलं होतं. अनंत माडीवरच्या एका खोलीत जाऊन पडून राहिला. एक दोघं मित्र त्याची जरा थट्टामस्करी करावी म्हणून तिथं आले - अनंत घुश्यातच स्वत:शी काही बडबडत होता - तो झोपलाय असं समजून ते लोक परत गेले. त्या दिवशी मग आणखी कोणी त्याच्या जवळपास फिरकलं नाही. या साऱ्या गडबड गोंधळात इंदिरा कुठे होती कोण जाणे! लोकांचा गोंगाट आणि खाण्यापिण्याची गडबड यात इंदिरा कुठं काही दिसली नाही. दुपारी तिची मैत्रीण तिला शोधीत आली तिनं हसत हसत विचारलं, 'सांग ग आधी त्यांनी काय केलं ते ?

कपाळाला आठ्या घालीत इंदिरा म्हणाली, 'चल चालती हो इथनं.'

मैत्रीण हतबुध्द होऊन म्हणाली, ' अग जा ऽऽग जा - बस् कर - कोणापासून दडवत्येस ? दारा आड उभं राहून आम्ही सारं सारं ऐकलं बरं का -' त्या मैत्रिणीनं असं काय ऐकलं कोण जाणे!

ऋतुशांती उरकून सगळे गावी परतले. येताना इंदिरालाही बरोबर आणलं. लेक नव्या घरी नांदायला जातेय - तिला धीर वाटावा म्हणून तिची आई रुक्कुही तिला सोबत गेली. एकदोन दिवस प्रवासाचा शीण घालविण्यात गेले. दोन्ही दिवस अनंताचं तोंड आपलं उतरलेलंच होतं. नंतर थोडासा कुठं उत्साह त्याच्या ठायी दृष्टीस पडला. काही तरी विशेष घडले आहे या जाणीवेनं त्याच्या बायकोला आणि सासूला आनंद वाटला. एक दिवस दुपारी आईनं लेकीला जवळ बोलावून कानमंत्र दिला. 'तो जरी असा वागत असला तरी आत जाऊन बिछाना नीट करुन ये - तिथंच झोपत जा. वागून वागून तो किती दिवस असं वागेल ? तरुण पोरगा आहे.'

'काय करु ? साधं बोलत देखील नाहीत. तोंडातनं एक शब्द काढीत नाहीत - आत गेले रे गेले की एखाद्या मारक्या बैला सारखं पाहायला लागतात -' इंदिरानं निरुपायानं सांगितलं. 'काही हरकत नाही, चार दिवसात येईल सरळ मार्गावर. तू त्याला आंघोळीसाठी पाणी काढून देत चल, धोतर निऱ्या करून ठेवीत जा, त्याला बोलायची इच्छा नसली - तो जरी बोलला नाही तरी तू मात्र त्याच्याशी बोलत जा. काम केल्यावर तो थोडाच मारायला धावणार आहे तुझ्यावर! तूच कपाळावर सतराशे साठ अठ्या घालून सदान् कदा वावरायला लागलीस, तर त्याला तो तरी काय करील ? आपलं काम करीत जा -' आईनं काहीशा

रागारागानंच तिला समजावलं त्यावर इंदिरा काहीएक बोलली नाही. नुसतं हूं हूं करीत सारं काही ऐकत राहिली.

रुक्कव्वा गावी परत जाताना सुंदराबाईला म्हणाली, 'अनंताचा स्वभाव काही वेगळाच आहे. नवऱ्याबरोबर कसं वागावं कसं राहावं याचं पोरीला अद्याप ज्ञान नाहीए - अजून खेळण्या बागडण्याचं वय आहे तिचं. तिला बिचारीला कशाची काय कल्पना असणार!' मग थोडं थांबून आणि सारा भीड - संकोच गुंडाळून ठेवीत म्हणाली हिनं कितीही जरी बाहेर झोपायसाठी धडपड केली तरी तुम्ही तिला आतच झोपायला सांगा - चार दिवसांचा प्रश्न - सुख लागेल. आणि आम्हाला तरी कुठं अशी फार मुलं आहेत ?

सुंदरव्वानं आश्चर्ययुक्त मनानं सारं ऐकून घेतलं आणि म्हणाली, 'मी सांगायची काय आवश्यकता आहे ? आपल्या आपण सारं जमवील ती. या साऱ्या गोष्टी कोणाला नको का असतात ?'

रुक्कव्वानं याचं काही उत्तर दिलं नाही पण ती जावयापाशी गेली. अनंत कुठं बाहेर जायच्या तयारीत होता. रुक्कव्वा त्याला म्हणाली, 'आता मी उद्या जातेय परत, येत्या सोमवारी आमच्या गावी जत्रा आहे - यायचं तुम्ही या जत्रेसाठी बरं का. हे चार दिवस नुसते धावपळीतच गेले. निवांत पणे बसून काही बोलला नाहीत की नीटपणे, काही खाल्लं प्यालाही नाहीत.'

'पण तेव्हाही जत्रेचा गडबड गोंधळ हा असेलच की.' अनंता काही विमनस्कपणे म्हणाला

जावयाच्या या बोलण्याचा अर्थ रुक्कव्वाच्या ध्यानातच आला नाही. तिला वाटलं की ऋतुशांतीच्या वेळचा पाहुणचार जावयाच्या मर्जीस उतरला नसणार, म्हणून आपली ती म्हणाली, 'जत्रा असली म्हणून काय झालं, गडबड गोंधळ असेल तो गावात, आपल्या घरी थोडाच त्याचा त्रास असणार आहे ? हां, आता त्यावेळी घरात ऋतुशांतीचा सोहळा होता म्हणून जवळपासची चार माणसं जमली होती. ही माणसं तरी आमच्या घरी कधी येणार हो ? आता तुम्ही मंडळी कधीना कधी निमित्ता निमित्तानं येत जाल रहालच. त्यावेळी सर्वांची व्यवस्थित उठबस सांभाळणं जरा कठिणच गेलं. पण आमच्या मुलांना हे सारं नवं नवं होतं ना! त्यावेळी जो काही उणेपणा राहून गेला असेल, तो स्वच्छ सांगावा, सुधारुन घेता येईल- घ्यायलाच हवा. आम्ही कोण परके का आहोत ?'

अनंतानं तिच्या बोलण्याकडे विशेष लक्ष दिलं नाही. टोपी घातली अन् सरळ बाहेर पडला. यामुळे रुक्कव्वा अधिकच काळजीत पडली.

बायको घरात आल्यापासून अनंताचंच पाऊल घरात ठरेनासं झालं- तो क्वचितच कधी घरी असायचा. त्यानं दुकानात जाऊन बसायला सुरूवात केली- झालंच तर व्यापाराकडेही जरा लक्ष द्यायला लागला. हे पाहून रामप्पाही काहीसा खूष झाला.

त्याला वाटलं, पोरगा आता मार्गावर आलाय. त्यानं दुकानाचं काम मुलावर सोपविलं आणि स्वत: शेतीकडे लक्ष द्यायला सुरूवात केली. घरात सून आल्यामुळे सुंदरव्वालाही आता थोडी फुरसद मिळायला लागली. ती शेजारीपाजारी बसायला जाऊन जरा गप्पा टप्पा करायची, थोडं बहुत काम करायची, बाकी इतर लहानमोठी कामं सूनच करायची. अशा प्रकारे जीवन व्यतित होऊ लागलं. अनंताच्या संध्याकाळपर्यंत दुकानात बसून राहण्यामागं एक कारण होतं. त्याच्या बहुतेक मित्रांना वेळ नव्हता. ते कित्तूरच्या साखर कारखान्यात कामाला लागले होते. सकाळचं जाऊन ते संध्याकाळी कामावरून परतत म्हणून हा दुकानावर बसायला लागला. बाप सायंकाळी दुकानावर जाऊन अनंताला घरी धाडायचा. अनंत विड्यांचं एक बंडल आणि आठ दहा सुपाऱ्या खिशात टाकून दुकानातनं बाहेर पडायचा. परतताना जर का तो कधी पोद्दार बाळप्पाच्या दुकानात डोकावला तर बस मग विचारायला नको... तिथं रात्री अकरा-बारापर्यंत पत्ते कुटणं चालायचं. त्याचे सारे जुने दोस्त तिथंच जमायचे. बाळप्पाही दुकानात एकटाच होता. तिथं कितीही का उशीरापर्यंत खेळणं चाललं तरी त्यात कसली काही अडचण नव्हती. अशा प्रकारे खेळणं आटोपून तो रात्री बारा एकला घरी येऊन झोपायचा. कित्येकदा इंदिरा नवरा परत येईसतो जागत राहायची; दिवा तसाच जळत ठेवायची. तिला काही ना काही बोलायची भारी आस लागून राहिलेली असायची. अनंत कधीमधी चारदोन गोष्टी बोलायचा, नाही तर सरळ झोपी जायचा. हळू हळू पुढं इंदिरानं नवऱ्याची वाट पाहणं सोडून दिलं. आपलं काम आटोपलं की दिवा मालवून ती झोपी जायची. अनंतानं येऊन चारपाचदा हाका मारल्यावर दरवाजा उघडायची आणि फिरून झोपी जायची. अर्धवट झोपेत नवरा येऊन झोपल्याचं कधी तिच्या लक्षात राहायचं तर कधी ते तिला मुळीच स्मरायचं नाही. अशा प्रकारे दिवसेंदिवस हलके हलके इंदिराच्या मनात अनंताविषयीची उदासीनता वाढीला लागली. ती एक वेळ नवऱ्यावर प्रेम करायचा प्रयत्न करून पाहायची तर दहावेळा त्याच्यापासून दूरही पळायची. त्यानं एखाद वेळेस उत्तर द्यायचं टाळलं तर मग त्यानं पुन्हा चारदा जरी चुचकारलं तरी ती त्याच्याशी मुळीच बोलायची नाही.

काहीही असो, ऐन तारूण्यात एकत्र जीवन कंठणारे - एकमेकांच्या सहवासात राहणारे नवराबायको कितीकाळ शारीरिक जवळिकेवाचून तसेच कोरडे राहू शकतील ? काही दिवसांनी अनिच्छेनं का होईना अनंत इंदिरेकरवी आपली वासना तृप्त करून घ्यायचा. नवऱ्याकडून खरोखरीचं सुख प्राप्त होत नसलं तरी इंदिरा त्या तेवढ्यावरच संतुष्ट होती. परंतु या अपूर्ण वैवाहिक सुखाचा दोघांवरही परिणाम झाल्यावाचून राहिला नाही. इंदिरा दिसायला जरी फारशी सुंदर नसली तरी घरकामाच्या बाबतीत मोठी हुषार होती. चुणचुणीत होती. जन्मल्यापासूनच तिच्या अंगची ही हुषारी, चटपटीतपणा आणि अभिमान विकसत

गेला होता. ती वाजवीपेक्षा कमी बोलणारी होती. कधी कधी असं वाटायचं की तिच्या या अभिमानाला जर ही अशी मितभाषी स्वभावाची जोड नसती तर अनंताच्या जीवनाचा ढंग काही वेगळाच जुळून आला असता. कधी कधी तिचं हे आखडूपणाचं वागणं अनंताला तारकाच्या मृदुल स्वभावाशी तुलना करायला भाग पाडी. आणि असं काही झालं की अखेर त्याचं मन व्यग्र होई - त्याला आपलं जीवनच नीरस वाटायला लागे. तारकाच्या संगतीत चांदुरमध्ये घालविलेल्या दिवसांच्या स्मृती एक एक करून त्याच्या डोळ्यासमोर थुईथुई करून नाचू लागत. त्याचं तारकावरचं प्रेम आणि तिचं इथं या घरात झालेलं वास्तव्य हे सारं त्याला आठवू लागायचं. त्यानंतर घडलेल्या घटनांच्या आठवणी सरशी त्याचं हृदय शतशः विदिर्ण होऊन जाई आणि त्याच्या डोळ्यातून घळघळा अश्रू वाहू लागत. असं काही झालं की अनंत मनाशी विचार करी: 'मीच तिला घालवून बसलो. आता ती प्राप्त होणं अशक्य आहे.' मग त्याच्या मनात हा विचार पक्का रूतून बसल्यासारखा होई. काहीही असो या साऱ्यामुळे अनंताच्या व्यक्तिमत्वाला विक्षिप्तपणा वाढीला लागला होता. तो विक्षिप्त झाला होता हेच खरं.

सुरूवाती सुरूवातीला सुंदराबाई सुनेवर स्तुतिसुमनांची जणू वृष्टी करीत असायची. इंदिराच्या हातून काही चुकलं माकलं तर ती त्यावर लगेच पांघरूण घालायची - अनंतापासून ते लपवून ठेवायची. मोठ्या मायेनं ती तिची चूक तिला हळुवारपणे समजावून सांगायची. पण पुढे जसजसे दिवस जायला लागले तसतसे सुनेला सुधारायचे तिचे सारे प्रयत्न पालथ्या घड्यावरच्या पाण्याप्रमाणे व्यर्थ ठरायला लागले.

अनेकवेळा ते सहन न होऊन ती तिला ताडकन टाकूनही बोलायची, 'इंदिरा, हल्ली हल्ली तुझं असं हे काय होतंय- कशी वागत्येस तू ?'

'कशी ?'

'जसं काही तुला माहितच नाही. तू सुरवाती सुरूवातीला कशी वागायची आणि आता कशी वागायला लागलीयस ते ! पहिल्यासारखी का नाही वागत तू ?'

'पहिल्यासारखी म्हणजे कशी ?'

'हे आपलंच घर आहे- हे आपलंच काम आहे अशा आपुलकीच्या भावनेनं तू वागायचीस प्रथम प्रथम- मला त्यावेळी वाटलं चला, आपला भार कमी झाला- सून सुगरण आहे, हुषार आहे... घेईल आपल्या आपण सारं काही सांभाळून...'

'आणि मग आता काय झालं ?'

'मी लोकांना म्हणायची सून कित्ती चांगली आहे माझी. पण आजकाल तुझं वागणं बघ तू. घरात वस्तू पडलेली असेल तिथं आपली पडलेलीच असते- ती उचलून जागच्या जागी ठेवावी असं कधी तुझ्या मनात येतच नाही. घरभर आपला पसारा पडलेला-तो आवरायची कधी तुला बुध्दी होत नाही. चुलीवर काही शिजत असेल तर ते तसंच

शिजतच राहतं- त्याकडे वेळच्या वेळी पाहणं नको ? सासरे बाहेरून आले तरी तुला त्यांची पर्वा नसते- नवरा आला तरी तुझं त्याच्याकडे लक्ष नसतं. कामात मनच नाही घालत तू- कसा होणार अशानं प्रपंच ?'

'मी आहे बरी आहे. मी तर कुचकामाची आहे, बिघडल्येय. आखडू आहे- आपण मला घरी आणून स्वत: काट्याकुट्यात फसल्यासारख्या झाल्यात- स्वत:ला निष्कारण संकटात लोटलंय...'

'शी: शी: असं एवढं म्हटल्यावर तुझ्या तोंडी कोणी लागावं बाई!' असं म्हणून सुंदराबाई तिला काही सांगायबोलायचा नाद सोडून देई. गप्प बसे.

सासू सुनेत भांडण होवो वा न होवो, घर काम होवो वा न होवो, निसर्ग कोणासाठी आडून राहत नसतो, की कोणाच्या सुधारण्याची वाट पाहत नसतो. त्याचा नियम ठरलेला असतो आणि त्यानुसारच तो सदैव वागत असतो. आता इंदिरा गर्भवती होऊन बाळंतपणासाठी माहेरी गेलीय. आता सारं घरकाम आनंदानं करणं भाग पडलंय. अनंत दुकानातनं घरी कधी झोपायला आला तर आला, नाही तर नाही. दुकानातनं निघाल्यावर रात्री तो बाळप्पाच्या दुकानी पत्ते खेळायला जातो- रात्रीचा तिथंच पसरतो. सकाळी चहा प्यायला घरी आला तर आला, नाही तर नाही- इतर कुठं तरी चहा पिऊन वेळ भागवायची.

त्या दिवशी दुपारची आपलं घरकाम वगैरे आटोपून आंगणात उतरत होती तेवढ्यात एक म्हातारी, 'काय करत्येस सुंदरा ?' असं म्हणत आत आली.

थोडावेळ इकडच्या तिकडच्या गोष्टी बोलून झाल्यावर म्हातारीनं विचारलं, 'तुझा अनंता झोपायला घरी येत नसतो वाटतं ?'

'का, येतो की!'

'नाही तसं काही विशेष नाही. रोज सकाळचा तो त्या बाळप्पाच्या दुकानात दिसतो, म्हणून विचारलं-' सुंदरव्वाला वाटलं म्हातारीला पुढं आणखी काही तरी सांगायचं होतं पण न सांगताच गप्प झालीय. जराशानं सुंदरव्वा म्हणाली, 'तिथं चार सारखी बारखी पोरं जमतात आणि पत्ते- सोंगट्या वगैरे खेळतात- कधी कधी तो मग तिथंच झोपतो. आता त्याचं घरात काय ठेवलंय- बायको तर काही इथं नाहीए. कुठेही पडून राहिला तरी त्यानं काय असा मोठा फरक पडणार आहे...'

'नाही, माणूस कुठंही झोपला आणि कुठंही रात्रीचा पडून राहिला म्हणून फारसं काही बिघडत नाही खरं पण शेजारी पाजारी लग्नाला आलेल्या एक दोन पोरी आहेत. त्याना वयात येऊन चार चार वर्षं उलटलीयत की!'

सुंदरव्वालाही अनंताच्या चालचलवणुकीविषयी हल्ली हल्ली जरा संशय यायला लागला होता. जे ऐकलं त्यानं तिच्या काळजाचा थरकाप उडाला पण तरीही ती जरा फणकाऱ्यानंच

म्हणाली, 'त्या लग्नावाचून तशाच राहिल्या तर त्याला कोण काय करणार बाई! त्या आळीत पोरांना यायजायला बंदी आहे वाटतं? मोठं कठीण आहे ते काम, गावात इतरत्र काय लग्नावाचून मुली राहत नाहीत होय?' काही का असेना, अनंत तिचा पोटचा पोरगा होता.

सुंदरव्वाच्या या तिखट उत्तरानं म्हातारी काहीशी घाबरली, म्हणाली, 'जाऊ दे ग, बाई, तुझ्या पोराच्या बाबतीत कोण काय म्हणतं,' मग कांहीसा विचार करून म्हणाली, 'मोलमजुरी वर जगतायत तर मग पोरीला वर शाळेत कशासाठी धाडतात हे लोक? उद्या ह्या पोरी शेतीपोतीच्या कामाला थोड्याच उपयोगी पडणार आहेत!' पण मग तिचं तिलाच कळून चुकलं की आपण जे काही बोललो त्याला कसलं काही शेंडाबुडूख नाही की कसला काही अर्थही नाही.

'कोण कोणाची मुलगी? जरा नीट स्पष्ट स्पष्ट काय ते सांग ना?'

'सातव्वाची मुलगी संध्या थेट एखाद्या ब्राह्मणाच्या मुलीसारखी दिसते- रंगानं गोरी आहे वर शिवाय आणखी थोडी बहुत शिकली सवरलेली आहे. कानात डूल, तिरपा भांग; कानावर मारे केसाचे फुगे असं या कार्टीचं नटणंथटणं. ही काळतोंडी अशा अवतारात मोलमजुरी करणाऱ्याची पोरगी थोडीच वाटते? आईबापानी तिचं लग्न वेळच्यावेळी उरकाय नको का? लेक बरोबरीची झालीय आणि तिला यांनी खुशाल लग्नावाचून तसंच घरात बसवून ठेवलंय!'

'बसून ठेवलंय तर इथं कोणाचं काय जातंय...?' म्हातारीकडनं आणखी बातमी काढून घ्यायला उतावळ्या झालेल्या सुंदरव्वानं अस्वस्थपणे म्हटलं.

त्यांनी तर तिला तशीच बसवून ठेवलीय खरी. पण पोरांना तर बिघडवतायत ना! त्यांची काय वाट लागणार आहे उद्या? तिच्या पायी उद्या पोरं आपआपसात मारामाऱ्या न करोत.' जरा विचार करून म्हातारी उत्तरली.

सुंदरव्वानं तिच्या बोलण्याचा आशय लगेच ताडला. तिच्यातलं मातृहृदय घाबरून गेलं. पण वरकरणी तसं काही एक न दर्शविता ती जरा धाडस करून म्हणाली, 'काय करतील! आमच्याकडच्या पुरूषांनी काय बांगड्या भरल्यात? आपल्या पोरीला त्यांनी नीट ताब्यात नको ठेवायला? त्यांना काय एवढी साधी गोष्ट कळत नाही?'

## 20

सूर्य मावळल्याला तास झाला असेल. अप्पण्णा शेतावरून परतला. त्याच्या डोक्यावर गवताच्या भारा होता. तो एका कोपऱ्यात उतरवून ठेवीत त्यानं अम्मव्वाला विचारलं, 'आई, तू जेवली नाहीस अजून ?'

'कोण अप्पू ?' असं विचारीत ती म्हणाली, 'नाही- अजून नाही. तुझ्या बरोबरच जेवायला बसावं म्हणून वाट पाहत बसल्येय मी-'

'मी जरा म्हशीच्या धारा काढून दूध घेऊन येतो- नंतर मी तुलाही जेवायला वाढतो आणि मी स्वत: ही घेईन जेवून. ती केव्हा गेली ?'

'गेली नाही, घरातच आहे.'

'कां नाही गेली ती ?'

'कशी जाणार ? गाडी आली तरच जाणार ना ? बिचारी पोर चिमणीच्या पोरासारखी त्यांची वाट पाहून पाहून थकली. चांगली संध्याकाळ झाल्यावर मग सिध्दाच्या हाती ओटी-आहेराचं सामान धाडून दिलं झालं.'

'आहेराचं तरी कशाला धाडलं तिनं ? त्याना जर आमची गरज नाहीए तर उगाच आगंतुकासारखं जाण्यात काय हशील ?'

'मागाहून आपल्यावर ठपका नको यायला कोणाचा, पोरा. एकदा का गोष्ट बिघडली की लोक रत्नाला काय म्हणतील ? नंतर पस्तावूनही काही साधणार नाही.'

'त्यासाठी त्याला येवढं महत्व कशासाठी द्यायचं ? तो या बाजूला काहीतरी काम निघालं म्हणून आला- आलोच आहोत इकडे तर जाता जाता यांच्या घरीही डोकवून जावं म्हणून आला झालं. आमंत्रण द्यायला म्हणूनच आला असता तर संध्याकाळी मी परत येईपर्यंत वाट पाहत नसता थांबला ! आणि ही खुळाबाई तिकडे जायसाठी जीव पाखडून राहिलीय. वर्ष झालं हिच्या लग्नाला- कधी एकदा तरी येऊन चौकशी केली... कशी काय आहेस तू म्हणून ?' अप्पण्णा सोयऱ्याधायऱ्यांवर राग काढत होता. आहेर धाडला म्हणून तारक्कावरही त्याचा थोडासा राग होताच. त्या तशाच मन:स्थितीत आत जात उपरोधानं त्यानं विचारलं, 'काय तुझ्या मामेभावाचा तो ऋतुशांतीचा सोहळा कसा काय झाला ?'

तारक्का हातपाय धुवायसाठी पाणी गरम करावं म्हणून चुलीत विस्तव पेटवीत होती.

'कोण जाणे गाडी का नाही आली ती ? ऋतुशांतीचं पुढबिढं तर ढकललं नाही ? नाहीतर मामा असं नाही करणार कधी-' त्याच विचारांच्या लहरीत ती पुढं आणखी विचार करीत राहिली, 'कोण जाणे अनंताला काही झालं बिलं तर नाही... त्यानं त्या पोरी बरोबर ऋतुशांती करायला नकार वगैरे तर दिला नसेल ?' त्या विचारांच्या लहरी सरशी तिच्या डोळ्याला आसवांची धार लागली. स्वाभाविकपणे त्या तशा अवस्थेत नवऱ्याचं बोलणं तिला ऐकू गेलं नाही.

अप्पण्णानंच फिरून उपरोधगर्भ स्वरात विचारलं, 'कां बोलत का नाहीस ? ते लोक न्यायला आले नाहीत त्याचा राग माझ्यावर कशाला काढतेस ?

तारक्का लगेच सावध झाली. एकदम झोपेतून जाग यावी तसं आसवं पुशीत स्वत:च्या विचारांच्या नादात हरवल्यासारखी होत एकदम पुटपुटली, 'तुमच्यावर रागवायचा मला काय अधिकार- कोण तुम्ही माझे हक्कानं रागवावं असे ?' हे एक बरं झालं की स्वयंपाक घरातल्या त्या अंधुक प्रकाशात अप्पण्णाला तिच्या गालांवरून ओघळणारे अश्रू काही दिसले नाही.

'कां मी तुझा कोणीच का नाही ?' अप्पण्णा म्हणाला, आवाज काहीसा कठोर होता. मग थांबून तिला दाटीत म्हणाला, 'तर मग या माझ्या घरात कशाला गं राहिलीस तू बाई ?'

आपल्या तोंडून काहीतरी भलतंच निघून गेलं याची आता कुठं तारक्काला जाणीव झाली. लगेच लटक्या प्रेमानं काही बाही बोलून सारवा सारव करीत म्हणाली, 'चार दिवस तुम्ही चांगलं वागता आणि मध्येच मग तुम्हाला ही अशी विचित्र वागायची हुक्की येते! मी येवढंच म्हणाले की गाडी घेऊन मला न्यायला यायला ते कोण असे माझे लागून राहिलेत ? आता मी असं म्हटलं तर त्यात तुमचं काय वेचलं ?' असं म्हणत तिनं लाडे लाडे त्याला हातपाय धुवायला गरम पाणी दिलं. अप्पण्णाचा सारा राग कापरासारखा तत्काल नाहीसा झाला. तो म्हणाला, 'आता ते लोक कशाला बोलवायला येतील ? जाऊ दे ग- कुठला कोण सख्खामामा आणि कुठलं काय नातं ? कोणाची साधी ओळख देखील नाही. त्यांची आशा धरायची अन् त्यासाठी स्वत:चा जीव टांगणीला लावायची आपल्याला जरूर तरी काय ? आपलं आपल्या घरी कशाला काय कमी आहे ?'

'काहीही कमी नाही !' तारा म्हणाली. तिचं अवघं काळीज कधीच करपून गेल्यासारखं झालं होतं. आपातत: तिच्या मुखातून एक दीर्घ उसासा बाहेर पडला.

अम्मव्वा बाहेरनं हळूहळू आत आली- म्हणाली, 'आम्हाला कुठल्या गोष्टीची कसली काही कमतरता नाही- हे ठीक आहे, पण असं वागणं त्याना शोभतं का ?...' मग जरा थबकून पुन्हा म्हणाली, 'तो ताराला बोलवायला कुठं आला होता ? फक्त गळ्यातला

हार घेऊन जायसाठी तर आला होता.' आणि विषय पुढं वाढविला.

'गळ्यातला हार! कुठचा?' आश्चर्ययुक्त स्वरात अप्पण्णानं विचारलं.

'त्यानी लग्नाच्या वेळी गळ्यात घालायला म्हणून दिला होता. तो आजवर इथंच आपल्याकडे पडून राहिला होता. असाच किती दिवस ठेवून घ्यायचा. म्हणून ते काल आले तेव्हा त्यांचा जिन्नस त्यांना देऊन टाकला.' चुलीत चांगला जाळ उफाळला होता. थोडा पाण्याचा हबका मारीत तो कमी करीत तारा म्हणाली.

'अस्सं म्हणून गळ्यात हार दिसत नव्हता. मला वाटलं तुटलाबिटला असेल म्हणून काढून ठेवला असणार!'

अम्मव्वा म्हणाली, 'तुटेल कशाला? तो मागून घेऊन गेला. पोर परवा धरून ओक्याबोक्या गळ्यानं वावरतेय.'

अप्पण्णानं रागानं विचारलं, 'तुझ्या माहेरच्यांना स्वतःला ऐपत नव्हती की काय? असा दुसऱ्यांकडून हार आणून तो गळ्यात घालायला दिला ते?'

'त्यांच्या लेखी ती घरचीच वस्तू होती कोणा परक्याची थोडीच होती! आता आई दुसरा हार करून घालील आम्ही थोडेच त्यांच्या हारावर विसंबून आहोत!'

'नाही तुझी आई नाही करून देणार मीच करून घालीन. मी त्या अर्थानं नव्हतो म्हणालो मी काय कोणी अलबत्या गलबत्या आहे होय, की तुझ्या मामानं यावं आणि सरळ आपला गळ्यातला हार काढून घेऊन जावं ते!' मग आपल्या आईकडे वळून म्हणाला, 'पाहिलंस, सुनेची ओटी भरायला यायचं आमंत्रण करायच्या निमित्तानं आला आणि हार घेऊन गेला पुन्हा एकवार भेटू तर दे मग दाखवतोच त्याला.'

त्याला मध्येच आडवीत दुपार धरून दडपून ठेवलेल्या रागाला वाट करून देत अम्मव्वा म्हणाली, 'तो कशाला आमचा उंबरा ओलांडील? ते आमच्या दारात पाऊल टाकणार नाहीत आणि आम्ही त्यांच्या दारात पाऊल टाकणार नाही. त्यांनी न्यायला गाडी धाडली नाही ना बस्स तर संपलं त्यांचं आमचं नातं.'

सासूच्या या निर्वाणीच्या बोलण्यानं तारकाचं काळीज हादरलं. येवढंच नव्हे तर त्या रात्री तिनं तोंडात अन्नाचा कण घेतला नाही. मनातल्या मनात आपल्या ग्रामदेवतेची - लगमव्वाची प्रार्थना करीत राहिली की, 'आई लगम्मव्वा, तू माझी आणि अनंताची साधी दृष्टिभेट देखील होऊ देणार नाहीस होय? नको ग अशी येवढी कठोर होऊ नकोस. प्रार्थना आहे माझी तुला.'

या प्रसंगानंतर काही दिवसांनी रत्नव्वा मुलीला भेटायला आली. तेव्हां हे इतके दिवस इकडे न येऊ शकल्याचे कारण स्पष्ट करीत म्हणाली, 'मला वाटलं होतं की तूही इन्दिची ओटी भरायला येशील आणि तिथंच तुझी भेटगाठ होईल म्हणून! पण ते लोक गाड्या रेल्वे लाइनीकडच्या रस्त्यानंच परस्पर घेऊन गेले म्हणून मुद्दाम तुला

भेटायला म्हणून पुन्हा मला इकडे यावं लागलं.'

'त्यांनी अनंताला काय काय दिलं ? तू तिथं किती दिवस राहिलीस ? सोहळा सारा व्यवस्थित पार पडला ? घरी बाबा कसे आहेत ?' असे एकामागून एक प्रश्न तारानं विचारले.

रत्नव्वा म्हणाली, 'यांनी आधीच त्यांच्याकडून पैसे घेतले होते. त्यामुळे यावेळी खास असं काही दिलं नाही त्यांनी. त्यांच्यापेक्षा किती तरी जास्त आम्ही तुझ्या ऋतुशांतीच्या वेळी दिलं होतं. ज्या दिवशी ते इथं तुला बोलवायला आले होते त्याच दिवशी मी चांदूरहून गेले- आठ दिवस राहून मग घरी परत गेले.'

'जाऊ दे ग आई, त्यांचं बोलवायला येणं म्हणजे रस्त्यानं जाणाऱ्याला आपलं हाक मारून बोलण्यासारखं होतं. नुसतं देखल्या देवाला दंडवत केल्या सारखं. आमंत्रण करायची काय ही पध्दत झाली होय ? येऊन व्यवस्थित आमंत्रण करून बोलवावं, नाहीपेक्षा आपल्या घरी गुपचूप बसून रहावं. त्यांना कोणी काय शिक्षा थोडीच करणार होतं की दंड भरावा लागणार होता ?' रागारागानं तारा म्हणाली.

रत्नव्वानं वस्तुस्थिती स्पष्ट करीत म्हटलं, 'तो बिचारा तरी काय करणार ? प्रत्येकासाठी वेगळी वेगळी गाडी कुठून आणणार ? माझ्यासाठी एक गाडी धाडली होती. त्यानं विचार केला तुला आमत्रंण करून बरोबर घेऊन जावं. पण तो मागे घरीच राहिला. वाटेत आम्ही बायकांचं कोण ऐकणार ? ते गाडी पळवीत पुढेच निघाले. दोन गाड्या आमच्या पुढे धावत होत्या आणि त्यांच्या पाठोपाठ आमची त्या मागोमाग. सुंदरव्वानं एकदोन वेळा सांगून पाहिलं, नाही म्हणून उगाच कोणाला कशाला फुकट बदनाम करू ? अनंत तर सांगून सांगून थकला. पण वाटेत पुढल्या गाड्यांना सोडून कसं काय येता येणं शक्य होतं ?'

तारा म्हणाली, 'सगळे हुषार आहेत झालं !'

हे सारं ऐकून अम्मव्वा काहीतरी काम निघालं म्हणून बाहेर जायला निघाली. जाता जाता म्हणाली, 'रत्ना, फार दिवसांनी आलीयस- तुम्ही मायलेकी निवांत बोलत बसा-मी बाहेर जाते.'

रत्नव्वानं तिला हाक मारीत म्हटलं, 'अहो तुम्हीही येऊन बसा ना इकडे. आम्हाला तसं काही खास विशेष असं नाही बोलायचं.'

तसं तारा म्हणाली, 'माझी सासू फार चांगली आहे गं, आपल्याकडचं कोणी आलं तर त्यांच्या बरोबर आत येईल, थोडा वेळ बोलत बसेल आणि मग जेवायचा आग्रह करून, स्वत: बाहेर जाईल. या आधी बाबा आले होते ना त्यावेळी त्यांची अशीच उठबस केली होती. बाबा बरे आहेत ना ? त्यांच्या जेवण्याखाण्याची काय व्यवस्था केलीस ?'

'शेजाऱ्या पाजाऱ्यांना सांगून आलेय. रात्री थोडा भात घेतील शिजवून. तू तर सुखात आहेस ना ? तुझी सासू खरंच फार चांगली आहे! काही कसली कटकट नाही, कुरबुर नाही.' मग लेकीला नीट न्याहाळून पाहात अम्मव्वा बाहेर जाताच काळजीयुक्त स्वरात रत्नानं पुढं आणखी विचारलं:

'घरधनी कसं वागतात तुझ्याशी ? व्यवस्थित का नाही तो ? मग अशी का झालीयस ? तोंड का सुकल्यासारखं दिसतंय एखाद्या वाळक्या भेंडीसारखं- तोंडावर कसलं काही तेज कसं ते नाहीच. पूर्वी कशी छान रसरशीत दिसायचीस !'

'अशातलं काही नाही ग-' असं म्हणत तारका आईला चहा करून द्यायच्या मिषानं उठली आणि तिच्या ध्यानी येणार नाही अशा बेतानं तिनं गुपचूप डोळे पुसले.

रत्नव्वा झटकन उठून पुढे होत म्हणाली, 'काय झालं ? सांग ना- या अशा उकाड्यात मला चहाची खरंच काही गरज नाही.' तिच्या बोलण्यात एक आर्जव होतं.

'घे ना आई- मी करून देते- आम्हा मंडळीचीही चहाची वेळ झालीच आहे-' असं म्हणत ती चहासाठी आधण ठेवायला स्वयंपाक घरात निघूनही गेली.

रत्नव्वाच्या येण्यानं तारकाला असीम समाधान लाभलं. अप्पण्णालाही संतोष वाटला. त्यानं बायकोला सासूबाईंसाठी चांगला गोडाधोडाचा स्वयंपाक करायला सांगितलं. परंतु त्या दिवशी सासूनं घरून येताना बरोबर करून आणलेले लाडू, चकल्या-कडबोळी आणि पोळ्याच घरातल्या साऱ्यांनी चांगले दोनदोनदा हाणले.. तरीही ते संपलं नाही. म्हणून मग तारानं गरमागरम भाताशिवाय आणखी दुसरं काही शिजवलं नाही. सासूनं सांगितल्यानुसार रत्नव्वानं आणलेले फराळाचं थोडं थोडं शेजाऱ्या पाजाऱ्यांना ती वाटून आली. फार दिवसांनी आल्या कारणानं जावयानं सासूबाईंना चार एक दिवस राहून जा आणखी असा आग्रह केला. जावयानं विनंती केल्यामुळे रत्नव्वालाही चार दिवस राहणं भाग पडलं. आता एकदा राहायचं म्हटल्यावर नुसतं स्वस्थ थोडंच बसणार होतं ? म्हणून मग लेकीला न्हावू घालावसं वाटलं. कितीतरी दिवसात आपण आपल्या हातांनी पोरीला न्हावू घातलं नाही, चांगली पाठ चोळून काढली नाही- अशा विचारानं पाणी तापवायच्या व्यवस्थेला लागली. ते पाहून अम्मव्वा म्हणाली, 'रत्ना तूही चार तांबे अंगावर घे, तिथं तुला तरी कोण न्हावू घालायला आहे ?' 'माझं काय- कोणी ना कोणी चार तांबे अंगावर घालायला वेळेला मिळतंच म्हणा...' मग काही एका विचारानं रत्ना तेवढ्यावरच बोलायची थबकली.

म्हातारीनं तिच्या बोलण्याचा भाव जाणला. म्हणाली, 'तुझी लेक कुठं अशी दूर पडलीय, अजूनही आपल्या गावातच आहे असं धरून चाल. तुझंच येणं जाणं कमी होतंय इकडे.' नंतर काही एक स्मरून तिनं कुतुहलानं विचारलं, अरे हो रत्ना, तुझी नणंद नव्या सुनेबरोबर कशी काय वागते ?'

'जळली मेली ती, लग्नानंतर चार महिने व्यवस्थित वागलीन सुनेशी- मग फिरून आपले पाहिले पाढे पढ पंचावन ! कुत्र्याच्या शेपटीसारखा स्वभाव आहे झाला तिचा. वाकडा तो वाकडाच !'

'पण ती असं का वागते ?'

'आपल्याला तर काही समजत नाही बाई. तिला घरात दुसरं कोणीही नकोय. एक आपण आणि आपला मुलगा बास येवढंच हवंय तिला घरात !'

'तर मग लेकाचं लग्न तरी कशाला केलं ?'

'तिला विचारायला कोण जाईल अन् तिच्या तोंडी कोण लागेल ?' तारा म्हणाली.

'आता विचारणारे ही निघालेतच समजा. आम्ही तर आपलं मानून सारं मिळत गेलो, ते काय म्हणून गप्प बसतील ? आता बघा हं, भाताबरोबर जेवायला कालवण म्हणून दूधच का घेतलंस येवढ्यावरून चिम्मीनं काल सुनेशी कडाक्याचं भांडण केलं. ती सणासाठी जी माहेरी गेली ती अद्याप परत आलेली नाही. ते थोडेच मगदूमवाले आहेत ? तीन तीनदा बोलवायला गेले. ते थोडेच धाडतायत हो ? आता तिच्या पोरीचीही पावलो पावली थट्टाटवाळी करून जीव नकोसा करताहेत ते तिला. तिच्या पोरीला जरा मजा चाखू दे या साऱ्या.'

'आता भीमप्पाला विचारायला का नाही जात मग ?' तारा म्हणाली.

'आम्ही कशाला सांगायला हवं हे ? लोकच तोंडावर थुंकतायत. हल्ली चिम्मीचं आणि त्यांचं बरं नाहीए... पटत नाही त्यांचं एकमेकांशी.'

सुनेला धाडण्याच्या बाबतीत ती मंडळी काय म्हणताहेत ?' अम्मव्वानं मध्येच प्रश्न केला.

'ते तर जावयाला म्हणताहेत की वेगळं बिऱ्हाड केलंत तरच मुलीला धाडू; नाही तर तूच इथं येऊन राहा.'

'मुलगा अजून लहान आहे ना ?'

'कुठला आलाय लहान ? एक तर त्यांच्या घरी जाऊन राहावं लागेल नाहीतर आईला वेगळं काढावं लागेल- या दोन्ही पैकी काहीच करू शकला नाही तर बायकोला सोडून द्यावं लागेल. तिला काय येवढी साधी अक्कल नाही ? अजूनही लहानच आहे की काय ?'

रत्नव्वाचं हे बोलणं अम्मव्वाला रूचलं नाही. एका क्षणात तिचा विचार बदलला: 'उद्या रत्नव्वा माझ्या बाबतीतही हे असंच म्हणू शकेल !' तिच्या म्हाताऱ्या काळजात हा प्रश्न डोकं काढू लागला.

'चला तुम्हालाही चार तांबे घालते.' असं म्हणत रत्नव्वानं त्या विषयावर तिथंच पडदा टाकला.

'जाऊ दे गं, मला कशाला? तू तुझ्या पोरीला घाल चांगलं न्हायाला. तुझं तरी कुठं येणं होतं नेहमी.' काहीशा संकोचानं अम्मव्वा म्हणाली.

'खूप वेळा वाटतं यावं म्हणून. पण घर सोडून कुठं जाणं का होत असतं माणसाचं?'

'तुला येता येणं किती कठीण आहे याची कल्पना आहे मला. म्हणून तारा महिन्याची बाजूला बसली की चौथ्या दिवशी मीच तिला चांगली पाठ रगडून न्हायाला घालत असते. तिचा नवरा पाणी तापवून न्हाणी घरात काढून ठेवतो आणि मग मी तिला न्हाऊ घालते. हवं तर विचार आपल्या लेकीला.' जुन्या जमान्यातल्या म्हाताऱ्या अम्मव्वानं म्हटलं.

'अहो, यात विचारायचं काय? तुम्हाला मुलगी- सून सारं काही तीच आहे ना आता? वेगळी का कोणी आहे ती तुम्हाला?' असं म्हणत तारक्काकडे वळून तिला चार उपदेशाच्या गोष्टी समजावून सांगत रत्ना म्हणाली, 'आणि हे बघ तारा, तूही महिन्यातनं चार आठ वेळा आपल्या सासूबाईंना नीट न्हायाला घालीत जा. वडीलधाऱ्यांची सेवा करणं प्रत्यक्ष परमेश्वराची सेवा करण्यासारखंच असतं. त्यांच्या आशीर्वादाच्या पुण्याईनं चारपाच मुलं बाळं खेळू लागतील तुझ्या घरात.'

'मी ही देवाला नित्य हीच प्रार्थना करीत असते, ताई,' आकाशाच्या दिशेनं हात जोडीत ती म्हणाली. जरा थबकली आणि पुन्हा म्हणाली, 'हिला पहिल्यांदा दिवस गेले- चांगले दोन महिने गेले- हे पाहून मला कोण आनंद झाला. पण पोर आपली सुकतच चाललीय. घरात खाण्यापिण्याला कशाला काही कमी नाही. परमेश्वरानं अगदी भरभरून सारं काही दिलंय. घरचं सारं देणं घेणं हिच्याच हातात आहे. काय मनाला येईल ते खावं, हवं ते द्यावं- तिची ती पूर्ण मुखत्यार आहे.'

'तुमच्या पुण्याईनं आशीर्वादानं सारं काही व्यवस्थित होईल.'

त्या दिवशी रत्नव्वानं लेकीला तसंच विहिणीला चांगलं तेल लावून अंग चोळून चोळून नहायला घातलं. दुसऱ्या दिवशी नकोनको म्हणत असतानाही तारक्कानं आईला चांगल्या कडकडीत पाण्यानं नहायला घातलं. न्हाणी आटोपल्यावर आई आणि लेक आतच झोपल्या. सासू आल्यापासून गेले चार दिवस अप्पण्णा बाहेरच झोपायचा. रात्री खूप उशीरापर्यंत मायलेकीच्या आपआपसात गप्पा गोष्टी चालायच्या. बाहेर झोपलेल्या अप्पण्णाला त्याचं बोलणं नीटसं ऐकू येत नसायचं. 'माय लेकी बऱ्याच दिवसांनी एकमेकींना भेटत आहेत. तेव्हा काहीना काही हितगुजाच्या गोष्टी करीत असणार झालं!' अशा विचारानं तो झोपी जायचा. मधूनच कधी तिला जाग यायची तरी तेव्हाही यांच्या आपल्या गप्पा सुरू असायच्या. एक दिवस या मायलेकींनी सकाळ होईस्तो झोपच आली नाही. इकडचं तिकडचं बोलणं करता करता रत्नव्वानं विचारल, 'अजूनही तुझा नवरा कधी मधी गावात चक्कर टाकत असतो?'

'जात ही नाही, आणि तिला सोडीतही नाहीत...'

'असं काही असेल याची आधी आम्हाला कल्पना नव्हती, पोरी. हे म्हणजे आगीतून उठून फुफाट्यात पडल्यासारखंच झालं आहे! ते काहीही असो- पण घरातला पुरूष दुसरीकडे मन गुतंवतोय म्हणजे वाईटच ते.'

'मनाप्रमाणे नवरा मिळायला नशीब चांगलं असावं लागतं, आई!' तारा म्हणाली

पोरीचे हे उद्‌गार ऐकले जणू कोणी आपल्या काळजाला डागतयसं होऊन गेलं. थोडा वेळ कोणी काही बोललं नाही. दोघीही गप्प राहिल्या. तारक्काच्या डोळ्यातून झडणारे अश्रुबिंन्दू तिच्या गालावर ओघळले. रत्नव्वानं ते पुसत दाटल्या गळ्यानं म्हटलं, 'का माणूस तर भला दिसतोय- आणखी दहा ठेवीना, तुझ्याशी तर चांगला वागतो एवढे पुरेसे आहे, पुरूषांना कसं आवरणार गं!' मुलीच्या मनस्थितीची कल्पना नसल्याकारणाने रत्नव्वाच्या तोंडून हे शब्द बाहेर पडले.

'पुरूषांना काही धरबंद नाही, कोणी अडवणार नाही. म्हणून हे असं घडतं.'

'म्हणून काय झालं? तिलाही सांभाळून घे. ती आली की तिच्याशी समजुतीच्या दोन गोष्टी कर. ती तुझं काय घेऊन जाणार आहे? आता ती जर त्याला आवडत असेल हवीशी वाटत असेल तर तुलाही तिच्याशी जरा जमवून घेणं भाग आहे. त्यालाही धरून राहिलं पाहिजे.'

'हो तिला बोलवणं पाठविलं होतं. पण ती काही आली नाही. आम्ही तरी काय करणार; फक्त मुलगी तेवढी येते. पण तीही आज चार दिवस होतील इकडे फिरकली नाहीए. कुठ गावाला वगैरे गेली असतील.

'मुलगी कशी आहे, सुंदर आहे का?'

'सुंदर आहे आणि फार हुषारही आहे. अजून जरी जमिनीत पेरलं तरी उगवणाऱ्या दाण्यासारखी सतेज आहे ही पोर! सुरूवाती सुरूवातीला काही द्यायला जावं तर घ्यायची नाही ही पोर; आता मात्र काही हवं असलं तर ते घेतल्यावाचून माझी पाठ सोडत नाही मुळी. ती एक दिवस जरी आली नाही तरी मला करमत नाही. अशी बडबड बडबड करत असते की विचारू नकोस.'

'आमच्या नशिबातच मुलं नाहीत...'

'जाऊ दे गं मुलापायी काय असं मोठसं सुख लाभत असतं माणसाला!' याबाबतीतली मुलीची निराशा पाहून रत्नव्वा भारी कष्टी झाली. ती विचार करू लागली. 'आम्हाला तर ही एवढीच एकुलती एक मुलगी आहे आम्हाला वाटे हिला किमान दोनचार मुलं होतील-पण मुलं झालीच नाही. एक संस्कार उधळला तसं दुसरं लग्न करून दिलं...' तिच्या डोळ्यासमोरून ताराच्या बाळपणापासून तो आजपर्यंतच्या जीवनाचा सारा चित्रपट झर्रकन सरकून गेला. शेवटी ती म्हणाली, 'कुठे कोणाला विचारून पाहायचं होतंस

पोरी. तुझ्या बरोबरीच्या मुली तर चार चार पोरांच्या आया झाल्यात तू मात्र अजून तशीच्या तशीच राहिलीयस...!'

'कोणाला विचारायची काय आवश्यकता आहे? इथं कुठं कशाला काही कमी आहे. सारं व्यवस्थितच आहे की!'

तारक्काच्या तोंडाकडे टक लावून पाहत रत्नव्वानं विचारलं, 'काय व्यवस्थित आहे. काय ठीक आहे?'

'दिसत नाहीए तुला?'

'नाही. मला नाही बाई दिसत काही.'

'या खेपेलाही पाळी टळली त्याला आता दीड महिना होईल की!'

ते ऐकलं आणि रत्नव्वा रोमांचित झाली. मोहरून उठली. ताराला गळ्यात गळा घालीत म्हणाली, 'खोटं तर नाही सांगत माझ्या समाधानासाठी! खरंच दीड महिना झाला आहे?.' तिच्या स्वरात एक आगळी तृप्ती होती: संतोष होता.

'खोटं नाही. खरंच आई, पाळी टळली त्याला आता दीड महिना झालाय.' हे सारं सांगतांना आईच्या सुखाला कुठे तडा जाईल हा भाव ती जपू पाहत होती.

'दडवतेस काय, त्याची लक्षणं का समजत नाहीत?'

काही काळ गप्प राहून, 'समजतात ना- महिना पंधरा दिवसांनी फिरून पुन्हा पाळी सुरू होईल.' व्यथित मनानं तारा म्हणाली.

'तारा...'

'काय?'

'सारं स्पष्ट का नाही सांगत? तुझं बोलणं मला नीटसं उमगतच नाही. मुलं कधी होतील म्हणून आम्ही आकाशाकडे डोळे लावून बसलोयत इथं- बारा देवदेवतांना नवस सायास केलेत आणि तू एक काही धड नीट सांगत नाहीस.'

'काय सांगू?'

'तुझं तुला माहीत आहे,'

'मला माहीत आहे पण...' असं म्हणत तारक्कानं कूस बदलीत आईकडे पाठ केली. रत्नव्वाच्या मनात आलं की आईला उगाच वाईट वाटू नये म्हणून तारक्का तिच्या पासूनकाही तरी बुद्धाच दडवून ठेवतेय... आणि त्या जाणिवेसरशी तिला विलक्षण दु:ख झालं. ती तिची एकुलती एक मुलगी होती. प्रथम आपल्या जवळच्या नात्यागोत्यातली मंडळी आहेत असं मानून तिचं लग्न लावून दिलं- पण तिथं तिला सुख लागलं नाही. आता हे इथंही असंच गळ्यात पडल्यासारखंच झालंय. ह्या विचारानं रात्रभर तिचा डोळ्याला डोळा लागला नाही. दुसऱ्या दिवशी सकाळी रत्नव्वानं जावयाला हाक मारून म्हटलं, 'येऊन आता चारपाच दिवस झालेत मला. आता जाते मी घरी परत.'

अप्पण्णा म्हणाला, 'आणखी दोन तीन दिवस राहा आणि मग जा की खुशाल...'

'असं म्हणू नकोस भाऊ, घरात दुभत्या गाई म्हशी आहेत. त्यांच्या धारा काढाव्या लागतात. शेतावरही जावं लागतं, घरी एकटे कुठं कुठं बघतील; अन् काय काय करतील! तंबाखू कापायला झालाय- एका शेतातल्या धान्याची कापणी झालीय, पण कापलेली कणसं तशीच्या तशी पडून आहेत. खळं लावून मळणी करायला हवी पण बैलच मिळत नाहीत. चार दिवसासाठी म्हणून मी इथं आले होते. कापणी मळणीच्या दिवसात का कुठं असं राहता येतं?' अशाप्रकारे तिनं जावयाची समजूत घालण्याचा प्रयत्न केला.

'तर मग चार एक दिवसांसाठी मीच येतो चला, बैल आणि गाडी घेऊन येतो-कापणी मळणीची कामं उरकून परत येईन.'

रत्नव्वाला नवल वाटलं. 'आजवर जावई कधी एकदाही आपल्या घरी आला नाही आणि आता येतो म्हणतोय- खर्चाबिर्चाची काय व्यवस्था करावी बरं!' असा विचार तिच्या मनात उद्‌भवला. पण आता जावई आपण होऊनच येतो म्हणतोय तर त्याला नाही तरी कसं म्हणायचं? मग स्वत:ला सावरीत ती त्याला म्हणाली: 'तर मग चला... दोन दिवस राहून जा. आम्हाला काय कोणीही काम करून दिलं तरी खूप आहे-पण घरदार सोडून कसं काय येणं जमणार आहे तुम्हाला?'

'इथं सध्या तसं काही विशेष काम नाहीए., शेतीवाडीचं काम सिध्दा पाहून घेईल. कालच केळींना पाणी पाजलंय आणि तिकडचं काम उरकून लौकर परतेन म्हणजे झालं.'

तसं रत्नव्वाच्या मनात एक विचार तरळून गेला: तेव्हां आपला अगदी जवळच्या नात्यातला समजून गावातल्याच मुलाला मुलगी दिली आपण तर त्यानं तिच्या आयुष्याची ती तशी परवड केली आणि आता हा तर आपण होऊन कामाला हातभार लावायसाठी येतो म्हणतोय, तर येऊं दे की बरंच होईल.. याच्या येण्यानं चिम्मव्वाचं चांगलंच नाक कापलं जाईल. म्हणून मग ती त्याला म्हणाली, 'तर मग आजच निघूया आपण चला.'

जेवणानंतर अप्पण्णानं ट्रंकेतनं नवीन साडी काढून ठेवली. म्हातारी अम्मव्वा रत्नव्वाला म्हणाली, 'आम्हाला बाजारात जाणं कांही जमलं नाही. बाज़ार तसा खूप दूर आहे ना आमच्या इथून आणि इथं गावात कापडाचं दुकानही नाही. ही घरातच होती. जाताना नेसून जा.'

'आजच आता कशाला, पुन्हा कधी आली की घडी मोडून नेसून जाईन की!'

'पुन्हा याल तेव्हा एकवार नेसालच हो पण आता ही घेऊन जायला काय हरकत आहे?' अप्पण्णा जोर करीत म्हणाला.

'तुमच्या नशिबानं आम्हाला घरात कशाला काही कमी नाही. लग्नाच्या वेळीही नेसून गेली नाहीस. आता मात्र मी काही एक ऐकणार नाही. यावेळी साडी घ्यावीच

लागेल तुला.' असं म्हणत अम्मव्वानं तिला आग्रहानं साडीची घडी मोडायला लावून साडी नेसायलाच लावली.

रत्नव्वा आनंदानं साडी नेसून तयार झाली. बाहेर सिध्दानं बैलगाडी जोडून आणून उभी केली. अप्पण्णाही नवे कपडे नेसून तयार झाला.. हाती रंगीत चाबूक घेऊन गाडीत जाऊन बसला. तारक्कानं गाठोडं आणून गाडीत ठेवलं. रत्नव्वा निरोप घेऊन गाडीत चढली, मायलेकीच्या डोळ्यातून घळघळा अश्रूधारा वाहायला लागल्या. अप्पण्णा वळून पत्नीकडे हसत पाहत म्हणाला, 'चार दिवसात परत येईन हं.' त्याचं ते हसणं पाहून रत्नव्वाला आपलं जीवन धन्य झालं वाटलं असणार. बैलांच्या गळ्यातल्या घुंगरांनी ताल धरला. गाडी पार दृष्टी आड होईपर्यंत सासू आणि सून त्याना एकटक नजरेनं पाहात राहिली आणि मग घरात गेली.

अप्पण्णा सासऱ्याच्या घरी जावई या नात्यानं पाहुणचार झोडायला म्हणून काही गेला नव्हता, तर तिथल्या पिकाच्या कापणीच्या कामाला हातभार लावावा- ते काम पूर्ण करावे म्हणून गेला होता. चांदूरचे सारे लोक 'मगदूमला चांगली सोयरे मंडळी... चांगला जावई मिळाला. अशी माणसं तर शोधून देखील सापडली नसती...' असंच मुक्तकंठानं म्हणू लागली. काही लोक असंही म्हणाले की, 'यांना तरी आणखी दुसरं कोण आहे? त्यानंच येऊन करायला हवं हे आता. आज ना उद्या हे सारं त्याचंच होणार आहे.' या गोष्टी अप्पण्णाच्या कानी पडल्या नाहीत अशातला भाग नाही, पण त्यानं आपण होऊन आनंदानं धावपळ करून सारं काम व्यवस्थित मार्गी लावलं आणि चार एक दिवसांनी एक तोळा सोन्याची अंगठी, धोतर, पटका आणि इतर काही कापडचोपड घेऊन घरी परतला. परत जाताना त्याच्या मनावर एक गोष्ट दृढपणे कोरली गेली होती की, सासू सासऱ्याची ही सारी जायदाद उद्या माझीच होणार आहे. म्हणून त्यानं तारक्काला म्हटलं, 'आम्ही तुमच्या गावी पोहोचलो तेव्हा तुझी ती वेडपट आत्या बैलाच्या गळ्यातल्या घुंगरांचा आवाज कानी पडताच धावत घराबाहेर आली... आणि समोर आमची गाडी दिसताच मान खाली घालून घरात पळून गेली.'

तारक्कानं काहीशा आनंदानं विचारलं, 'खरंच का असं झालं?' मग जरा थांबून तिनं पुन्हा विचारलं, 'तुम्ही लोक कधी पोहोचलात तिथं? आपली गाडी त्यांच्या घराकडनं कशी काय गेली?'

'प्रहर रात्र झाली होती. बैल सावकाश जात होते ना... सासूबाईंनी त्यांच्या घराकडून गाडी घ्यायला सांगितलं म्हणून तिकडनं गाडी घेतली. ती जशी गाडी पाहून आल्यापावली मागे घराकडे सटकली तशी सासूबाईच म्हणाल्या की ती चिम्मा होती म्हणून!'

'तुम्ही तिला अद्याप कधी पाहिलं नव्हतं?'

'मी कशाला त्या काळतोंडीला पाहायला जाऊ? लग्नानंतर मी तुमच्या गावी कशाला

कधी गेलो होतो पुन्हा ? त्या सुनेलाही ते उद्या तिकडे बोलावून घेऊन येणार आहेत.

'बोलावून घेऊन येणार आहेत ? ते धाडायला तयार झालेत का ?'

'धाडतील नाहीतर काय करतील ? तीन दिवस झालेत लेकानं चिम्माला घरातनं वेगळं काढलंय. ती रडत गागत सगळ्यांकडे गाऱ्हाणी करीत गेली. ऐकलं की मायलेकात चांगलीच खडाजंगी झाली होती.'

अशाप्रकारे नाना गोष्टी सांगून झाल्यावर अप्पण्णानं ताराला आणखी एक गोष्ट सांगितली- म्हणाला, 'नदीच्या वाटेवरच्या खळ्यात मी उंचावर उभा राहून कधी काही काम करीत असलो, की पाणी आणायला जायला निघालेल्या साऱ्या बायका जशा अगदी वळून वळून माझ्याकडे पाहात जात असत. पाहता पाहता एकदा तर एका पोरीचा तोल न सावरता आल्यानं पाण्याचा हंडाच खाली आदळला.'

नवऱ्याचं हे बोलणं ऐकून तारक्काच्या ओठांवर हसू फुललं. तिनं मनातल्या मनात म्हटलं: 'तुम्ही आहातच तसे देखणे- नवल काय साऱ्या बायकांनी तुमच्याकडे असं वळून वळून पाहिलं तर!' पण उघडपणे तिनं त्याला काही एक उत्तर दिलं नाही की काही बोलून दाखविलं नाही.

अशाप्रकारे पाचसहा वर्ष गेली. तारक्काला मुलंबाळं झाली नाही. तिच्या मनालाही शांती- स्वस्थता नव्हती. दिवसेंदिवस तिची प्रकृती बिघडतच चालली होती. कधी कधी तिची मासिक पाळी उशीरानं यायची. जळजळायचं.. आग आग व्हायची. एक दोन ठिकाणी तिची प्रकृती दाखवलीही गेली होती. तेव्हा त्यांनी सांगितलं की, उपचारासाठी एकदोन दिवस हॉस्पिटलमध्ये राहावं लागेल. ते यांच्याच्यानं झालं नाही. माहेरकडची यासाठी तयार होती पण तारक्काची घरातनं सुटका होत नव्हती. रोजचं देणंघेणं, घरची सारी जबाबदारी तिच्यावरच होती. तिच्या औदार्यामुळे कितीतरी घरांचं सुखानं पालन पोषण होत होतं. आसपास राहणारी मंडळी, शेजारीपाजारी तसेच सारे नोकरचाकर तारक्का मोठ्यामनाची एक भली स्त्री असंच मानत. ती कुठल्या लाभालोभाची अपेक्षा न बाळगता हसत खेळत एक एक दिवस काढत होती.

अप्पण्णाची मन:स्थिती काही वेगळ्याच प्रकारची होती. सासरी एकदा जाऊन आल्यापासून तो तिकडे वारंवार जायला लागला. कधी कधी तो जाताना बायकोलाही स्वत: बरोबर घेऊन जायचा. उन्हाळ्याच्या दिवसात तो महिना दोन महिने तिथं राहायचा, शेतीवाडीच्या कामाला हातभार लावून ती कामं पूर्ण करून मगच परतायचा. धान्य कापणीच्या वेळी तो बायकोला माहेरी धाडून द्यायचा. रत्नव्वालाही. तो आपल्या घरी घेऊन यायचा. अशा प्रकारे त्यानं मल्लूचंही मन आपलसं करायला जिंकून घ्यायला सुरूवात केली. तो असं दर्शवायचा की जणू काही आपलं घर आणि सासूरवाडी यात कसला काही फरक नाहीए. दोन्हीही सारखंच आहे- एकच आहे. आपल्या सासूच्या

मनाचा ओढा तिच्या माहेरच्या माणसांकडे... भाच्यांकडे जाऊ नये यासाठीही तो जाणीवपूर्वक प्रयत्न करायचा. एकदा रत्नव्वा होरागेरीला गेली असता तारक्कानं अनंताचा काही विषय काढला होता. त्या तेवढ्यावरून अप्पण्णानं भांडणच उभं केलं. म्हणाला: 'तुम्ही त्याचं नाव माझ्या घरात घेता कामा नये- तुम्हाला हवं असेल तर तुम्ही सारे त्याच्याकडे चालते व्हा... त्याच्या घरी जाऊन राहा. तो हे सारं रागारागानं बोलला रत्नव्वा घाबरून गेली. तिनं जावयाची समजूत घातली. एवढंच नव्हे तर जावयाला उगाच दु:ख व्हायला नको यासाठी आपल्या माहेरची आठवणच विसरायचा तिनं प्रयत्न सुरू केला.

आपल्याला मुलंबाळं नाहीत ती जाणीव अप्पण्णाला कधी कधी निराश करून सोडायची. कसले काही चढउतार नसलेल्या या सरधोपट आळणी आयुष्याचा त्याला डबग यायला लागला. यंत्रवत कष्ट उपसता उपसता त्याला स्वत:च्याच आयुष्याची घृणा वाटायला लागली. कधी कधी मनात यायचं की पुत्रप्राप्तीसाठी दुसरं लग्न करायला हवं. पण त्याला हेही जाणवायचं की आता या आयुष्यात एक पत्नी चांगली हयात असताना तिच्या उरावर दुसरी मुलगी कोण देईल आपल्याला बायको म्हणून! त्या बरोबरच त्याला सासरच्या इस्टेटीचं स्मरण होई- आणि तो, तो विचार तिथल्या तिथंच मनातनं काढून टाकी. त्यानं आपले हे विचार भले किती जरी लपविण्याचा प्रयत्न केला तरी तारक्काला त्याच्या मन:स्थितीची बरोबर कल्पना यायची; सारं काही समजून चुकायची-पण त्यामुळे तिला ना कधी विषाद वाटे वा ना कधी आनंद होई ती आपण होऊन वारंवार नवऱ्याला म्हणायची, 'हवं तर तुम्ही खुशाल दुसरं लग्न करा- तिला का होईनात मुलंबाळं.'

तो म्हणाला, 'कशाला हवीत आपल्याला मुलं? दोघं सुखात आहोत तेवढं ते पुरेसं आहे की! आपली तरी काय मोठी अशी दौलत वाया चाललीय?' तो भले जरी तोंडानं हे म्हणत असला तरी आपल्याला मुलं असावीत ही त्याची अंतरीची इच्छा काही लपून राहत नसे.

ते जाणूनच तारक्का फिरुन म्हणाली, 'तुमच्या मनाला येईल तेव्हां तुम्ही लग्न करा वा करु नका परंतु प्रथम आपली प्रकृती डॉक्टरांना दाखवा. आजारावर व्यवस्थित उपचार करुन आरोग्य सुधारा. शरीर ठीक करा. साधा एक फोड जरी झाला तरी तो लौकर बरा होत नाही. कालच सासूबाई म्हणत होत्या की तुमच्या अंगातलं रक्त नासलंय म्हणून...' अशा प्रकारे ती आपल्याला जे काही सांगायचंय ते सासूच्या नावावर टाकून सांगून मोकळी व्हायची.

अप्पण्णाच्या चुलत भावाच्या मुलीचं लग्न ऐनापूरमध्ये व्हायचं नक्की झालं. साऱ्या घरात लग्नाची जोरदार तयारी सुरु झाली. तारक्काच्या चुलत सासूनं येऊन आग्रहानं म्हटलं, 'तुम्ही दोघांनी यायलाच हवं. माझ्या एकुलत्या एक नातीचं लग्न आहे.' अप्पण्णाही

जायला तयार झाला. तो तारक्काला म्हणाला, 'चल आपण दोघे जाऊन मुलीचं लग्न लावून देऊन परत येऊया. आमच्या लग्नातही ते दोन दिवस खूप राबले होते.'

तारा म्हणाली,'मला नाही यायची इच्छा. आपण जाऊन या.' 'मी नाही येणार म्हणून कसं भागेल ? तिथं मुलीचं कन्यादान मग कोण करील ? त्यांनी आधीच आपल्याला बजावलं होतं कन्यादानचं. मी एकटा तिथं जाऊन काय करु ? एक साडी तर पदरात पडेल - का सोडतेस ? माझ्या पहिल्या लग्नात देवदेवक त्यांनीच बसवलं होतं. त्याची तिला साडीही मिळाली होती. वाटतं आत्ता त्यांना आपल्याला परत आहेर करायचाय या निमित्तानं.'

'ते सारं ठीक आहे - पण या असल्या तोंडानं काही ऐनापूरला यायची माझी इच्छा नाही.'

'कां काय झालं आता त्यात ? आम्ही काय त्यांच्या बापाचे दोन चव्वळ खाल्लेत ? त्यांच्या घरी थोडंच जातो आहोत आम्ही ?'

'गावात जाऊन त्यांच्याकडे न जाताच परत आलो तर लोक काय म्हणतील ?'

'काही एक म्हणणार नाहीत. आणि कोणी काही म्हणालाच तर दाखवीन मी त्याला, चल.'

'मुलाच्या लग्नाच्या वेळी धाडलं नाहीत. ते एक मेलं राहो - पण मामा वारले तेव्हांही जाऊ दिलं नाही तुम्ही मला त्यांच्या प्रसंगात.' तारक्काला मध्येच आडवीत अप्पण्णा रागा रागानं म्हणाला,

मामाला काय माहीत नव्हतं की काय गळ्यातला हार काढून घेऊन गेला त्यावेळी ? काय आम्ही काय भिकारडे आहोत की काय ? कुठला कोण मामा आणि कसलं काय नातं! आजकाल कोणी कोणाला काही मोजतच नाही. मोठा मामा लागून राहिलाय ! कधी एक दिवस भाचीला घरी घेऊन जाऊन मानानं साडी नेसवली होती त्यानं ? त्याची मुलं काय संबंध सांभाळतील तुझ्याबरोबर. ते दिसतंच आहे. आपल्या बायको पोरांच्या गोतावळ्यात त्याला तुझी कधी आठवण देखील होत नसणार तिकडे ! आणि तुझं तर नाचता येईना अन् अंगण वाकडं अशातला सारा वागण्याचा प्रकार चाललाय. पुन्हा जर त्यांचं नाव तोंडातनं काढलंस तर पाहा. सांगून ठेवतो.'

'त्यांना आपल्या बायका मुलांच्या नादात तुझी साधी आठवण देखील येत नसेल !' हे वाक्य अप्पण्णाच्या तोंडून कानी पडताच तारक्काला विलक्षण यातना झाल्या, अत्यंतिक दुःख झाले. तिनं मनात विचार केला. ऐनापूरला गेलो तर एक वेळ अनंताला पाहायला तरी मिळेल...म्हणून ती म्हणाली, 'असं आपण त्यांच्याकडे आलो गेलो तर माझे आई वडील आपली जमीन जायदाद त्यांच्या नावाने थोडीच करुन देतील. तुम्ही काय कसला विचार सदान् कदा करताय..तुमच्या मनात काय आहे तेच मुळी मला मेलीला

कळेनासं झालंय...

तारक्काच्या या बोलण्यानं आगीत तेल ओतल्यासारखं झालं. अप्पण्णा नखशिखांत संतापून उठला, परंतु त्यानं आपला राग वेळीच आवरला. त्याच्या तोंडून एक शब्द फुटला नाही. आता आणखी काही बोलणं म्हणजे भांडण उभं करणं होय - असा विचार करुन आणि डोळ्यावाटे आग ओकीत तो बाहेर निघून गेला.

दुसऱ्या दिवशी सकाळी अनंत घागर घेऊन नुकताच कुठं घराबाहेर पडत होता - तो तेवढ्यात त्याला एका शेजाऱ्यानं हटकीत विचारलं, 'रात्री तारा तुमच्याकडे आली होती वाटतं ?'

अनंतानं आश्चर्यानं विचारलं, 'नाही बुवा. कुठं आहे ती ?'

'त्यांच्याकडची मुलगी वणकुद्रयांकडे दिलीय; या लग्नासाठी दोघेही नवरा बायको आले आहेत. हा नवरा चांगला आहे.'

अनंत दुःखी मनानं दूर एका झाडाच्या शेंड्यावर नजर रोखीत म्हणाला, 'रात्री चांगलाच काळोख झाला असणार म्हणून नसतील आले. आता आज येतील कदाचित -' असं म्हणत जायला निघाला तसं घरातनं आईचं करवादणं त्याच्या कानी आदळलं:

'ती कशाला आता आमच्या घराची पायरी चढेल ? हे एवढे वारले तेव्हांही ती आमच्या घरी आली नाही. काय तिला माहीत का नाही ? आम्ही तिचं असं काय घोडं मारलंय की तिनं आमच्याविषयी एवढ्या तुच्छतेनं, एवढ्या अनादरानं वागत राहावं ? लहान होती तेव्हां किती वेळा यायची, राहायची. आता चांगला नवरा मिळालाय; आम्हा लोकांना ती काडीकचऱ्या इतकीही किंमत देईनाशी झालीय...कस्पटा समान समजतेय झालं !' हे सारं रागापायी तिच्या तोंडून बाहेर पडलं होतं.

अनंत काही बोलला नाही. निमूटपणे घागर घेऊन तिथनं चालता झाला. तरीही फिरुन पुन्हा परतताना त्याचे पाय आपोआप 'वणकुंद्रे' मंडळींच्या जानोश्याकडे वळले. त्या रात्री झोपायला बराच उशीर झाल्यामुळे त्यातले एकदोघे जणच काय ते जागे होते. आत माजघरात सातआठ बायका झोपलेल्या होत्या. तिकडे जायला अनंताला संकोच वाटत होता. बाहेर बसलेल्या एका माणसाला त्यानं विचारलं: 'आमची तारा इथं आहे काय ?' अनंताचा आवाज कानी पडताच तारा बाहेर आली, तरीही अनंत तिला एकदम काही ओळखू शकला नाही. तारानं त्याच्या तोंडाकडे पाहिलं. अनंताची ती कळाकांतीहीन निस्तेज मुद्रा पाहून तिला जशी काळजी वाटली तसंच दुःखही झालं. अनंतानं जरा पुढं होत विचारलं, 'कधी आलीस तारा ? त्याचा स्वर गंभीर होता.

तो स्वर तारक्काच्या कानावाटे थेट काळजात जाऊन पोहोचला आणि त्यासरशी तिच्या मनानं त्या पूर्वीच्या काळातली उभारी धारण केली. मान खाली घालत म्हणाली, 'काल रात्री आल्ये.'

'तुला पाहिलेल्या खूप दिवस झालेत. ही अशी का झालीयस ? तारक्का काही बोलली नाही. गुपचूप मान खाली घालून उभी राहिली. अनंतानं अशा प्रकारे आपली विचारपूस करावी याचा तिला भारी आनंद वाटला - समाधान झाले.

'अप्पूभाऊ कुठे आहेत ? ते ही आलेयत ना ?'

'आले आहेत, आता लग्नघरीच गेले आहेत. बसा. येतीलच येवढ्यात ते. चहा करते... चहा घेऊनच जा...' असं म्हणून तिनं अनंताकडे पाहिलं. पण तुम्ही असे का झालात हे काही ती त्याला विचारु शकली नाही.

'नको, घागर घेऊन आलोय, हा असाच इकडे आलो होतो, पुन्हा येईन.'

'पण जायची गरजच काय ? इथंच लग्न आहे, दोन तीन दिवस इकडेच या मुक्कामाला.'

'मी कुठं कोणाकडे जात येत असतो ? तू घराकडे चक्कर तर टाक.'

'बघते...! सवड मिळाली तर...लग्न घर आहे.' कसा बसा एक एक शब्द तिच्या मुखावाटे बाहेर पडला.

'सवड मिळायची काय गोष्ट ? दुपारच्याला येऊन जा.' असं म्हणत अनंत तिथून बाहेर पडला.

लग्न.उत्तम प्रकारे साजरे झाले. त्यात तारा आणि तिच्या नवऱ्यानंच कन्यादान केलं. तेव्हा तारक्का आणि अप्पण्णा शेजारी शेजारी बसलेले असताना त्याच्या उपरण्याची तिच्या पदराला गाठ मारण्यात आली. भटजी तारक्काला म्हणाले, की नवऱ्यानं नाव घेतलंस तरच गाठ सोडीन. अप्पण्णानं हसत हसत बायकोचं नाव घेतलं. तारक्का काकू करीत पुटपुटली: 'नाही..मला नाही नाव घ्यायला जमणार..' तसं भोवती घोळका करुन उभ्या असलेल्या बायका म्हणाल्या, 'नवऱ्याचं नाव घ्यायला लाज वाटत असेल तर त्याच्या नावाशी जुळतं मिळतं असं एखादं देवाचं नाव घेतलंस तरी चालेल.' तारक्का काहीसं थांबून एखाद्या कोड्याचं उत्तर उलगडून सांगावं तसं नवऱ्याचं नाव घेत म्हणाली : 'अनंतनाथ ! लोकांना वाटलं की तिनं जणू तीर्थंकराचंच नाव घेतलयं !

तारक्काचं तिथं चाललेल्या कशाकडेच कसलं लक्ष नव्हतं. तिनं त्यांच गावातल्या एका म्हातारीला जरा बाजूला नेऊन विचारलं: 'नवे घरवाले कसे काय आहेत ? रामू मामा वारल्यावर त्यांच्या मागे दुकान आणि इतर सारा कारभार कसा काय चाललाय ?'

'कोण ? तू नवे घरवाले रामूची मुलं अनंत अणि नाभू यांच्याविषयी विचारल्येयस होय ? ते तुझे कोण लागतात ?'

'माझे ? ते माझ्या आईचं माहेर...माझ्या मामाचं घर..'

'असं आहे तर! म्हणजे तू रत्नाची मुलगी. अग, मी तुला ओळखलंच नाही. तू आम्हाला कोणी दूरची...परकी थोडीच आहेस? रामू तर माझ्या थोरल्या भावाचाच मुलगा होता.'

तारानं प्रगाढ श्वास घेतला. उद्‌गारली : 'ते माझे सख्खे मामा होते. पण आता नाहीत ना ते.

'हा पोरी, कसा सोन्यासारखा माणूस होता - पण तो वारल्यावर घराचं सारं ऐश्वर्य, वैभवही लयाला गेलं. घराची सारी शान नाहीशी झाली. चार दिवसांतच मुलं वेगवेगळे झाले, धाकट्याची बायको हुषार आहे. थोरल्याचा तर कशाचा काही पत्ताच नाही. सुंदराही त्याच्याशी भांडून धाकट्या मुलाकडे रहायला गेलीय. आजकाल रोज घरात नवरा बायकोत भांडणं होत असतात. तीही तेरदाळचीच मुलगी आहे. जिभेची भलतीच तिखट आहे, अगदी ऐकवत नाही हो.' मग जरा थांबून फिरुन म्हणाली, 'ती बिचारी तरी धड वागवीत नाही. तसं इंदिरा चांगली मुलगी आहे असंच म्हटलं पाहिजे. दुकानाचं पार वाटोळं केलं. आपल्या वाट्याला आलेलं एक शेत फुंकून टाकलं - पण तरीही त्याला अजून अक्कल येत नाही की शहाणपण सुचत नाही. काय सांगावं दोन दोन मुलं झाली तरी अजून ही स्थिती...' एवढं सांगून ती गप्प बसली. पण तिच्या एकंदर अविर्भावावरुन आणखीही काही तरी सांगायचं तिच्या मनात आहे असं वाटत होतं.

ताराच्या तोंडून एक सहजोद्‌गार निघाला: 'वेळ वाईट अशी क़ी हे असंच होत असतं आई!'

'त्यानं अहंकारापायी सारं घालवलं. अशा परिस्थितीत कोण वाचवणार हो त्याला?' मग आवती भोवती सावधपणे पाहात म्हतारी म्हणाली, 'त्या छोटीच्या मागे लागला. ते सारे त्याला मारायला उठले होते.' नंतर आवाज जरा खाली आणीत हळूच म्हणाली, 'तिला पळवून घेऊन गेला की! कुठं? गेला..तिकडे कोल्हापूरच्या बाजूला दूर कुठलसं गाव आहे तिथं नेऊन ठेवलंय तिला. आता असं केल्यावर तिचा खर्च नको चालवायला? ती पोरगी ह्याच्या नादाला लागून आपल्या आई वडलांना सोडून ह्याच्या मागे आलीय. तिकडचा खर्च आणि इकडचा खर्च चालवता चालवता वाट नाही लागणार? म्हातारीनं हात ओवाळीत प्रश्न केला.

त्या साऱ्या गोष्टी ऐकून ताराला विलक्षण यातना झाल्या. डोळ्या समोर काळोखी पसरल्यासारखे होऊन गेले - थोडा वेळ ती डोकं घट्ट धरुन बसून राहिली. म्हातारीला वाटलं की मामाच्या घरची एकंदर परिस्थिती ऐकल्यानं ती ही अशी सुन्न होऊन बसली असणार. तेवढ्यात तारक्काच्या तोंडून शब्द आले: 'कशी आहे ती भाग्यवती?' तिच्या स्वरात असूया होती की समाधान होते हे आम्ही आपल्या कल्पनेनंच ठरवायचं आहे.

'सुंदर आहे, डोळे चांगले टपोरे आहेत. कपाळावर कुंकू लावते थेट. अगदी

तुझ्यासारखीच आहे दिसायला. फक्त तू जरा रोडावलीयस आणि ती अंगापिंडानं चांगली भरलेली आहे. रसरशीत दिसत्ये ...' म्हातारी सांगत होती. जरा थांबून पुढं म्हणाली, 'म्हणून काय झालं ! छोटी असेल दिसायला सुंदर त्याचं काय एवढं ? चांगली शिकली सवरलेली आहे. असं वागणं शोभलं का तिला ? आग लागो तिला आणि तिच्या देखणेपणाला...'

तारक्कानं मनात विचार केला: 'ती दिसायला खूपच सुंदर असणार -' तिच्या तोंडून एक थंड नि:श्वास बाहेर पडला. म्हातारीचं बोलणं आपलं चालूच होतं... म्हणत होती : 'ती असं वागली तर घरात बायको बिचारी काय करील ? ती आतून जळणार नाही होय ? तिनंही त्याच्याकडे लक्ष देणं...त्याच्या पुढं पुढं करणं सोडून दिलंय. हळू हळू त्यानं महिना महिना घरी येणं सोडून दिलंय. आला तरी इकडे तिकडे खातो जेवतो. वेळच्या वेळी जेवण खाण नाही. धड नीट झोप नाही. धान्य कापणीच्या वेळेला शेतावरच पडलेला असतो. शेतकरी तरी काय करतील ? त्यांना आपल्या कामाशी काम. आता गावात स्वत:चं चांगलं घरदार असताना त्याला उगाच कोणी झालं तरी जेवायला कसं काय बोलवील ? कधी तरी घरी येतो. मध्ये तिच्याकडे राहयला गेला होता. पंधरा दिवस होतील आता फिरून परत आलाय - पाहिलास कसा झालाय तो...किती पांढरा फटफटीत पडलाय एखाद्या ह्याच्यासारखा तो ?

'अस्सं ! म्हणून एवढा रोडावलाय अन् अशक्त झालाय तर तो !' परवा तो मला अगदी ओळखायला देखील आला नाही.' दयार्द्र स्वरात ती म्हणाली.

'आता त्याच्या अंगात राहिलंय तरी काय ? अगदी एखाद्या म्हाताऱ्या सारख्या लटपटत्या पायानं भटकत असतो. आता आणखी फार दिवस तो तग धरील असं नाही वाटत मला.'

तारकाचं तोंड एखाद्या प्रेतासारखं पांढरं फटफटीत पडलं. थरथरत तिच्या तोंडून शब्द बाहेर पडले, 'काय म्हणता काय तुम्ही हे ?'

'पोरी , परवा कोणीसं म्हणत होतं की मिरजेच्या इस्पितळात जाऊन याच्या छातीचा फोटो काढायला हवा. याला फार मोठा दुर्धर रोग जडलाय. या रोगात माणूस असाच क्षीण होतो. दिवसेंदिवस सारखा खंगतच जातो. '

तारक्का दु:खानं म्हणाली, 'माझा मामा एवढा पुण्यात्मा होता त्याच्या पुण्याचा लाभ काही झाला नाही. '

म्हातारी पुढं म्हणाली, 'एवढा मोठा रोग झालाय की त्याच्या दोन्ही पोरांना याच्या आसपास फिरकू देखील देत नाहीत. घरात तरी कसलं काही शांतीसमाधान आहे म्हणत्येस ? यदाकदाचित कधी घरी आलाच तर बाहेर ओसरीवर नुसता पडलेला असतो. '

तारक्का उठली अन् चालू लागली. पुढ्यात म्हातारी बसलेली आहे याचंही तिला

भान राहिलेलं नव्हतं. अनंताची स्थिती अशी का झाली याचाच ती विचार करीत होती. आम्ही दोघे एकत्र जगलो तर त्याची ही अशी स्थिती थोडीच होती ? हा एकच प्रश्न तिच्या मनात पुन:पुन्हा डोकं वर काढीत होता. त्याच्या या अशा अवस्थेत त्याला भेटून त्याच्याशी न बोलणं योग्य होणार नाही.

तिनं असा विचार केला असणार की आपलं न ऐकल्यामुळेच त्याची ही अशी दशा झाली असणार ! आता त्याला कसं भेटावं याचा ती मनाशी विचार करायला लागली. 'नवऱ्याला विचारलं तर देईल तो जाऊ ? आणि उगाचच चार लोकात फाडकन काही तरी बोलून त्यानं आपली उगाचच शोभा केली तर ?' असा विचार करीत करीत खांबाचा आधार घेत ती कशीबशी जागची उठून उभी राहिली.

लग्नाला आलेल्या बायकांचा एक घोळका तिकडे फिरायला जायला निघाला होता. या साऱ्या खेडूत स्त्रिया होत्या. मोठ्या गावात आल्यावर तिथला बाजार आणि देवळं त्याना पाहविशी वाटणं हे अगदी स्वाभाविकच होतं म्हणून त्या फिरायला बाहेर पडल्या. कोण जाणे तारकाच्या मनात एकाएकी काय आलं. तीही 'चल मीही येते' असं म्हणत एकदम त्यांच्याबरोबर जायला निघाली. त्या बायकांनाही आनंद झाला. म्हणाल्या : 'चला, बरोबर आलात तर बरंच आहे. आम्हाला इथलं सारं दाखवून आणा. 'हो' म्हणत तारका सर्वांच्या पुढं होत चालायला लागली.

रस्ता दाखवायची जबाबदारी तारकावर आली. खरं म्हणजे तिला वेगळ्याच वाटेनं जायचं होतं म्हणून ती त्यांना घरासमोरच्या रस्त्यानं घेऊन गेली. अनंत बाहेरच्याच खोलीत बसलेला होता. दुरून बायकांचा घोळका येत असलेला त्याला दिसला. ह्या साऱ्या आपापल्याकडेच यायला निघालेल्या दिसताहेत अशा समजुतीनं तो उठून बाहेर आला. तारकानं त्याच्याकडे पाहिलं आणि क्षणभर इतरही बऱ्याच बायका आहे याचं तिला जणू तिला विस्मरण पडल्यासारखं झालं. तिचं मन वेगानं त्याच्याकडे झेपावू लागलं. जरा पुढं होत तिनं अनंताला विचारलं : 'सिध्दराजचं देऊळ दाखवायला कोणी मिळेल का ? '

'का ? कोणाला जायचय ?'

लग्नाला आलेल्या साऱ्याचं बायकांची देऊळ पाहायला जायची भारी इच्छा आहे. कोणाला तरी जरा धाडाना त्यांच्या बरोबर देऊळ दाखवायला.'

त्या बायकातल्या एकीनं विचारलं, 'का, तू नाही का पाहिलेस ?' तारका म्हणाली, 'मी पाहिलय, मी जरा माझ्या मामीला भेटून येते. तुम्ही साऱ्या जणी व्हा जरा पुढं. तुमच्याबरोबर कोणी तरी मुलगा येईल...'

अनंतानं गल्लीत खेळत असलेल्या एका मुलाला हाक मारली आणि देऊळ दाखवायला त्यांच्याबरोबर त्यानं त्याला धाडून दिलं. बायका पुढं झाल्या तशी 'परत येताना बायकांना

इकडेच घेऊन ये' असं त्या मुलाला बजावीत तारका स्वत: आत अनंताच्या खोलीकडे निघून गेली.

अनंताचं तोंड सुकलेलं असलं तरी त्याची चर्या शांत होती. तारकाला पाहून त्याला हसू फुटलं. ते हास्य निर्मळ होतं. तरी सुध्दा जराशा थट्टेच्या स्वरात त्यानं तिला म्हटलं : 'जाऊया आता कुठे तरी. येशील ना बरोबर ? '

तारकानं अनंताच्या तोंडाकडे पाहिलं ; जरा स्मित करीत तिनं मान खाली घातली. कोण जाणे त्या स्मितात काय भाव दडला होता. पण एक गोष्ट त्यातून स्पष्टपणे व्यक्त होत होती की जणू तिला म्हणायचं होतं : 'तुझ्या या विचारण्यावरुन तुझ्या मनात काय चाललं आहे. ते मी बरोबर ओळखलं आहे.' अनंताला तिला किती किती म्हणून विचारायचं होतं- तेवढ्यासाठीच तर ती मुद्दाम अशी वाकडी वाट करून त्याला भेटायला आली होती- पण तिची जीभ जणू टाळ्याला चिकटल्यासारखी झाली होती. तोंडातून एक शब्द फुटता फुटत नव्हता.

अखेर अनंतानंच विचारलं, 'लोक काही बाही बोलतील म्हणून का घाबरते आहेस ?' पण तरीही तारका गप्पच राहिली. मग पुन्हा अनंतच म्हणाला, 'ह्यात घाबरण्यासारखं काय आहे ? बाबा वारल्यानंतर मी घाबरणं बिबरणं फार सोडून दिलं. तेव्हा तू माझ्या बरोबर कुठेही यायला तयार होतीस पण मीच कच खाल्ली... पाय मागे घेतला. तुला दुसऱ्याच्या हाती सोपविलं गेलं. पुढं मी...' काही तरी सांगू इच्छित होता ते तसंच अर्धवट सोडीत म्हणाला: 'हे असं झालंय, तुझी ही तीच दशा झालीय'.

अनंताच्या बोलण्यात एक सहज सरळपणा होता. जुन्या गोष्टी हसत हसत सांगत होता. तारकाला ते ऐकताना आत्यंतिक दु:ख जाणवत होतं. वेदना होत होत्या. ती मनातल्या मनात पुटपुटली: 'आता काय त्याचं ? कधी ना कधी तरी या जगाचा निरोप घ्यावा लागणार आहे. इथनं कूच करणं भाग पडणार आहे.' जरा थबकून म्हणाली, 'तुम्ही या चला माझ्या बरोबर. जाऊया आपण कुठे तरी, म्हणता त्याचं वाईट नाही वाटत मला; तुमचं अजूनही माझ्यावर प्रेम आहे याचा खूप आनंद होतो बघा.'

काही काळ ते दोघे मूकच होते. मग जराशानं तिच्या तोंडून शब्द फुटला: 'अनंत !'

तिच्या मुद्रेवरची नजर जराही ढळू न देता अनंतानं विचारलं, 'काय गं ?'

'तुमच्याकडे पाहिलं की वाटतं किती खरकलात तुम्ही ! किती उतरलीय तुमची तब्येत !! का का अशी दशा करून घेतलीत स्वत:ची ?' तिच्या या पृच्छेत अधिकाराची एक अनामिक जाणीव होती.

'काय केलं मी ?'

'सांगत्ये मी-' असं म्हणत तारका तोंड झाकून घेऊन रडायला लागली. अनंताचं तोंड शरमेनं पांढरं फटफटीत पडलं. मान खाली घालीत तो मनोमन म्हणाला, 'माझ्याकडून

चुकलं असेल. पण तू परक्याची झाल्यावर मी तरी काय करणार ?' तारक्काकडे पाहत तो पुन्हा म्हणाला, 'तू तरी बरी आहेस ना ?'

'बरी आहे, पण कोणापाशी ?'

'कोणापाशीही का असेनास.. कुठेही का असेनास. पण तुझी प्रकृती ही अशी का ढासळलीय ते तर सांग.'

तारक्कानं अनंतापासून काही एक लपवून ठेवलं नाही. म्हणाली, 'त्यांची प्रकृती बरी नाहीए. सारं शरीर घाणेरड्या रोगानं पार नासून गेलंय. पण नवरा म्हणून ज्याच्याशी एकदा लग्न लागलंय त्याच्या बरोबर स्त्रीला आयुष्य कंठावं लागतंच की नाही ?'

'म्हणजे माझा सारा सत्यानाशच झाला म्हणायचा...' असं तो म्हणून गेला आणि कां कोण जाणे एकदम त्यानं आपली जीभ चावली.

'मुलं कशी आहेत ? तुमची बायको कशी आहे ? माझी त्यांची भेट नाही का घडविणार... ओळख वगैरे नाही का करून देणार ?'

बायकोचं नाव निघताच त्याचं डोकं गरगरायला लागलं. चक्कर आल्यासारखं होऊन गेलं. वैतागून म्हणाला:

'ह्यः तिला काय पाहायचं ! गळ्यात पडलेल्या बायकोच्या पोटी जन्मलेल्या पोरां विषयी तरी काय सांगायचं ?'

'पण त्यापायी एवढा हा वैताग तो काय म्हणून ?'

'तूच सांग.....'

तारक्का बसल्या बसल्या रडायला लागली. चहूबाजूला काळोख पसरला होता. देवदर्शनाला गेलेल्या बायका परतत होत्या. अनंत तिच्या ज़वळ बसून निर्जीवपणे तिच्या केसांवरून हात फिरवीत म्हणाला, 'तुझ्या त्या गाववाल्या बायका आल्यात बघ परत, उठ.'

'येऊ देत.'

'त्यांच्या बरोबर जाणार कां नाहीस तू परत-?'

'नाही- मी इथंच राहीन'.

'काय वेड बिड लागलंय की काय ?'

'आता नको आहे- त्या दिवशी काय मी तुमच्या...?'

अनंताच्या डोळ्यातून दोन टपोरे पश्चातापदग्ध अश्रू तारक्काच्या तोंडावर टपकन ओघळले.

तारक्कानं उठून त्याचे अश्रू पुसत म्हटलं, 'इथून निघताना मला विलक्षण क्लेश होताहेत म्हणून म्हटलं.'

अश्रू आवरीत अनंत म्हणाला, 'जाणीव आहे मला त्याची.'

'तर मग का जायला सांगता मला ?'

'तुझी इथंच राहायची इच्छा आहे का ?'

.................................

अनंत स्फुंदून स्फुंदून रडायला लागला. आपल्या दुःखाला आवर घालण्याचा विफल प्रयत्न करीत तो म्हणाला, 'तू मला विसरणार तर नाहीस ना ?' तसं अनंताच्या तोंडाकडे पाहत ती म्हणाली, 'तुम्ही विसरू शकाल मला ?'

....................

तेवढ्यात बायकांचा घोळका तिथं येऊन ठेपला. अनंतापासून दूर होत तारक्का उठून उभी राहिली.

## 21

अनंताची सारी शेतं विकली गेली होती. फक्त नांगरटीसाठी दोन नांगर लागणारं एक शेतच काय ते तेवढं बाकी राहिलं होतं. घरात पुरेसा दाणागोटा नव्हता. चैत्र अजूनही दूर होता. तो दिवसातनं दोनदा घरात पाऊल टाकायचा आणि बायको जे काही पानात वाढील ते खाऊन बाहेर पडवीत येऊन बसायचा. अशा प्रकारच्या या आयुष्यांची त्याला उबग आली होती. उरलेलं शेतही विकून टाकावं असं त्याच्या मनात होतं, पण बायको दरवेळी त्यात मोडता घाली म्हणून ते आजवर विकायचं वाचलं होतं. तेरदाळहून कधी कधी त्याचा मेव्हणा यायचा- येताना तो बहिणीसाठी काहीना काही जिन्नस घेऊन यायचा. त्यायोगे मुलं, अनंत आणि इंदिरा यांचा दिवस कडेला लागत होता- आयुष्य कसंबसं धकत होतं. बहिणीची ही फरफट त्याच्याच्यानं बघवत नव्हती म्हणून त्यानं तिला घरी माहेरी घेऊन जायचा निश्चय केला. त्यानं अनंताला विचारलं, पण काही उत्तर मिळालं नाही. निघताना त्याची पत्नी म्हणाली, 'चार दिवस जाऊन येते, तोवर तुम्ही आईंकडे जेवायला जात जा.'

अनंत फक्त 'बरं आहे'.म्हणाला. अधिक काही म्हणाला नाही. बायको माहेरी गेली. दोन तीन दिवस तो भावाकडे जेवायला जात राहिला. त्याची बायको दहा गोष्टी सुनवायची तेव्हां कुठं एक भाकरी त्याच्या पानात पडायची. त्यांच्याकडे जेवायला जाताना अनंताला प्राणांतिक दु:ख व्हायचं- मेल्याहून मेल्यासारखं होऊन जायचं. पण दुसरा काही उपायच नव्हता. म्हणून चार वेळा गेला आणि कसे बसे दोन घास खाऊन उठून आला. त्याच्या आईनं त्याच्याशी अजिबात बोलणं टाकलं होतं. त्याच्या एकंदर चालचलवणुकीमुळे ती त्याच्यावर नाराज होती. एक दिवस दुपारी जेवून नुकताच कुठं बसला होता, तेवढ्यात पोस्टमननं एक पत्र आणून दिलं. अनंतने ते पाहिलं, अक्षर परिचयाचं होतं. थरथरत्या हातानं पत्र उघडून त्यानं वाचायला सुरूवात केली. पत्र असं होतं:

'कसं लिहू की सारं काही कुशल आहे म्हणून! डॉक्टरला प्रकृती दाखवून लगेच परत येतो असं सांगून आपण गेलात परंतु अद्याप परत आला नाहीत. आपण दिवसेंदिवस अशक्त होत चालला आहात हे ऐकून तर माझे हात पायच थंड पडायला लागलेत. हाता पायातलं सारं बळच नष्ट होऊन गेल्यासारखं झालंय. आपण डॉक्टरना प्रकृती

दाखविलीत की नाही ? काय सांगितलं त्यानं ? मिरजच्या इस्पितळात चार दिवस राहणं आवश्यक असेल तर मी आपल्या सेवाशुश्रूषेसाठी तिथं येईन. तिथं काही दिवस राहून आपण आपली प्रकृती प्रथम सुधारावी. हवं तर आपली घरची मंडळीही आपलं हवं नको पाहण्यासाठी प्रकृतीची काळजी घेण्यासाठी तिथं येऊं देत. मी बाहेरची कामं सांभाळीन. खर्चाची बिल्कुल काळजी करायची नाही. माझे दागिने घेण्यात आपल्याला संकोच वाटतोय याची मला पुरेपूर कल्पना आहे. पण खरं तर असा संकोच बाळगायचं काही एक कारण नाही. हे सारे दागिने तुम्हीच तर मला करून घातले आहेत- त्यात थोडेबहुत काही माझेही असतील. नाही असं नाही पण ते महत्त्वाचं नाही. जे दागिने वेळेला तुमच्या उपयोगी येणार नाहीत अशा दागिन्यांचं मला काय होय ? आपण बरं व्हावंत, प्रकृती सुधारावी. बस या परतं मला तरी दुसरं काय हवंय ? आपणच मला साक्षात आपणच माझे खरेखुरे अलंकार आहात- आपणच माझं सोनं आहात.

आपल्याला माहितच आहे की इथं या घराच्या खिडकीत बसून मी आपल्या येण्याची वाट पाहतेय. गाडी आली आणि तिच्यात तुम्ही दिसला नाही की दुसऱ्या गाडीच्या येण्याकडे डोळे लावून बसत्ये... आपण याल म्हणून वाट पाहायला लागते. वाट पाहताना असं वाटतं की जणू एक युग सरलं आहे. कधी मनात विचार येतो की जी गाडी आपल्याला घेऊन येत नाही ती मेली मग येते तरी कशाला ? हे पत्र लिहिताना सुध्दा मनात येतं निदान संध्याकाळच्या गाडीनं तरी तुम्ही याल. नको नको ते विचार मनात येत राहतात.

आज पहाटे एक घटना घडली. मला वाटलं की मी गाढ झोपेतच आहे आणि खूप जोर जोरात दरवाजा खडखडवताय.. दरवाजा उघडायचं मला भानच राहिलेलं नाही. गाडीची शिट्टी कानावर पडली. एकदम उठले आणि ताडकन धावत सुटले, धाडकन दरवाजा उघडून, 'या ना' म्हणाले. पण पुढ्यात पाहते तो दूधवाला उभा! शी: म्हणून लज्जित होऊन माघारी फिरले. नंतर ध्यानी आलं की आपण मला स्वप्नात हाक मारली असणार!

गवळी दूध आणून घालतो. पाणीवाला पाणी भरून जातो. नाइलाजानं स्वयंपाक करते, दोन घास खाते. नित्याप्रमाणे गाड्या येतात आणि जातात; परंतु आपल्याविना माझं जीवन एखाद्या निष्प्राण यंत्रागत होऊन गेलंय. मी हात जोडून विनंती करत्ये की आपल्या बरोबर सावलीसारख्या वावरणाऱ्या या गरीब बिचारीला आपण विसरू नका.'

हे पत्र आल्यावर तीनचार दिवस तो भावाच्या घरी जेवायला म्हणून गेला नाही. पहिल्या दिवशी तो जेवायला नाही आला याचं फारसं कोणी मनावर घेतलं नाही पण आईचं मन राहिना. ती सुनेला म्हणाली, 'कोण जाणे आज दोन दिवस होतील. अनंत जेवायला का नाही आला काही कळत नाही.'

ती हेटाळणीच्या स्वरात म्हणाली, 'बायको इथं नाही तेव्हां गेले असतील झालं

सासुरवाडीला- त्यांचं काय ? चार दिवस तिथं आणि चार दिवस इथं. असंच उरलंसुरलं आयुष्य घालवून राहिलेत अन् काय !'

सुनेचं बोलणं सुंदराबाईच्या काळजाला डंख करून गेलं. म्हणाली, 'चांगला धडधाकट असताना आणि सुस्थिती असताना कधी तो त्यांच्या घरी गेला नाही. तो काय अशी प्रकृती ढासळलेली असताना विपत्काली त्याच्या दारात पाऊल टाकील होय ?'

सून यावर काही एक बोलली नाही. सासूनंही गोष्ट पुढे वाढविली नाही- पण तिनं स्वत:च्या मनाशी विचार केला, 'बहुदा त्या भंगारीकडे गेला असणार !

दुपारी एका शेजारणीनं येऊन सुंदराबाईला सांगितलं: 'ऐकलं की अनंतानं ते खाल्लाकडचं शेतही विकून टाकलंय. आता घर कसं काय चालविणार ?'

'आणखी काय करणार ? पोराबाळीच्या हाती भिकेची झोळी देणार अन् काय या घरात जन्म घेतल्यावर त्यांच्या वाट्याला दुसरं तरी आणखी काय येणार ?' नंतर एक उष्ण श्वास सोडीत तिनं विचारलं, 'कोणी खरेदी केलं ?'

'त्याच सावकारानं, तीन हजारात घेतलं झालं.'

'केवढ्याला घेईना. त्यात काय ठेवलंय ? त्या शेताचा आम्हाला केवढा आधार होता पूर्वी. हे असताना या शेताच्या जीवावरच तर आमच्या उभ्या कुटुंबाची सुखानं गुजराण व्हायची.' ती डोळ्यात पाणी आणून म्हणाली.

'जोवर होतं तोवर तुमचं आता मेली म्हैस मणभर दूध देत होती म्हणण्यात काय फायदा ? विकताना कमीत कमी निदान आम्हाला आधी विचारायचं तरी; वाडवडलांच्या हातचं हे शेत काही ना काही करून.. अगदी वेळच आली असती तर स्वत:चा जीव गहाण टाकूनही आम्हीच घेतलं असतं की-' शेजारीण म्हणाली.

तसं धाकटी सून आतून येत म्हणाली, 'हो, सांगतील ! त्यांनी या आधी तरी कधी काही सांगितलंय ? इथं जेवायला यायचे, जवळ गेलं तरी तोंडातून कधी एक शब्द नाही काढायचे.'

शेजारणीनं नवलानं विचारलं, 'काय, तुझ्याशी बोलत बिलत देखील नाही की काय ?'

'घ्या ! तुम्ही बोलायचं म्हणता.. अहो, रोज इथनंच जातात पण मेलीय की जिवंत आहे, याची साधं डोळे वर करून देखील कधी दखल घेत नाहीत. बोलणं तर दूरच...'

'अरे ! अशी गोष्ट आहे होय ? मला काय माहीत बाई ! आमची मुलं तर शेतावरून परतल्यावर घरादारात कुठं पाऊल टाकतात न टाकतात तोच आई, आई करून हाक मारायला लागतात.'

'आमचा मुलगा काय आधी असा होता होय ? ती तेरदाळची मुलगी घरात आल्यानंतर हे असं झालंय. तशी तर ती माझ्या धाकट्या भावाचीच मुलगी- पण तिची लक्षणं काही ठीक नाहीएत.'

'तिची लक्षणं काय करतील ? काय तिनं यांना त्या भंगारीच्या मागे लागून स्वतःचा सत्यनाश करून घ्यायला थोडंच सांगितलं होतं होय ?' धाकटी सून रागारागानं एवढचं बोलून तरातरा आत निघून गेली.

ती गेल्यावर सुंदराबाई हळू आवाजात म्हणाली, 'हे काय हिचं बोलणं झालं ? ही आली, आणि वर्षभरातच आमचे हे गेले. आता काय आपलंच राज्य आहे असं समजून मारे आखडून तोऱ्यात वागत असते. हिच्याशी भांडून तंडून मी उद्या कुठं कोणाच्या आसऱ्याला जाणार, ताई ? मुलगा आला रे आला की ही त्याचे कान फुंकते आणि भांडण उभं करते.'

'का ? तुम्ही अशा हिला घाबरता काय म्हणून ?' शेजारणीनं विष उगाळलं. सुंदराबाईच्या ते बरोबर ध्यानात आलं. तिनं चटकन विषय बदलीत विचारलं, 'अनंतानं शेत विकलं, ही बातमी तुम्हाला कोणी सांगितली ?'

'अरे, हे नेटकंच यमुनेनं सांगितलन् ना! काल ते पाहायला आले होते. अजून खरेदी विक्रीचं काम पुरं झालं असेल की नाही कोण जाणे ? काही कल्पना नाही मला त्याची.'

'जाऊं द्या झालं, झालाही असेल देण्याघेण्याचा सारा व्यवहार पुरा. घेणारा सावकार काय अशा बातम्या उगाचच पिकवीत असतो होय ? सारा व्यवहार गुपचुप उरकून घेतात, आधी यातलं काही या कानाचं त्या कानाला बिलकुल कळू देत नाहीत कोणाला.'

अनंतानं ज्या दिवशी शेत विकलं त्याच दिवशी भंगारीला पैसे धाडून दिले आणि त्या जोडीनं एक पत्रही लिहिलं. पत्रात त्यानं म्हटलं होतं; 'डॉक्टरांनी निदान केलंय की मला क्षय झाला आहे. आता आणखी यापुढे तुझ्याबरोबर राहून तुला त्रास देऊन पापाचा धनी व्हायची माझी इच्छा नाहीए. आता या पुढे तू माझ्याकडून कसली कसली म्हणून अपेक्षा बाळगू नकोस.' एवढं लिहून होई होईस्तो त्या पत्रावर दोन मोठाले अश्रु बिंदू टपकन पडले आणि त्यामुळं पत्र खराब झालं. त्यानंतर मग तो कुठंही गेला नाही धाकट्या भावाच्या घरी जेवायला देखील गेला नाही. सुंदराबाईनंही त्याला बोलावलं नाही. संध्याकाळी नाभिराज जसा घरी आला तसा म्हणाला, 'भाऊ घरासमोर उभे होते. काल डॉक्टरनं सांगितलं होतं की कोणा चांगल्या डॉक्टरकडनं प्रकृती तपासून घ्या. प्रकृती एकदा चांगली सुधारली की मग पुढचं पुढं पाहता येईल अशा विचारानं त्यांनी शेत विकून टाकलंय. जेवायसाठी घरी चला असा खूप आग्रह करून पाहिला तरीही काही ते आले नाहीत.'

सुंदरव्वानं आपलं तोंड वाकडं करीत कठोरपणे म्हटलं, 'आपलं काळं तोंड दाखायला तो कशाला येईल आता इथं!'

'थोडी फार शेती उरली कशाला होती तीही फुंकून टाकली, आता कोणाच्या आधार

आसऱ्याला जाऊन जीव काढतील ?' त्याची बायको म्हणाली.

'कोणाच्या आधार आसऱ्याला काय म्हणून ? त्यांचं स्वत:चं घर नाहीए ? आम्ही नाही आहोत ? एवढं अनादरानं... तुच्छतेनं बोलतेयस ते ! त्यांचा आपत्काल आलाय म्हणून काय आम्ही तोंडं फिरवणार आहोत होय ? मग भाऊ कशासाठी आहे ?' सुंदरव्वा अनंतावर भारी नाराज होती परंतु धाकट्या मुलाचं हे बोलणं ऐकून तिला मनोमन बरं वाटलं, समाधान झालं.

'खुशाल घरात आणून का ना ठेवीनात. मी थोडीच मना करत्येय ?' आढ्यतेनं असं म्हणत नाभिराजची बायको तणतणत आत निघून गेली. सुंदरव्वाच्यानं गप्प बसवेना. तिनं दुसऱ्याच दिवशी नाभिराजकरवी पत्र लिहवून घेऊन शेत विकल्याचं वृत्त तेरदाळला अनंताच्या सासरी कळविलं. पत्र हेती पडताच अनंताचा मेव्हणा अन् इंदिरा मुलांसमवेत गावी येऊन ठेपली. ते का आले, केव्हा आले याचा साधा विचारही अनंताच्या मनाला स्पर्शून गेला नाही. बायको पुढ्यात दिसताच 'आलात तर...' एवढंच पुटपुटून तो गप्प बसला. इंदिरानं माहेरहून येताना आठदहा दिवस स्वयंपाक पाण्याला पुरेल एवढी सारी शिधासामग्री बरोबर बांधून आणली होती. तिच्या भावानं आणखी जे काही किरकोळ लागलं ते दुकानातनं विकत आणून दिलं. तात्पुरता घरी प्रपंच मार्गी लागल्यागत झाला. अनंत जेवायसाठी घरी यायचा. त्याच्या मेव्हण्यानं हळू हळू कलाकलानं एक एक गोष्ट त्याला विचारून काढून घेतली. सुंदरव्वाकडे जाऊन सर्व गोष्टी माहीत करून घेतल्या. समजलं की सावकारानं अद्याप काही पैसे दिलेले नाहीत. नंतर तो सावकारालाही भेटला. सुंदरव्वाही सावकाराकडे गेली. त्याचे पाय धरून गयावया करीत म्हणाली, 'त्याचं हे वागणं बरोबर नाहीए. या पोरांना तुम्ही असं निराधार करून नका.' शेवटी सावकारानं बाकी रक्कम अनंतासमक्ष द्यायचं कबूल केलं. आता काय ते फक्त नऊशे रूपयेच येणं बाकी आहे हेही समजलं. ते ऐकलं आणि दोघंही बहीणभाऊ चकित झाले. तीन हजार रूपायातले फक्त हे एवढेच शिल्लक राहिले असतील हे कधी त्यांच्या मनाला देखील शिवलं नव्हतं. त्याना वाटलं होतं की बरीच मोठी रक्कम असेल. त्यातून मुलांसाठी कुठं दुसरीकडे जमीन घेता येईल. घ्यायला हवी. शेवटी आहे ही रक्कम जरी पदरात पडली तरी खूप आहे अशा विचारानं ते अनंताला सावकाराकडे घेऊन गेले आणि त्याच्या पुढ्यातच सावकारानं उरलेली रक्कम त्यांच्या हवाली केली. मेव्हण्यानं पैसे घेतले, त्यातले त्यानं काही घरखर्चासाठी बहिणीला दिले आणि तो घरी परतला. गावी जायच्या आधी तो सुंदरव्वाला जाऊन भेटला. म्हणाला, 'तुमच्या भरवशावर मी इंदिराला इथं ठेवून जात आहे. तुम्ही वेळोवेळी तिच्याकडं आपलं लक्ष असू द्या, मी पुन्हा परत येईन.' आणि मग इतकं बोलून तो गावी निघून गेला.

एक महिना उलटला असेल. अनंत घरी येऊन पानात जे काही पडेल ते खाऊन

चालता व्हायचा. इतर वेळी तो घरात नसायचा. मुलांनाही स्वत: जवळ कधी फिरकू द्यायचा नाही. एक दिवस असाच जेवायला बसलेला असतांना बायको म्हणाली, 'अशा प्रकारे नुसतं बसून खात राहिल्यानं किती दिवस घर चालणार आहे ? काही तरी हालचाल करायला हवी. आज घरात धान्याचा कण शिल्लक नाहीए, झालंच तर मुलांना घालायला धड कपडे नाहीएत, ती आपली उघडी वाघडीच फिरताहेत.' बाकी पैशाचं काय झालं हे काढून घेण्याच्या उद्देशानंच ती हे सारं म्हणाली होती.

'उरलेल्या पैशातले काही तर तू तुझ्या भावालाच देऊन टाकले होते. मी मागितले तर मला मुळीच पैसे द्यायचे नाहीत म्हणून सावकाराला तुम्ही सांगून ठेवलं होतं. काही औषधपाणी करून प्रकृती सुधारावी असा मी विचार केला होता, तर तुम्ही लोकांनी पैशाअभावी माझी ही अवस्था करून सोडलीत ! आता कुठचं सुखाचं राहणं अन् कसलं काय !' अनंतानं डोळे लालेलाल करून संतापानं हे फडाफडा व्यक्त केलं.

'आग लागो त्या पैशांना, पुन्हा असलं काही बोलू नका. जे हाती लागले तेवढ्या त्या साऱ्या पैशांचा तर सत्यनाश करून सोडलातच; आणि वर जे काही किरकोळ शिरकोळ शिल्लक राहिलंय त्याचीही आता वाट लावायची इच्छा आहे होय ? जेवायला वेळेवर घरी हजर होता पण मग मनात असा नाही विचार करीत की घरात काय कमी जास्त आहे.. काय आणून टाकलं पाहिजे... कशाची निकड आहे !' तिनं रागारागानं म्हटलं.

अनंतानं पुढ्यातलं जेवणाचं ताट सरळ भिरकावून दिलं साऱ्या घरभर भाजी भाकरी झाली 'एवढं ऐकवून जेवायला घालतेस, पैसे कोणाचे होते ? मूर्ख कुठली...' असं म्हणून तो तटकन जागचा उठला आणि तोंडाला येतील त्या शिव्या देत बडबडत बाहेर चालता झाला. बायकोही जेवली नाही की शेजारी जाऊन सासूलाही काही सांगितलं नाही. अंथरूण टाकून झोपली. बाहेर खेळत असलेल्या मुलांनी येऊन तिला उठविलं. त्यांना भाकर तुकडा वाढून पुन्हा झोपली. त्या दिवशी संध्याकाळी अनंत जेवायला घरी आला नाही. दुसऱ्या दिवशी सकाळी इंदिरा उठली. स्वयंपाक केला. मुलांसाठी करणं भागच होतं. स्वयंपाक होताच तिनं मुलांना जेवायला वाढलं. दोन दिवस राग ओसरला. मुलांनी बोलावल्यावरून अनंत घरी यायला जायला लागला, पण बोलणं चालणं बंद होतं. कसे बसे चार दिवस गेले. घरातली सारी शिधा सामग्री संपुष्टात यायला लागली. इंदिरापाशी होते नव्हते ते सारे पैसेही संपत आले होते. हल्ली गेल्या काही दिवसांपासून तिलाही ताप येणं सुरु झालं होतं. नवऱ्याच्या आजाराची लागण आपल्यालाही झाली या आशंकेनं ती मनातल्या मानात भारी कष्टी होऊन गेली. आज अगदी चहुबाजूनी निरुपायच झाला तसं अंथरुण धरलं. अनंत संध्याकाळचा घरी आला. बायको अंथरुणावर पडलेलीशी पाहून त्यानं विचारलं, 'का झोपलीयस ?'

'जीवाला बर नाहीए, छातीत दुखतंय. पाठीला रग लागल्या सारखं होतंय.' इंदिरानं खोकत खोकत सांगितलं.

दोन्ही मुलं त्याला लगटून उभी राहत म्हणाली, 'बाबा, आईनं सकाळपासून काही एक खाल्लेलं नाहीए. सकाळ धरून उपाशीच आहे ती'.

मुलांच्या या बोलण्यानं अनंताचं अंत:करण विरघळल्यासारखं झालं. एक दीर्घ श्वास घेत तो उठला. बायकोसाठी निदान एक कपभर चहा तरी करुन आणावा अशा विचारानं स्वयंपाक घरात गेला. सारे डबे धुंडाळले. साखरेचा पत्ता नव्हता. सकाळी पावशेर दूध घेतलं होतं त्या बरोबर दोन्ही पोरांनी भाकरी कालवून खाल्ली होती. दुसरी एक छोटी डबी होती ती उघडून त्यानं वाकडी करुन पाहिली, तिच्यात चहाची थोडीशी पत्ती दिसत होती पण अनंताच्या हाती पडायची तिची इच्छा नसावी. तिचा तो हेतू जाणून अनंतानं डबीचं तोंड बंद केलं. तिच्या तोंडाचा रंगही त्याच्या सारखाच होता. साखरेसाठी त्यानं आणखी एक डबा उघडून पाहिला. त्यातही काही नव्हतं. एक काळ असा होता की घरात पडलेल्या साखरेला कोणी काळं कुत्रं देखील विचारत नव्हतं आणि आज आपण साध्या चिमूटभर साखरेला महाग झालो आहोत या दु:खद जाणिवेसरशी त्याच्या डोळ्यात टचकन् पाणी उभं राहिलं. पूर्वीचे दिवस आठवले. जुन्या स्मृती चाळवल्यासारख्या झाल्या. एखाद्या भ्रमिष्टागत स्वयंपाक घरात उगाचच येर झारा घालायला लागला...पश्चिमेकडच्या खिडकीतून वारा सैरभैर आत येत होता, त्याच्या जोडीनं काळोखही आत शिरत होता.

मुलं बाहेर अंगणात उभी होती. तेवढ्यात त्यांचा चुलता शेतावरनं घरी परतला. आल्या आल्या त्यानं मुलांना विचारलं, 'कायरे बाबांचं जेवण झालं का तुमच्या ?'

मुलं म्हणाली, 'नाही. आई झोपलीय, स्वयंपाक नाही झाला आज.'

'आई झोपलीय ?' असं उद्गारत नाभिराज घरात गेला. गवताचा भारा एका अंगाला उतरवून ठेवीत, हातपाय धुवून भावाच्या घरी गेला.'

'कुठंशी झोपलीय ग इंदिरा वहिनी ?' दारातच त्यानं मुलीला विचारलं.

'आई आतल्या खोलीत झोपलीय, बाबा....'

भावाचा आवाज ऐकून अनंत बाहेर आला. दोघं बरोबर माजघरात गेले. तोंडावरची चादर दूर करीत इंदरव्वानं दिराला 'या'म्हटलं. नाभिराजनं अंथरुणावर तिच्यापाशी बसत तिच्या अंगाला हात लावून पाहिलं, ताप होता. काही एक विचार करीत नाभिराज म्हणाला, 'उद्या मिरजेच्या इस्पितळात जाऊया. दोघांनाही डॉक्टरना दाखवूया.' मग भावाकडे वळून विचारलं, 'तुम्हीच तर तपासून घेणार आहेसं म्हणत होता. अजून तपासून घेऊन आलेलासं दिसत नाहीए.'

'तपासून घेतलंय कुठं! भाऊ पैसे घेऊन गेलेत. इथं हातात दमडा नाही.' हे सांगत

असताना त्याचे डोळे भरुन आले. त्याला रडे अगदी अनावर झाले. डोळ्यातून घळघळा अश्रू वाहायला लागले.

नाभिराज म्हणाला, 'जिवात जीव राहिला तर पैसे कुठून ना कुठून तरी येतीलच; पैसा थोडाच माणसाला जन्माला घालतो ? पैसे तर आम्ही कमावतो'

तो उमजला की अनंत काही अद्याप जेवलेला नाहीए. त्यानं त्याला घरी यायचा आग्रह करून पाहिला पण अनंताचं एक नाही अन् दोन नाही. शेवटी मुलांनाच आपल्या बरोबर नेऊन जेवायला घातलं. मुलं जेवून परत जायला निघाली ता एका ताटात थोडी भाजी, भाकरी आणि भात त्यानं त्यांच्या बरोबर वाढून पाठविला. येऊन इंदिराला थोडा भात आणि गरम दूध घेऊन झोपायला सांगून गेला. नाभिराज बायकोला म्हणाला, 'जा तिकडे त्याच्याकडे जाऊन जरा पाहून ये.' तरी ती काही जागची हलली नाही. आईही अगदी कठोरपणे म्हणाली, 'जळलं त्यांचं थोबाड, ते एक दिवस कधी चुकून इकडे मला भेटायला आले नाहीत, मी काय म्हणून जाऊ ?'

नाभिराज म्हणाला, 'कशी येतील ती ? लोकात तोंड दाखविण्यासारखं आता काय उरलंय ? त्यानं त्याच्याकडून भलेपणानं जगायचा खूप प्रयत्न केला.'

त्याची बायको म्हणाली, 'पण जेव्हां भलेपणानं जगायला हवं होतं तेव्हां यांची अक्कल कुठं गेली होती चरायला ?'

दुसऱ्या दिवशी नाभिराज भाऊ भावजयीला घेऊन मिरजच्या हॉस्पिटलात गेला. बराच वेळ तपासणी केल्यावर डॉक्टर म्हणाला की दोघांनाही एकच आजार आहे. नाभिराजनं दोघांना जरा बाहेर जायला सांगून डॉक्टरना सारं काही तपशीलवार विचारून घेतलं. डॉक्टर म्हणाला, 'इंदिराच्या छातीचा फोटो काढून पाहावं लागेल, तिच्या बाबतीत अजून थोडी शंका आहे. पण अनंताचा आजार मात्र आता अगदी हाताबाहेर गेलाय. त्यानं काही दिवस स्वस्थ पडून विश्रांती घेतली तर आणखी काही दिवस असंच धकू शकेल. अन्यथा आजार आणखीनच बळावत जाईल.' दोघांना घेऊन तो सायंकाळ पर्यंत घरी पोहोचला. त्याच्या चेहरा पार उतरून गेला होता. त्याच दिवशी त्यानं मिरजच्या इस्पितळातूनच तेरदाळला एक पत्र टाकले. रात्री घरी पोहचल्यावर आईच्या पुढ्यात आसवं ढाळीत म्हणाला, ''दादा आता फार दिवसांचे सोबती राहिलेले नाहीएत, आई.' सुंदरव्वा गप्प बसली. 'कशी रामलक्ष्मणासारखी जोडी होती आमची...' असं म्हणत स्फुंदून रडायला लागला. सुंदरव्वाही डोळ्यातनं टिपं ढाळायला लागली. मुसमुसून रडायला लागली. दुःखावेग जरा कमी झाल्यावर त्यानं एक एक करुन साऱ्या गोष्टी आईच्या कानी घातल्या.

हे वृत्त या कानाचे त्या कानी होता होता अनंत आणि इंदिराच्या कानी पडल्या वाचून राहिलं नाही. 'असाध्य रोग आहे. नवऱ्याचाच रोग बायकोलाही जडलाय...'

याच गोष्टीचं चर्वितचर्वण गावातले लोक आपआपसात करायला लागले. हा एक संसर्गजन्य रोग आहे असे समजून सारे जण त्यांना टाळायाला लागले...त्यांच्या पासून दूर दूर रहायला लागले. याची जाणीव होताच इंदिरानं मनाशी विचार केला: आता जगून तरी काय फायदा ? ती निराहार करायला लागली, अनंतानंही तेच केलं. आसपास कोणी नसलं, थोडा एकांत लाभला तर ती दोघं एकमेकांच्या गळ्यात गळा घालून अश्रू ढाळीत. नवरा बायकोची अवस्था जणू अजाण बालकांसारखी होऊन गेली होती. नाभिराज येऊन धीर द्यायचा आणि भावाला बळं बळं दोन घास खायला लावायचा.

इंदिरानं तर कोणाचं म्हणता कोणाचं ऐकलं नाही की तोंडात अन्नाचा एक कण घेतला नाही. तिनं कायमचं अंथरूण धरलं. सासूनं येऊन सांगून पाहिलं तरी तिनं तिचं मुळीच ऐकलं नाही. गावातले लोक म्हणायला लागले, 'आता ही कुठची वाचायला !' साऱ्या गावभरचे लोक तिला पाहायला यायला लागले. तिच्या प्रकृतीची विचारपूस करायला म्हणून असं कोणी आलं की इंदिरा म्हणायची, 'आता आमचं काय उरलंय म्हणा ! पण माझी बछडं अनाथ होतील...' आणि घळाघळा अश्रू ढाळीत रडायला लागायची. अनंत माजघरात अंथरूणाला जो खिळला तो कायमचा. उठून बसायचं त्याच्यात त्राणही नव्हतं आणि तेवढा उत्साहही उरलेला नव्हता. भाऊ येऊन जे काय दोन घास भरवील ते खाऊन स्वस्थ पडून राहायचा.

दोन दिवसांनी अनंताचा मेहुणा आणि सासू आले. बरोबर एक वैद्यही होता. आल्या आल्याच वैद्यानं दोघांची प्रकृती तपासली आणि त्यांना धीर देत म्हटलं की: 'एक महिनाभर मी सांगेन तसं तुम्ही माझं औषध घेतलं तर यातनं मी तुम्हाला खडखडीत बरं करून दाखवीन.' त्यानं वर आणखी काही उदाहरणं देत सांगितलं, की हे मोठमोठे डॉक्टर निव्वळ पैसे उकळण्यासाठी काय वाट्टेल ते सांगून माणसाला घाबरवून सोडतात. आपण कित्येक हाताबाहेर गेलेल्या रोग्यांना खडखडीत बरं करून सोडलंय. वैद्याच्या या सांगण्यावर अनंताचा तिळमात्र विश्वास बसला नाही. मात्र इंदिराच्या मनात अशी आशा निर्माण झाली की समजा यातनं आपण थोडे बरं झालो..आणखी चार एक वर्ष जगू शकलो तर पोरांवर तेवढीच मायेची पाखर घालता येईल.. आईच्या [illegible] त्याना व्यवस्थित वाढविता येईल. भाऊ आणि आई आल्यामुळेही आता तिला व [illegible] धीर दिलासा लाभल्या सारखा झाला होता. विचार विनिमयानंतर असं ट [illegible] अन् त्याच्या बायकोनं तेरदाळला जावं आणि तिथं औषधपाणी करावं [illegible] शाळेत जायचा तेव्हा त्याला सुंदरव्वापाशीच ठेवून जावं, धाकट्याला [illegible] जावं. नाभिराजनं खूप सांगून समजावून पाहिलं की तेरदाळला जायचं [illegible] आवश्यकता नाहीए. इथंच त्यांना -आपण आपल्या घरीच व्यवस्थि[illegible] करु - त्यांचं पथ्यपाणी सांभाळू - पण त्याच्या या सांगण्याचा काही [illegible]

नाही. त्याचं म्हणणं कोणीही ऐकलं नाही. ती मंडळी कुडची स्टेशनपर्यंत जायसाठी बैलगाडी मिळवायच्या खटपटीला जशी लागली तसा नाभिराजाचा पार निरुपायच झाला. म्हणाला, 'माझी गाडी आहे, मी स्वत:च पोहोचवीन तुम्हाला स्टेशनपर्यंत.'

दुसऱ्या दिवशी सकाळी त्यानं बैलगाडी जोडली. सारे तिच्यात बसले. सुंदरव्वाही घरापासून गावशिवेपर्यंत गाडी सोबत पोहचवायला आली. जोडीला अनंताचा थोरला मुलगाही होता. गाव पार केल्यावर तो म्हणाला, 'मी ही स्टेशनपर्यंत जातो काकांच्या बरोबर गाडीतनं ......' इंदिरव्वानं त्याला गाडीत बसून घेतलं आणि गाडी पुढं निघाली. स्टेशनवर गाडीतनं उतरताच ती लेकाच्या गळ्यात गळा घालून रडायला लागली. मुलगाही रडला. इंदिरा म्हणाली, 'आता मी फिरुन कधी परत येईन अन् हे पोर पुन्हा कधी माझ्या दृष्टीला पडेल...?'

भावानं तिला धीर दिलासा देत म्हटलं, 'असं का म्हणत्येस, तू चल तर खरी...पंधरा दिवसात तुला खडखडीत बरी करुन परत धाडतो की नाही ते पाहाच !

रुक्कव्वाचे, अनंताच्या सासूचेही डोळे आसवांनी भरुन आले. अनंत एकदा मुलाकडे आणि एकदा त्यांच्याकडे टकाटका नुसता पाहात राहिला. त्याचे डोळे कोरडे ठाक पडले होते. नव्हतं त्यांच्यात पाणी की कसला भाव ...अगदी निर्विकार! बसमध्ये बसायच्या आधी इंदिरव्वानं लेकाला जवळ बोलावून त्याच्या पाठीवरुन वात्सल्यभराने हात फिरवला आणि तिला एकदम रडू कोसळलं.. आसवं ढाळीत ढाळीतच ती म्हणाली, 'जाऊ ना पोरा, मी ?'

नाभिराज भावजयीपाशी जात म्हणाला, 'रडू नकोस, वहिनी. मी तुमच्याहून त्याला अधिक जपेन..फुलासारखा सांभाळीन. त्याची बिल्कुल काळजी करायची नाही या पुढं तुम्ही अगदी निश्चिंत राहायचं. समजलं ?'

'कसंही असो, आईची बरोबरी कोण करु शकेल ? तिनं त्याला मारुन पिटून खायला घातलं आणि तुम्ही मोठ्या प्रेमानं भरवलं म्हणून काय त्याची बरोबरी थोडीच होणार आहे..?' असं म्हणत रुक्कव्वाही रडायला लागली.

'बस आता रडणं बिडणं पुरं झालं' असं म्हणत एकानं त्याना बसमध्ये चढवलं.

तेरदाळ मध्ये ते काही दिवस राहिले. त्या काळात भंगारीची दोन पत्रं अनंताला आली. त्यातल्या एकात असा भाव व्यक्त झाला होता की, अनंत, आता मी माझ्या हृदयांतरीची सारी प्रेमभावना समूळ उपटून फेकून द्यायचा निर्धार केला आहे. प्रेमापायी समाज आणि आप्तस्वकीयांची पर्वा न करता मी ज्याचा हात धरुन घराबाहेर पडले तो जर मला असा दुरावला तर त्याहून अधिक अशी जगात विटंबना ती कोणती असेल ?

अनंतानं यावर काय उत्तर धाडलं असेल याची काही कल्पना नाही, पण कधी कधी त्याच्या मनात विचार डोकवायचा, ताराचं कसं काय चाललं असेल ? कशी

काय असेल तारा ? अशा प्रकारे त्या हृदयात कधी एकदा भंगारी तर कधी तारा डोकावून जायची. कधी कधी त्या दोघीही जोडीनेच त्याच्या कल्पना सृष्टीत दृष्टिगोचर व्हायच्या. त्याला वाटायचं की या दोघींहीवर आपलं अनन्य साधारण असं प्रेम आहे. कधी कधी त्याला असा भास व्हायचा की त्या दोघीही त्याच्या आसपासच वावरताहेत. अजूनही त्याच्या मनाच्या अवकाशात त्याच्या हृदयांतरी एक छोटीशी अतृप्ती होती. तो अधिकाधिक क्षीण होत गेला, त्याच्यातला अशक्तपणा वाढीला लागला.

इंदिराच्या अवस्थेत काहीशी सुधारणा होती. तिचे पाचसहा भाऊ होते. सर्व जण वेगवेगळे राहत असत, परंतु ते सारे रोजच्या रोज येऊन तिला भेटून जात असत. रुक्कव्वा स्वत: मुलीचं हवं नको पाहत होती तिला जातीनं शुश्रूषा करीत होती. 'एका भावावरच सारा भार काय म्हणून ? सर्व जण थोडा थोडा भार वाटून घेऊया' हा व्यवहारविवेक त्यांना सुचला, एवढ्याचसाठी दुसरा एक भाऊताई राहिल चार दिवस आमच्याकडे. तेवढाच जरा तिला थारे पालट होईल..' असं सांगून बहिणीला आपल्या घरी घेऊन गेला. अनंत आता हिंडू फिरु लागला होता. 'आम्ही चारपाच भाऊ आहोत, आम्हाला आमची बहीण काही जड नाहीए.' हे उद्‌गार त्याच्या कानी पडले. सासूनं स्त्री स्वभावानुसार हे त्याला सांगून 'जावई नीट वागले नाहीत, त्यांनी स्वत: बरोबरच माझ्या लेकीच्या आयुष्याचाही नाश केला' असं उणदुणं व्यक्त करून त्याला एक प्रकारे पाण उताराच केला. अनंताला ते सारं मुळीच सहन झालं नाही. एक दिवस घरात कोणी नाही असं पाहून तो बायकोपाशी गेला अणि म्हणाला, 'आपण आपल्या घरी परत जावं हे बरं. इथं ह्या वैद्याच्या हातनं कुठचा गुण यायला अन् कुठनं आपण बरे व्हायला ! आपल्या आपल्यात घरची गोष्ट वेगळी आहे. तिथं वेळेला काय हवं नको ते आपण करून खाऊ शकतो.'

'आणि आता इथं काय वेळेवारी सारं होत नाही होय ? सारं काही व्यवस्थित तर होतंय, उगाचच काही तरी खुसपटं काढणं बरं नाही. तशा माझ्या भावजायाही वागाय करायला चांगल्या आहेत. तुमच्या भावाच्या बायकोसारख्या त्या असत्या तर काय करणार होतो ?'

'तुला तुझ्या भावजया असतीलही चांगल्या. पण जरा कुठं चार दिवस आम्ही इथं राहिलो नाही तोच एकेकानं मारे पाळ्या वाटून घेतल्या आम्हाला ठेवून घ्यायच्या.'

'कशा प्रकारे का होईना पण ते करतातच आहेत ना आमचं ? दोघांचाही सांभाळ त्यांनाच करायचाय ना ? पाळ्या वाटून घेवोत नाहीतर आणखी काही करोत. तुम्ही अशा व्यर्थ शंकाकुशंका काढीत बसू नका गडे.' असं म्हणत तिनं एक गाढ नि:श्वास सोडला. जणू त्यावाटे तिचं पिळवटलेलं काळीजच स्त्रवले होते.

'काही नकोय ते. चला आपण आपल्या घरी परत जाऊ या. अशा प्रकारे यांनी

आम्हाला सांभाळायची काही एक गरज नाहीए. आम्ही काय यांच्या दाराशी धरणं धरलं होतं का आम्हाला तुमच्या घरी घेऊन जा आणि आम्हाला सांभाळा. आमची सेवा शुश्रुषा करा म्हणून ?'

'मिरजच्या इस्पितळातनं तुमच्या भावानं पत्र घातलं होतं याना. शेवटी तुम्हाला हे असंच म्हणायचं होतं तर मुळात मग तुम्ही आलातच का इकडे ? आता एकदा येऊन चुकलो आहोत खरं आणि आता लगेच परत गेलो तर चार लोक काय म्हणतील ? तुमच्या अंगात थोडं बहुत त्राण तर आलं ! स्वत:च्या पायानं गल्लीतल्या गल्लीत चालत जाऊन लोटाभर पाणी आणायची जरा माझ्यात शक्ती तर येऊ द्या. जरा प्रकृती सुधारली नीट की जाऊ मग. तिथं गेलो तर वेळेला कोणी घोटभर पाणी आणून नाही कोणी मुखात घालणार.' तिनं अडचणींचा पाढा वाचला.

'काही का होईना, आता इथं जगायची इच्छा आहे कोणाला. मरायचंच आहे तर स्वत:च्या घरीच आनंदानं प्राण सोडू. मी इथं आता राहणार नाही की इथलं थेंबभर पाणी तोंडात घेणार नाही. लोकांची मला पर्वा नाहीए.' त्याच्या डोळ्यासमोर स्वत:च्या आयुष्यातल्या साऱ्या जुन्या घटना घडामोडी तरळून गेल्या असाव्यात. नवऱ्याचं बोलणं ऐकून इंदिराव्वाचं काळीज भरून आल्या सारखं झालं असणार. डोळ्यातून घळघळा अश्रु धारा वाहायला लागल्या. डोळे पुसत एकवार अनंताकडे पाहत म्हणाली, 'तुमच्या पाया पडते, मरताना तरी आपली साथसंगत सुटता कामा नये. कोण जाणे कुठल्या जन्माचं कर्म भोगणं नशिबी आलंय ! या जन्मी नवराबायको म्हणून दैवानं गाठ घालून दिली. चार दिवस कसा का होईना आपण जोडीनं संसार केला. आणि आता तुम्ही कुठं तरी जाऊन देह ठेवायचा आणि मीही अशीच कुठं तरी प्राण सोडायचा एवढं तरी निदान वाट्याला न येवो. तुमच्या शरीरात थेंबभर रक्त नाहीए. अद्याप मलाही धड उठून चार पावलं टाकता येत नाहीत. हे तुम्हाला सारं चांगलं वाटतं का ? जरा नीट मनाशी विचार करून पाहा.'

'चांगलं काय आहे माती !' ठामपणे अनंत म्हणाला. अनंतच्या डोळ्यातनं अश्रुधारा वाहू लागली होती.

त्याच दिवशी संध्याकाळी इंदिरव्वाच्या बिछान्याशी तिचे भाऊ आणि आई रूक्कव्वा बसलेली असतानाची गोष्ट: रूक्कव्वा म्हणाली, 'दुखण्यापायी लाकडाला लागलेल्या भुंग्यासारखी रात्रंदिवस कटकट करून कसं चालेल ? घर आहे तिथं कमी जास्त होत राहणारच.. भांड्याला भांडं लागणारच. त्या पायी कोणाला तरी थोडा बहुत त्रास. मन:स्ताप सोसावा लागतोच. आणि कोणी असंच काही चुकून माकून काही बोलून गेलं तर लगेच डोक्यात अशी राख घालून घ्यायची असते होय ? याच्या भावाची बायको अगदी चांगल्या चालत्या काळात देखील दोन घास खायला घालायआधी दहा गोष्टी

सुनवायची याला. एखाद्या कुत्र्याला भाकरी टाकावी तसं वागायची ती याच्याशी. ते सारं विसरलाय वाटतं ? आमचं वागणं करणं याला गोड वाटत नाही होय ?'

इंदिरव्वा थरथरा कापत म्हणाली, 'पुन्हा तोंडातनं असं काही काढायचं नाही हं, आई. असं बोलूनच तू त्याना संतापायला लावलंस. तुम्ही मंडळी जुन्या जमान्यातली आहात. तुम्हाला काही म्हणता काही समजत नाही बघ. आजकालच्या मंडळीसमोर असलं काही बोलून काम भागत नसतं. त्यांनी जिथं कधी स्वत:च्या आईवडीलांची पर्वा केली नाही तिथं ते तुमचं ऐकून घेणार आहेत होय ?'

'ऐकून घ्यायचं नसेल तर मग इथनं टळत का नाही ? अब्रूची चाड असती तर भाकर तुकडा का न कमावता ? साऱ्याची वाट लावली... सत्यानाश करून सोडला.. आता याला अक्कल येणार तरी कधी ?'

'आमची परिस्थिती कशीही का असेन. पण तूच असं बोलायला लागलीस तर भावजया काय म्हणतील ? आम्ही इथं नाही राहणार आता. उद्याच आम्ही आपल्या घरी निघून जाऊ.' मग ती भावाकडे वळून म्हणाली, 'दादा, खर्च करून जे काही पैसे वाचले असतील ते देऊन टाक. आम्ही जातोय.' आणि रडायला लागली.

'हां पुरे, गप्प आता. फार शहाणे आहात झालं सारे. अन् तू इथनं उठ पाहू...' असं म्हणत भावानं रूक्कव्वाला तिथनं उठून लावलं. नंतर तो म्हणाला, 'इंदिरा, मी तुला सांगितलं नाही एकदा, की म्हातारी काहीही बोलली तरी वाईट वाटून घ्यायचं नाही म्हणून ?'

'मी कुठं वाईट वाटून घेतेय. पण ते थोडेच ऐकून घेतील ?'

'त्यानंही तू हे सारं समजावून सांगायला हवंस की नाही ?'

'तुम्ही लोक काय वाट्टेल ते म्हणा. पण त्यांनी इथून जायचा चंगच बांधलाय.आज संध्याकाळीच ते तुझ्याकडे या बाबतीत बोलणार होते.' असं म्हणत इंदिरा स्फुंदून स्फुंदून रडायला लागली.

अनंताला सर्वांनी समजावून सांगितलं पण त्यानं आपलाच हेका कायम ठेवला. शेवटी इंदिराच्या थोरल्या भावानं रागारागानं आतनं पैसे घेऊन येत म्हटलं, 'वीस रूपये तिथंच खर्च झाले होते. घ्या हे तुमचे उरलेले आठशे ऐंशी रूपये. आमची बहीण आम्हाला काही जड नाहीए. जोवर जगेल तोवर आम्ही तिला सांभाळू. मेली तर मूठमाती करू. बरी झाली तर येईल तुमच्याकडे. तुमची इथं राहायची इच्छा नाही तर जा झालं. आम्ही तर तुम्हाला बरं करावं म्हणून इथं घेऊन आलो होतो. पण दिवसें दिवस तुमचा आजार बळावतच चाललाय. आता या आपण. आणि राहा खुशाल आपल्या भावा बहिणींकडे आणि नात्यागोत्यातल्या लोकांपाशी. तुमचीही आई आहे, धाकटा भाऊ आहे, त्याची बायको आहे.'

अनंतानं काही काळ विचार केला आणि त्यातले फक्त पाच रूपये त्यानं काढून घेतले. अंगात कोट चढवला आणि जायला निघाला. इंदिरा अंथरूणावर पडल्या पडल्याच विनवणीच्या स्वरात नवऱ्याला म्हणाली, 'आता दिवस चांगलाच वर आलाय, कोणास ठाऊक गावी कधी पोहोचाल ते! भात शिजतोय, थोडा खा आणि जा. अजून बसला अवकाश होईल.'

'वाटेत हवं तर होरागेरीला उतरेन, एकवार तारकाची भेट घेईन आणि उन्हं उतरल्यावर संध्याकाळचा पुढं जाईन,'

'पुन्हा तिथं कशाला उतरताय आता ? तिचा नवरा काय माणूस आहे ? अहो, मामंजी एवढे वारले तरी तिला साधं समाचाराला जाऊ दिलं नाही त्यानं. उगाच तिला का फुकाफुकी संकटात लोटताय तुम्ही ?'

अनंत त्यावर काही एक बोलला नाही. पाय ओढत ओढत बाहेर गेला. त्याच्या तोंडावर आता ती पहिली रया उरलेली नव्हती.. चहा तर घेऊन जा, 'आधण ठेवलंय मी.' माजघराच्या दरवाजा आडून मेव्हण्याची बायको म्हणाली.

'आता काही एक नकोय, वेळ मिळालाच तर बसस्टॅण्डवर पिईन. आज आता ही बस हुकली तर संध्याकाळ पर्यंत दुसरी बस नाहीए मग.' असं म्हणत लटपटत्या पायानं अनंत जायला लागला.

अनंतानं दरवाजाबाहेर कुठं पाऊल टाकलं असेल नसेल तोच इंदिरा ओरडून म्हणाली, 'थोडे आणखी पैसे घेऊन जा बरोबर.'

अनंत पार दृष्टिआड होईपर्यंत इंदिरा दरवाजाकडे पाहत राहिली. नंतर एक प्रदीर्घ सुस्कारा सोडीत म्हणाली, 'दादा, निदान त्यांना बसमध्ये बसवून देऊन तर यायचंस.' आणि तिनं अंथरूणावर अंग टाकलं.

# 22

तारक्काला अद्याप मुलबाळ वगैरे काही झालेलं नव्हतं. आणि या गोष्टीची तिला तशी चिंताही नव्हती. तिचं शरीर दिवसें दिवस रोडावत चाललं होतं, तरी सुध्दा घरातलं सारं कामधाम ती अगदी मन लावून करीत असायची, नवऱ्याच्या खाण्या पिण्याकडे लक्ष पुरवायची. परंतु आजकाल तिचा कल विरक्तीकडे लागून राहिला होता. थोड्या दिवसांपूर्वी गावातले काही लोक यात्रेला जायला निघाले तसं तिनं आपल्या आई वडिलांना गावाहून बोलावून घेतलं. आणि मग आपले आई वडील, नवरा आणि सासू यांच्या समवेत गावावाल्यांसह बेळगोळ, कारकल, मुडबिद्री वगैरे तीर्थक्षेत्रांची यात्रा करून आली. नंतर एक देऊळ बांधून त्यात तिनं देवाच्या मूर्तीची प्राणप्रतिष्ठा केली. निश्चिंत मनाने मग रोज सकाळ संध्याकाळ देवळात जाऊन तास तास पूजापाठात घालवायला लागली. लहानपणी ऐकून ऐकून पाठ झालेल्या आरत्या गात गात देवाची आरती करायची. ते झालं की तिच्या तोंडून सहजपणे बाहेर येई: 'देवा दीनदयाळा, सोडव बाबा मला लौकर या आयुष्यातून; ने मला एकदा आपल्या पायाशी!' या शिवाय आणखी एका गोष्टीकडे तिचं मन हल्ली लागायला लागलं होतं. बागेत राबणारी गडी माणसं, एखादा गरजू वाटसरू अशातलं कोणी आलं की त्याला जेवायला खायला घालण्यात तिला फार मोठं समाधान लाभत असायचं. अशा कामात तिला आळस कसा तो माहीत नव्हता, ती सदैव कामात गढलेली असायची. कधी कधी पोट दुखायला लागायचं. पोटात अशा भयानक कळा यायला लागल्या की ती अगदी हैराण होऊन जायची. अशावेळी तिला कसलं भान राहत नसायचं. साऱ्या घरभर गडबडा लोळत कण्हत पडायची. घरातल्या लोकांनी कोणा चांगल्या डॉक्टर वा वैद्याला दाखवून प्रकृती तपासून घ्यायसाठी कितीही आग्रह केला तरी ती ते कटाक्षानं टाळायची.

एकदा तारक्का पोटदुखीपायी अशीच तडफडत जमिनीवर लोळत पडली होती. स्वयंपाक पाणी वगैरे काही करू शकली नाही. शेजारीच राहणाऱ्या नात्यातल्या एका मुलीला बोलावून तिनं तिला स्वयंपाक करायला सांगितलं. नवरा बाहेरनं येईल, तो पर्यंत जेवण तयार व्हायला हवं. तारक्काच्या एकूण वागण्यासवरण्यावर नातेवाईक खूष होते. त्यामुळे तिच्या सुखदु:खात तिला साथ द्यायला तिच्या अडीअडचणीला मदतीला उभं राहायला त्यांना आनंदच वाटायचा. तारक्का एक सतरंजीशी अंथरून तिच्यावर

ह्या कुशीची त्या कुशीला वळत उलथी पालथी होत राहिली. तिचा आंबाडा सुटला. केस मोकाट अस्ताव्यस्त पसरले. गडबडा लोळण्यामुळे नेसूचं लूगडंही अस्ताव्यस्त झालं. पोटात कळा येतच होत्या. त्या वेदनांना अंत नव्हता. त्या तशाही अवस्थेत ओठ घट्ट मिटून, वेदनांना आवर घालायचा प्रयत्न करीत ती त्या मुलीला स्वयंपाकाबाबत 'हे कर, ते कर' अशा सूचना देतच होती. अम्मव्वा तिथं जवळच एका बाजूला बसली होती.

ती म्हणाली, 'दर दहा पंधरा दिवसांनी एकदा अशी ही पोट दुखीनं तळमळत पडतेस. डॉक्टरला दाखवून घे म्हटलं तर तिकडे ध्यान म्हणून देत नाहीस. आता यावर माणसानं बोलावं तरी बाई काय ? कोणा चांगल्या डॉक्टर वैद्याला दाखवून औषधपाणी घेतलंस वेळच्या वेळी तर उद्या कूस उगवेल..... मुलं बाळं होतील. ते सारं सोडून नुसतं असं तगमग तगमग करीत लोळत पडून राहण्यानं कसं काम भागेल बाई ?'

'राहू द्या आई, तुम्ही नका कटकट करू आणखी. इकडे माझा पोटदुखीपायी जीव जायची वेळ आलीय. काय सांगू तुम्हाला ? ज्यांना मुलं बाळं आहेत. ते मोठं सुख लुटून राहिल्येत की नाही ? आता आमच्या वाट्याला कोणाचं असं मोठं सुख येणार आहे ?' पोट दुखीनं हैराण होऊन गेलेली तारक्का काहीशा रागारागानं म्हणाली.

'जरा गप्प बस. तुझ्या तोंडी कोणी लागावं ? मुलबाळं असणाऱ्यांना सुख लाभत नाहीतर राहा तू तशीच बिन पोराबाळाची. तुला काय म्हणा त्याचं ? इथं वाटोळं झालयं ते आमच्या घराचं. आम्हाला तर इथं रात्रंदिवस असा घोर लागून राहिलाय की घराला वारस नाही. घराण्याचा वंश वाढला नाही तर या घराचं आता पुढं काय होणार ?'

'मी तुमच्या घराण्याचं वाटोळं कशाला करीन ? मूल बाळ होत नाही त्याला मी काय करणार ? मूलबाळ होणं न होणं ही का माझ्या हातची गोष्ट आहे ?'

'तसं नव्हे ग, पोरी! मला येवढंच म्हणायचंय की आपल्या हातात आहे तेवढं आपण करीत रहावं. त्यावर मग पुढं परमेश्वराची मर्जी, झालं तरी वाहवा, नाही झालं तरी वाहवा! कोणा चांगल्या माणसाला दाखवून औषध पाणी करायचं सोडून नुसते पूजा पाठ करीत बसण्यानं आणि देवळाचे उंबरठे झिजवीत राहण्यानं का काम भागणार आहे ? जपजाप्य आणि ध्यान धारणा करीत बसायला काय तू आजच म्हातारी झालीयेस होय ? अजून तुझी पुरती तिशी देखील उलटलेली नाहीए. देव देव करायला किनई म्हातारपणी हवा तेवढा वेळ मिळेल तुला.....'

'उद्याचं कोणी पाहिलंय ? उद्या देवाची पूजा अर्चा करीन म्हटलं तरी ती माझ्या तरी ती माझ्या हातून होईलच याची काय शाश्वती ? हातापायात त्राण आहे तोवर देव दर्शनाला जातेय झालं. उद्या एकाएकी खचले, कोसळले तर हातून देवाची सेवा थोडीच घडणार आहे ?'

पोटदुखी पायी कष्टी झाल्यामुळे सूनबाई हे असलं काहीबाही बोलतेय झालं अशा समजुतीनं अम्मव्वा म्हणाली, 'माणूस म्हणजे कोणी झाडझूडूप थोडंच आहे असं एकाएकी भुईसपाट व्हायला ? आजं आठ दहा वर्ष झालीत डोळ्यांनी धड दिसत नाहीए. मी इथं तिथं पडत झडत धक्के खात खात जगतेच आहे की नाही ? देव कुठं दडलाय काही कळत नाही ? माझ्याकडे लक्ष द्यायला जणू त्याला वेळच नाही ! तुम्हा लोकांना झालंय तरी काय ? अग कालच्या पोरी बाळी तुम्ही... लग्नानंतर वर्षाच्या आत पोर व्हायला हवं तुम्हाला... आणि आता ह्या असल्या गोष्टी करत्येस. काय म्हणावं काय तुम्हा आज कालच्या पोरींना ?'

तेवढ्यात अप्पण्णा बाहेरून आला. उन चांगलंच झालं होतं. खांद्यावरची कुदळ कोपऱ्यात ठेवत त्यानं विचारलं, 'कुठं गेलीय, दिसत नाहीए ती ?'

'न दिसायला काय झालंय ? जाणार कुठं ती ! त्या तिथं पडलीय ती या कुशीची त्या कुशीला होत तडफडत लोळत. तुला तुझं शेत आणि घर या पलिकडे दुसरं काही दिसत नाही. मला समजत नाही मग हे सारे कष्ट तू कोणासाठी उपसतोयस ते ! मला इथं डोळ्यानं धड दिसत नाही. आणि तू तिला साधं माहेरी जा चार दिवस... आराम कर, चांगली बरी होऊन परत ये असं देखाल म्हणत नाहीस. इथं माझं मेलीचं ऐकतोय कोण ?'

'का बुवा, बरं व्हायला, प्रकृती सुधारून घ्यायला मी मना थोडंच केलंय कोणाला ? खर्चाला पैसे हवे असतील तर घे, जायचं असेल, माहेरी दहा पंधरा दिवस राहून कोणाला तब्बेत वगैरे दाखवून यायचं असेल तर जाऊन ये. ही गेल्यानं इथं कामं अडून राहतील अशातलाही भाग नाही. शेजारी पाजारी कोणी ना कोणी येऊन हवं नको पाहून जातात. वेळेला भाकर तुकडा करून खायला घालतात. आमचं कोणतं असं काम अडून राहणार आहे ?'

तारक्कानं मनाशी म्हटलं, 'मी इथं नसल्यामुळं कोणाचं काय अडतं ? साऱ्यांची सारी कामं सुरळीत पार पडतात. व्यवस्थित चालतं, देवानं मला जिवंत तरी कशाला ठेवलंय काही उमजत नाही.'

अप्पण्णानं आत येऊन म्हटलं, 'तुझ्या बाबांना गाडी घेऊन यायसाठी निरोप धाडतो. असं नुसतं अंथरूणावर पडून काम कसं भागेल ? इथूनही गाडी धाडली असती. पण सध्या उसाला पाणी पाजायच्या कामांची मागे घाई गर्दी आहे. म्हणून म्हटलं ते स्वतःच तिकडनंच गाडी घेऊन येतील तर जरा सोईचं पडेल !'

तारक्का त्यावर काही एक बोलली नाही. गप्प पडून राहिली. अप्पण्णानंच फिरून विचारलं, 'का गं गप्प का ? काय म्हणत्येस ? जाशील ना ?'

'कशाला जाऊ, तिथं जाऊन काय होणार आहे ?'

'तिनं आजवर कधी सरळ उत्तर दिलंय. तिचं काही ना काही तिरपगडंच उत्तर असतं. नवरा येवढं जीव तोडून विचारतोय एक दिवस तरी कधी तोंड उघडून सरळ उत्तर देऊ नये होय माणसानं ? तू असा तिरसटासारखं कपाळाला सतराशे छप्पन आठ्या विचारल्यावर ती तुला कधी काही सांगेल म्हणतोस ?' अम्मव्वानं लेकाला भडकवीत म्हटलं.

'नाही सांगितलं तर स्वत:चं दु:ख स्वत:च भोगील झालं. त्यात कोणाचं काय जातंय ? आपल्या हातानं आपल्या पायावर कुऱ्हाड मारून घेतेय अन् काय !'

'आपण होऊन आपल्या पायावर कुऱ्हाड मारून घेत्येय खरी; पण त्याचे घेव इतरांच्यावरही बसतात त्याचं काय ?' अम्मव्वानं ठणका ठेवून दिला.

'आम्हाला काय त्याचं ? आम्ही आमचा मार्ग पाहिला पाहिजे. आम्ही आमचं आमच्यापुरतं पाहिलं पाहिजे,' असं म्हणत अप्पण्णा बाहेर निघून गेला.

नवऱ्याच्या तोंडून हे शब्द कुठं बाहेर पडले तोच तारक्का ताडकन म्हणाली, 'धाडावा निरोप बाबांना. मी जात्ये. माझ्या इथं राहण्यापायी तुम्हाला उगा कष्ट कशाला ! तुम्ही मंडळी खुशाल तुमचं तुमच्या पुरतं पाहा. मी कुठं ना म्हणत्येय त्याला ! माझ्यापायी तुम्ही कशाला उगा तुमचं घर बरबाद करताय ?' तारक्काचा गळा सुकला होता, घशाला कोरड पडली होती. अडत अडखळत कसा तरी एक एक शब्द तिच्या तोंडून फुटत होता.

या साऱ्या गोष्टी लक्षपूर्वक ऐकल्यावर अम्मव्वा म्हणाली, 'तू तर सारं काही झटकून मोकळी झाली आहेस पण त्या म्हाताराम्हातारीकडे नको का आम्ही पाहायला ?'

'त्याचं खाल्लं आहेत. पाहा त्यांच्याकडे, माझं काय खाल्लं आहेत म्हणून माझा विचार केला पाहिजेत तो ?'

'कुठली गोष्ट कशाला जोडतेयस, कशाचा कशाला काही पत्ता आहे का ? उगाच जीभ चालवू नकोस.' अप्पण्णानं मध्येच तिला टोकत म्हटलं.

त्याच दिवशी सायंकाळी तारक्का बाजूची झाली. ओटी पोटातल्या कळा थांबल्या. अलीकडे काही दिवसांपासून मासिक पाळीच्या आधी अशा प्रकारे तिचं ओटीपोट भयानक दुखायचं, मरणाच्या कळा येत. ह्या दोन तीन दिवसातच चंपा आपल्या सासरहून आली होती. एक दिवस तिनं बागेकडेही चक्कर टाकली. ती कदीही आली की अगदी जबरदस्तीनं तारक्काकडून साडीचोळी वसूल करून घेऊन जायची. ह्या खेपेला तिला कर्णफुलं हवी होती. ती तारक्काच्या खनपटीलाच हटून बसली. तारक्कानं तिच्या कानांकडे पाहात म्हटलं, 'अग तुझ्या कानात तर चांगल्या बुगड्या आहेत- आता आणखी घेऊन काय करणार आहेस ?

'या माझ्या नाही आहेत. मावशीच्या आहेत. माझे कान अगदीच बुच्चे होते. म्हणून चार दिवसांसाठी या बुगड्या तिनं उगाच आपल्या मला घालायला दिल्यात. गेल्या

गेल्याच त्या तिला परत करायला हव्यात.' चंपा म्हणाली.

'यांना म्हटलं तर हे थोडेच बनवून देणार आहेत? म्हणतील असा फुकटचा खर्च कशाला करत्येस तो? माझ्या पाशी मोत्याच्या कुड्या आहेत. हवं तर घेऊन जा त्या.' मग जरा थांबून एक दीर्घ नि:श्वास टाकीत म्हणाली, 'कान तसेच बुच्चे राहिले तरी काय हरकत नाही. परंतु लोकांकडून असं उसनं पासनं मागून आणून काही घालणं वापरणं बरं नाही, पोरी.'

त्या दिवशी दुपारी नवऱ्याबरोबर इकडचं तिकडचं काही बोलता बोलता म्हणाली, 'चंपासाठी बाजारातनं एखादी साडी आणवून घ्यायची'.

'हूं. असं काही आम्ही तिला आणखी किती दिवस पुरवीत राहणार! लग्न लावून दिलंय. आता तिनं सासरी नवऱ्याकडे व्यवस्थित राहायला हवं. रोजच्या रोज अशी येऊन मागायला लागली तर कुठं पुरे पडणार आहोत आपण?'

'माझ्या पोटी जन्माला येती तर नसतं का केलं आपण तिच्यासाठी? पण तिच्या जरी पोटी ती जन्मली असली तरी अखेर ती तुमचीच मुलगी नव्हे का?'

'नाही कोण म्हणतो? पण अगदी मुलगी म्हटलं स्वत:ची तरी किती द्यायचं? रीतीप्रमाणे जेवढं द्यायचं, तेवढं दिलं. आणि जेवढं करायचं तेवढं केलं!'

तारक्कानं मग विषय अधिक वाढविला नाही. कर्णफुलांचं विचारायचं तेवढ्यावरच राहून गेलं. चार दिवसांनी चंपा सासरी जायसाठी निरोप घ्यायला आली. तेव्हां पाणावल्या डोळ्यांनी तारक्का तिला निरोप द्यायला म्हणून बागेपासून जरा दूर तिच्याबरोबर चालत गेली आणि मग पोरीचा हात हातात घेत एक दीर्घ उसासा टाकीत म्हणाली, 'मी यांना साडी आणा म्हणून म्हटलं होतं. पण यांनी आणली नाही, बाळ!'

'राहू दे, यावेळी आईनं घेतलीय मला साडी.'

तारक्का बराच वेळ लेकीच्या तोंडाकडे निरखून पाहात म्हणाली, 'आईनं घेतली म्हणून काय झालं? तुझ्या सासरची मंडळी काय म्हणतील पोरी?' मग जरा थबकून आपल्या साडीच्या पदराच्या शेवेत बांधून आणलेल्या मोत्याच्या कुड्या आणि दहा रूपये काढीत म्हणाली, 'घे, ह्या कुड्या आणि हे पैसे. मावशीनं मागायच्या आत तिला तिच्या कुड्या परत करून टाक आणि जाताना या पैशातनं साडी घेऊन जा तुझ्या आवडीची, समजलं?'

ते घेताना चंपाचं मन जरा कांकू करू लागलं. तिला काहीसं अवघडल्यासारखं होऊन गेलं. चकित मनानं ती तारक्काकडे पाहतच राहिली. मग हळूच म्हणाली, 'बाबा रागावणार तर नाहीत?'

'ते काय म्हणून रागावतील! पंचमीला मी माहेरी गेले होते तेव्हां आईनं पोलक्या साठी दहा रूपये दिले होते. त्यात त्यांचं काय आहे? कुड्याही आईनंच केल्या होत्या.'

कुड्या तेवढ्या घेत चंपा म्हणाली, 'तू शिव ना पोलकं तुला स्वत:ला.'

'माझं काय ग, घरात आणखी तीन चार पोलकी आहेत की माझ्याकडे. जुनीपानी असली तरी चार दिवस वापरीन ती मी. आता तुला चार ठिकाणी यावं जावं लागतं. व्यवस्थित दिसलं पाहिजे. सासरी सुखानं रहा हं, बाळ.'

आता मात्र तारक्काकडे नजर जाताच चंपाला रडू कोसळलं. थरथरत्या हातानं तिनं तारक्कानं दिलेले पैसे घेतले. रडवेल्या स्वरात म्हणाली, 'जोवर तू आहेस तोवर मला माहेर आहे. तुझ्या मागे या बागेत मला कोण आहे विचारपूस करायला ?'

'जोवर मी आहे तोवर तर येत राहा, बाळ आणि माझ्या मागेही न यायला काय झालंय ? तुझी आई तुझ्यासाठी खूप काही करीत असेलच. माझ्या कडून होईल तेवढं मी करत्येच. येवढं माहेरपण गोड मानून घेत चल.'

'कशी ग खुळी तू, जन्मदात्री आई तुझ्याएवढं कुठं काही करतेय होय ? तू खूप काही केलंयस माझ्यासाठी, कोण जाणे कुठल्या जन्मीची आई होतीस तू माझी !' असं म्हणत ती स्फुंदून स्फुंदून रडायला लागली.

तारक्कानं तिच्या गळ्यात गळा घालीत, तिला वात्सल्यानं गोंजारीत म्हटलं, 'उगी उगी आता हे रडणं, हे डोळ्यात पाणी कशासाठी ? अगदी सुखात सासरी नांदायचं हं.'

'तू दिवसेंदिवस अशी रोडावत कशानं चाललीयस ? कशानं एवढी अशक्त होत चालतीयस ? कोणा चांगल्या डॉक्टर वैद्याला दाखव ना. असं स्वस्थ बसून, अंगावर काढून कसं चालेल ?'

'आता जगायचं तरी कशासाठी ? सर्वांनाच भार झालेय ना मी !' मग मनोमन विचार करीत म्हणाली, 'आता कुठची मी बरी व्हायला ?'

जड पावलांनी चंपा गावाकडे जायला निघाली. चार पावलं कुठं गेली असेल नसेल तोच काही एक सुचून पुन्हा माघारी फिरली, वाकून तारक्काच्या पाया पडली. पुन्हा परत जायला निघाली, तशी तारक्का म्हणाली, 'माझ्या आईनं या कुड्या केल्यात असं सांगून मावशीला तिच्या तिच्या कुड्या परत करून टाक.' मग थोडा विचार करून नाही तर त्या कुड्या तू तुझ्या आईकडेच ठेवून जा असं म्हणत ती घरी परतली.

काही दिवस लोटल्यावर सासूच्या आग्रहावरून तारक्का आपल्या माहेरी चांदूरला गेली. तिथं मल्लनं जवळपासच्या दोनतीन वैद्यांना दाखवून औषधपाणी केलं. तीन चार आठवडे असं औषध घेतल्यावर तारक्काच्या प्रकृतीत काहीशी सुधारणा झाली, तेवढ्यातच तिनं औषध घेणं बंद केलं आणि पुढे आणखी दोन तीन आठवडे माहेरी राहिली. तिला कुठून तरी समजलं की अनंत सध्या तेरदाळमध्येच आहे. तिथं जावं, त्याला भेटून यावं असं तिला आतनं भारी वाटायला लागलं. पण असं काही आपण म्हटलं, तर आपल्या

आई.वडिलांना काय वाटेल याचंही तिला मनोमन भय वाटत होतं. पूर्वी त्याच्या घरी जाण्यापायी भांडण झालं आणि ते भांडण मिटविण्यासाठी आपल्या आईवडलांना त्यावेळी काय काय सहन करावं लागलं हे सारं तिला आठवलं असणार! आणि तरी सुध्दा तिचं मन अनंताकडे ओढ घेतच होतं. एक दिवस ते तिघे असेच बसले असता भीत भीत तिनं तो विषय काढला. म्हणाली, 'बाबा, अनंताला भेटलेल्याला खूप दिवस झालेत. जाऊन येऊ या न आपण एकदा ? ऐकलंय की हल्ली तो तेरदाळमध्येच आहे.' तिच्या बोलण्यात जसा विनव तसाच एक प्रकारचा संकोचही होता.

'त्याला काय भेटायचं, तो काय चांगला माणूस आहे ? आम्हाला वाटलं होतं की तो चार दिवस चांगला वागेल, व्यवस्थित घर प्रपंच सांभाळील. पण त्यानं साऱ्या घरादाराचा पार सत्यानाश करून टाकलाय. आता कोणाच्या तरी दारात जाऊन पडलाय झालं.' मल्ल एक एक शब्द सावकाश उच्चारीत म्हणाला.

ती गोष्ट तारक्काच्या काळजाला चाटून गेली. तो या दशेला येऊन पोहचण्याचे कारण एक अनंत सोडला तर तारक्कालाच काय ते माहीत होतं. ती थोडा वेळ तशीच स्तब्ध बसून राहिली आणि मग दीर्घ उसासा टाकीत म्हणाली, 'तो तरी काय करील; कसं का होईना सख्ख्या मामाचा मुलगा आहे. आपण जर त्याला भेटायला गेलो नाही, तर लोक काय म्हणतील !'

'त्याला भेटायला जाऊन तुला काय आपल्या आयुष्याचा नाश ओढवून घ्यायचाय होय ? तुझ्या नवऱ्याचा तो तिरस्कार करतो. त्याचा दुस्वास करतो. त्याच्याशी धड वागत नाही. या आधी तू एकदा त्याला भेटायला गेलीस तेव्हा काय रामायण घडलं हे तुला माहितच आहे.' मल्ल काहीशा निश्चयी स्वरात म्हणाला.

'त्यांना कोण सांगायला जातंय ? परस्पर बसनं जाऊन भेटून येऊ या.'

'आता तुला कसं समजावून सांगू, पोरी ? त्या वेळी तुझा नवरा तुला घराबाहेर काढायला निघाला होता. तो तर काय निमित्तालाच टपलाय. सबबच शोधतोय. तो आणि तुझी सासू त्याचीच तर वाट पाहतायत. तुला कल्पना नाही ते लोक कसे आहेत ते. पहिल्या बायकोला ठार करायसाठी कुऱ्हाड घेऊन तिच्या अंगावर धावला होता हा, आणि तुलाही मूलबाळ काही झालं नाही. आम्हीही हातचा बाण घालवून बसलो आहोत. चार दिवस सांभाळून वागलोत तर उभयपक्षी सुखाचं होईल. आता तर काय तो चार चौघात उघड उघड सांगायला लागलाय की मी दुसरं लग्न करून मोकळा होणार आहे म्हणून ! उद्या खरंच त्यानं असं काही केलं तर आम्ही त्याचं काय वाकडं करू शकणार आहोत ? तुझ्या पहिल्या लग्नाची ती तशी परवड झाली, आता हे आहे हे यालाच धरून राहा म्हणजे झालं. त्याला जरा देखील सबब संधी मिळू देऊ नकोस...' अशा प्रकारे तारक्काच्या बापानं तिला खूप समजावून सांगायचा प्रयत्न केला. तशी

तारक्का म्हणाली:

'आता दुसरं लग्न करायचं यांनी डोक्यातच घेतलं असेल तर आम्ही खूप समजावून सांगितलं म्हणून आमचं ते ऐकणार आहेत थोडंच ? उगाच असं भिऊन भिऊन वागण्यात फायदा तरी काय ?'

हा वेळ पावेतो गप्प बसून ऐकत असलेली रत्नव्वा रागेजून म्हणाली, 'तू तर नेहमी फाडकन उत्तर देऊन मोकळी होत्येस. तुला काहीच कसं समजत नाही. एक गोष्ट तुझ्या डोक्यात धड शिरले तर शपथ! या पूर्वीही तू त्यांच्या गावी गेलीस तेव्हां नवऱ्याला न विचारता सवरता त्यांच्याकडे जाऊन आलीस. यावरनं भांडून संतापून तुझ्या नवऱ्यानं तुला चार दिवस घराबाहेर काढलं. दहा जणांनी परोपरीनं त्याला समजावलं तेव्हां कुठे तो पुन्हा तुला घरात घ्यायला राजी झाला. आम्ही दोघं इथं विचारात पडलो की यानं हे असं कां बरं केलं असेल ? का बरं हा असा वागला असेल! आमची शेतीवाडी, घरदार मुलीचंच होईल. आता यापुढे आम्हाला मूलबाळ थोडंच होणार आहे ? त्यावरून आमच्या मुलीनं काय म्हणून दु:ख भोगावं ? जावयाच्या नावानं लिहून देऊ, निदान येवढं तरी म्हणता येईल, की बुवा आम्हीं सारं काही जावयाच्या नावानं करून दिलेय. नंतर पुढं त्यांनी आम्हाला सांभाळावं वा सोडून द्यावं, दुसरं काही नाही. कदाचित त्याला मनातनं वाटत असेल की ही आपल्या माहेरच्या कोणा नातेवाईकाच्या नावानं तर सारं करून देणार नाहीं उद्या ? म्हणून त्यानं तिला तिकडे यायजायला मना केलं असणार, झालं! आताही त्याच्या मनात काय आहे कोण जाणे! तो चांगला माणूस आहे हे नक्की कसं काय सांगता येणार ? चार दिवस जरा सुखा समाधानात शांतपणे संसार कर, मुलं बाळं होऊं देत. नंतर मग येणं जाणं तर होतच राहील. तुझ्या जन्मापासून आजवर आम्हाला कसलं म्हणून कसलं सुख लाभलं नाही. तुझ्या सुखासाठी आम्ही सारं काही घालवून बसलो.. साऱ्यावर पाणी सोडलं. आता बरोबरीची झाली आहेस. तुला आणखी काय सांगू ? स्वत:च स्वत: जरा समजुतीनं वाग.' तारक्का यावर अधिक काही बोलली नाही, गप्प बसून राहिली. तिनंही विचार केला असणार, की 'आई.वडिलांनी मला सुख लाभावं म्हणून सर्वस्वावर पाणी सोडलं, त्यांच्या समाधानासाठी अनंताला भेटायचा विचार मला का माझ्या मनातनं काढून टाकता येणार नाही होय ?'

चांदूरला काही दिवस राहून तारक्का आपल्या घरी परत गेली. आता औषधोपचार झाल्यामुळे महिन्याच्या महिन्याला ती नियमितपणे बाहेरची बसायला लागली. पूर्वी प्रमाणे पाळीच्या आधीच ओटीपोट दुखणं नाही की अन्य कसला त्रास नाही. काही दिवस असेच सुखात गेले. एका महिन्याला तारक्का बाहेरची झाली नाही. थोडे दिवस टिकेल झालं हे नंतर पुन्हा पहिल्या सारखाच प्रकार होईल झालं, अशा विचारानं अम्मव्वा निराशच झाली. पण ही निराशा फार काळ टिकली नाही. गर्भ राहिल्याची लक्षणं

दिसायला लागली. अंगकांती कागदी लिंबासारखी पिवळी रसरशीत दिसायला लागली. तिला आंबट चिंबट खायचे डोहाळे लागले. कमरही जरा भरदार झाली. सुनेच्या ठिकाणची ही गर्भवतीची लक्षणं पाहून अम्मव्वा खुष झाली. तिनं चांदूरला निरोप धाडला. सारं घर आनंदात बुडालं. बागेत काम करणाऱ्या साऱ्या बाया म्हणाल्या, 'देव करो आणि मुलगा होवो. अम्माला हे सुख आपल्या डोळ्यांनी पाहायला मिळो.' अम्मव्वाही हेच म्हणायची, 'मुलगा होवो वा मुलगी होवो, काही का होईना, पण घरात मूल खेळायला हवं.' घरात आता तारक्कावर कामाचा फारसा भार नव्हता. नात्यातलं कोणी ना कोणी येवून काम उरकून जायचं. तारक्का जेवून खाऊन पडून राहायची. सासू पुन: पुन्हा विचारायची: 'चक्कर आल्या सारखं वाटतं काय ?' तारक्का त्यावर उत्तर द्यायची, 'नाही, अंग जड जड झाल्यासारखं वाटतं. सारखा घण घण आवाज होत राहतो. काही जेवू खाऊ नयेसं वाटतं, सकाळी उठल्यावर तोंड कसं कडू कडू पडल्यासारखं होऊन जातं.'

अम्मव्वा, 'पहिल्यांदाच गरोदर राहिलीय, हिला यातला कसला काही अनुभव थोडाच आहे!' असं म्हणून गप्प बसायची. पण तेवढ्यावर तिच्या मनाचं समाधान व्हायचं नाही. पुन्हा सुनेला म्हणायची, 'अंगात उष्णता वाढली असेल, रोज ताक करताना लिंबा एवढा लोण्याचा गोळा जरा खात चल. त्यानं जन्माला येणाऱ्या बाळाला आणि तुला स्वत:ला, तुम्हा दोघांनाही खूप फायदा होईल.'

मुलगी गरोदर राहिल्याचे वृत्त ऐकून रत्नव्वाच्या आनंदाला तर पारावारच उरला नाही. मल्लला तर काय स्वर्ग दोन बोटंच उरल्या सारखा झाला. त्यानं बायकोकडून बारा तऱ्हेची पक्वान्न बनवून होरागेरीला धाडली. तिसरा महिना लागताच रत्नव्वानं लेकीला हिरवीचोळी शिवली. अम्मव्वाला म्हणाली, 'लोकांना हे सांगता नये.'

अम्मव्वा भारी आनंदात होती. विहिणीला ती अगदी मनमोकळेपणानं म्हणाली, 'नाही ग बाई, आम्ही कशाला सांगायला जातोय कोणाला पेढे वाटेस्तोवर ? ही तर पहिलटकरीण आहे. अप्पण्णा म्हणत होता. मूल होत नाहीय, दुसरी करीन.'

रत्ना काहीशी कष्टी होऊन म्हणाली,'त्यानं जरी खूप करायचं म्हटलं, तरी होणार नाही. आणि नाही करायचं म्हटलं तरी झाल्यावाचून राहणार नाही. जो काही प्रारब्ध योग असेल त्या प्रमाणेच घडणार. भाग्यात लिहिलं असेल तसंच घडणार.'

'काही का असेना ! ताराच्या जीवनाला आता स्थैर्य आले आहे.'

'एक मुलगा झाला तरी बस्स आहे. केल्या श्रमाचं येवढे कष्ट उपसल्याचं सार्थक होईल.'

'मुलगा होवो वा मुलगी, घरात एक मूल असायला हवं. आता एक झालं तर पाठोपाठ आणखीही होतील. मुलाबाळाविना घराचा कसा उबग आला होता.'

'आमचीही स्थिती काही वेगळी नव्हती, बाई ताराला पदर आलेल्याला पंधरा सोळा

वर्ष तरी झाली असतील आता. खूप विलंब जरी झाला तरी बारा वर्षांहून अधिक वर्ष लागता नयेत. आता तर हिला न्हाण येऊन सोळा वर्ष झालीत. आणि म्हणूनच मी भारी निराशा होऊन गेले होते. कोणापुढं गायचं आपलं हे रडगाणं ?' रत्नानं अशा प्रकारे आपल्या मनातली निराशा व्यक्त केली.

'होना, आम्हाला उमजत नव्हतं काय करावं ते. एका बाजूला आड आणि दुसऱ्या बाजूला विहीर अशी स्थिती होऊन गेली होती आमची अन् काय बापरे ! मुलगा आतल्या आत भडकत होता.'

'आणखी काय, की घरात मुलंबिलं असती म्हणजे बरं असतं हो. त्यातून पुन्हा एकुलता एक मुलगा ! खूपशी मुलं होऊं देत, आम्हीही एकदोन आमच्या घरी नेऊन वाढवू की !'

रत्नव्वाचं बोलणं कुठं पुरं होतंय न होतंय तेवढ्यात एक पाल चुकचुकली. म्हातारी आमव्वा एकदम 'शिव शिव' उद्गारत काहीशी चिंतीत होऊन म्हणाली, 'कोण जाणे ही पाल अशी का चुकचचुकलीय ते ? मुलं होऊ देत. कुठंही लहान मोठी होतील. आमच्या घरात तरी काय आता दहावीस मुलं थोडीच आहेच ?'

रत्नव्वानं विचारलं, 'ही पाल कशी आहे ?'

'पालीचं काय ? खूप आहेत पाली. पण ह्या कोपऱ्यातली पाल चांगली नाही आहे. आमचे हे गेले त्या आधी ती याच कोपऱ्यातून अशुभ चुकचुकली होती.'

दोन तीन दिवस मुलीच्या घरी सुखात गेले. रत्ना पुन: पुन्हा मुलीची अवस्था बारकाईनं निरखून पाहत होती. अद्याप तीन महिने काही पुरे झाले नाहीत हिच्या गरोदरपणाला. मग एवढ्यातच पोट असं एकदम मोठं का बरं दिसावं या विचारानं ती मनोमन काळजीत पडल्यासारखी झाली.तिनं मनाशी विचार केला. पहिले पंधरा दिवस हिशोबात घेण्यात काही अर्थ नाही. म्हणजे फार तर दोन अडीच महिनेच झाले असणार. आणि येवढ्यात येवढं मोठं पोट ! म्हणून गावी परत जायच्या आदल्या दिवशी तिनं अम्मव्वाला म्हटलं देखील: 'ताराचं पोट हे एवढं मोठं कसं काय दिसतंय ?'

ती हसून म्हणाली, 'तशातलं नाही. माझी आपली शंका कुठं जुळं बिळं तर होणार नाही ?' तशी अम्मव्वा आनंदून म्हणाली: 'होऊन दे, ग. एक आमच्या इथं राहील. दुसरा तुमच्याकडे मोठा होईल. इथं कशाला काय कमी आहे ?'

दुपारी रत्नव्वा जावयाला तसंच विहिणीला म्हणाली, 'पाच महिने पुरे झाले की साऱ्या गावाला शेरणी वाटीन. सातव्या महिन्यात नात्या गोत्यातल्या मंडळींना पुरण पोळी करून जेवायला घालीन. त्यानंतर ताराला बाळंतपणासाठी घरी घेऊन जाईन.' त्या दोघांनी ते मान्य केलं. मग तिनं मुलीला गर्भारशीणीनं जड जात्यावर दळण दळायचं नसतं, आडाचं पाणी शेंदायचं नसतं वगैरे कुठल्या कुठल्या बाबतीत काय काय काळजी

घेणं अगत्याचं असतं ते दहादहादा समजावून सांगितलं, शेवटी तारक्का जेव्हा म्हणाली की, 'आई, तुझं हे सारं बोलणं ऐकून सासूबाई क़ाय म्हणतील ?' तेव्हा कुठं ती उगी बसली, मात्र गाडीत बसता बसता पुन्हा एकवार त्याची उजळणी केल्यावाचून काही तिच्याच्यानं राहावलं नाही. तेव्हा मग अम्मव्वाच्यानं ही गप्प राहावलं नाही. म्हणाली, 'अग जा ग ए खुळे, आम्ही काय तिला दळण दळायला लावणार आहोत थोडंच ? कोणालाही लोटाभर ताक देऊन त्याच्याकडून दळून घेऊ की. झालंच तर अप्पू स्वत: विहीरीचं पाणी शेंदील. आम्हाला का समजत का नाही या गोष्टी ! अगदी फुलासारखं सांभाळू आम्ही पोरीला, जा.'

विहिणीनं असं म्हटलं तरी ते मनाला लावून न घेता रत्नव्वा आनंदा आनंदात घरी परतली. परंतु वाटेत सरळ सपाट रस्त्यालाच गाडीचं जू मोडलं. या अपघातात कोणाला काही लागलं नाही वा कसलं नुकसान जरी झालं नाही तरी अशा घटना स्वाभाविक पणेच मनाला कधी कधी चुटपुट लावून जातात. परवा तिथं ती पाल चुकचुकली, आज इथं हे जूं मोडलं. त्यामुळे ती एकदम काळजीत गढून गेल्यासारखी झाली. गाडी सिध्दा गडी हाकत होता. त्याला, 'आता पोरीच्या आयुष्याची गाडी व्यवस्थित मार्गाला लागलेली असतांना, आपल्या ह्या गाडीचं जूं चांगल्या सपाट जागी असं का बरं अचानक मोडावं ?' असं विचारल्या विना तिच्याच्यानं राहावलं नाही. सिध्दा म्हणाला, 'धनिणी, हे जूं तसं फार जुनाट झालं होतं. गाडी उन्हात तापत पडलेली असते. त्यानं तडकून कुठं भेगबिग पडली असेल.' हे सांगतानाही त्याचा चेहरा भयग्रस्त झाला होता. घरी परतल्यावर वाटेत गाडीचं जूं मोडलं असं समजताच मालक आपल्यावर जरूर भडकतील याचं भय त्याच्या पाठीमागे होते. आता रत्नव्वानं त्याचा अर्थ काय घेतला हे कळायला काही मार्ग नाही.पण ती मनातल्या मनात, 'आई लगमव्वे माझ्या मुलीचं बाळंतपण सुखरूप पार पाड. तुला मी साडी नेसवीन. बाळंतपणानंतर तिला सासरी धाडतांना जी साडी नेसवीन तिच्याहून एकरूपानं भारी साडी मी तुला नेसवीन.' अशी आपल्या कुलदेवतेची आळवणी करीत तिला नवस कबूल केला. नंतर तिनं सिध्दाची समजूत काढीत म्हटलं, 'आता आमचा सारा भार देवी लगम्मावर. तिच्यावर सारा भार टाकून स्वस्थ बसायचं. ती आमची नाव सुखरूप किनाऱ्याला लावील. माणसाच्या हातात अखेर काय आहे ? रक्षण करणारी खरी ती आहे !'

एक दिवस दुपारचा एक माणूस बाग धुंडत धुंडत विहीरीपाशी येऊन विचारायला लागला, 'इथं चांदूरची एक मुलगी राहते. तिचं घर कुठेसं आहे ?' तारक्का आतच होती. त्याचं बोलणं ऐकून ती काहीशी घाबरून बाहेर आली. आलेला माणूस अपरिचित होता. त्याचा आवाज ओळखीचा वाटत नव्हता. तिनं आतुरतेनंच विचारलं की, 'कोण आहात आपण ? कोठल्या गावचे. कुठून आलात आपण ?'

'मी तेरदाळचा आहे, इथं तारक्का कोण आहे ?'

'मीच आहे तारक्का, का कशासाठी आलात. काय काम होतं ?' तिच्या पृच्छेत एक अनामिक भय दडलेलं होतं.

'काम वगैरे काही नव्हतं, आपण भ्यायचं घाबरायचं तसं काही कारण नाही. मालकीण बाई म्हणाल्या त्यांना पाहून ये म्हणून आलो होतो.'

तारक्कानं त्याला मध्येच आडवीत विचारलं, 'कोण मालकीण बाई ? कोणाला पाहून यायला सांगितलं ? जरा आरामशीर बसा. आणि सारंकाही स्वस्थपणे सांगा पाहू.' तिच्याच्यानं फार वेळ उभं राहवून बोलवेना तसं ती पुढं येऊन वरवंडीवर बसली.

त्या अनाहूत आलेल्या माणसाला मोठं आश्चर्य वाटलं. तारक्काकडे लक्षपूर्वक पाहत तो म्हणायला लागला : 'आणखी दुसरी कुठली मालकीण. इंदरव्वा ताई नाहीत, का ? अनंतप्पाची बायको. त्यांनीच पाहून यायला सांगितले आणि वर सांगितलं, की ते यायला तयार असतील तर त्यांना मोटारीत घालून घेऊन ये म्हणून......'

ते ऐकलं आणि तारक्काला वाटलं की जणू काही कोणी आपल्या अंगावर चाबकाचा फटकाराच मारलाय. तिची नजर तीक्ष्ण झाली. चित्कारली. 'कोणाला ? अनंताला ? तो कधी आला इकडे ?' तिच्या स्वरात एक विलक्षण उद्वेग दाटून आला होता. नंतर तिनं मनाशी विचार केला. तो इथपर्यंत यावा, येवढं कुठचं पुण्य माझं ! एक दोन मिनिटांनी नाकावर बोट ठेवीत तिनं विचारलं, 'कोणी सांगितलं तुम्हाला की तो इथं आलाय म्हणून ?'

आलेला तो अपरिचित माणूस काही काळ भेदरल्यासारखा गांगरून गेल्यासारखा नुसताच स्तब्ध बसून राहिला. त्याच्या मुद्रेवर हळू हळू आश्चर्य भाव उमटायला लागले. त्याच्या तोंडून बाहेर पडलं, 'इथं आला नाही ?'

'नाही.' तारक्काच्या तोंडून उद्‌गार बाहेर पडला.

'तर मग तो गेला तरी कुठं ?' असं म्हणत तो उभा होता तिथंच मटकन खाली बसला. एका बाजूला टकटका पाहात काही तरी विचार करायला लागला. नंतर जरा सरकून एका खांबाला टेकून बसला. त्याच्या घशाला कोरड पडली होती. त्याच्या डोळ्यात आसवं नव्हती, परंतु त्याचे डोळे जणू म्हणत होते 'आता अनंतप्पा गेला, माझ्या इंदिरेचे सारं ऐश्वर्यच लयाला गेलं. हा गेलाय तरी कुठं ? ह्या इंदरव्वाला मी ह्या माझ्या हातानं भरवलं होतं. मी गडी माणूस होतो, म्हातारा होतो. तरी इंदरव्वा बाळपणी मला 'दादा' म्हणून हाक मारायची. नातीसारखी माझ्यापाशी यायची, माझ्या डोळ्यादेखत हे असं का घडावं बरं ?' जराशानं खाकरून गळा साफ करीत तो म्हणाला, 'घसा सुकलाय, जरा पाणी दे प्यायला, ताई.'

तारक्काच्यानं जागचं उठवत नव्हतं, तरी कसं तरी उठून उभी राहिली आणि घरात

जाऊन त्याच्या साठी गुळपाणी घेऊन आली. त्यानं गुळाचा खडा उचलून बाजूला ठेवला. फक्त पाणी तेवढं प्यांला. नंतर त्यानं एक प्रगाढ श्वास घेतला. त्या श्वासाची उष्णता कदाचित तारक्काला जाणवली असावी. तिनं विचारलं,'अनंत कुठं गेलाय ? तेरदाळ मध्ये नाही होय ?'

'नाही ताई, गेल्या सोमवारीच तो तेरदाळहून गेलाय.'

'जोडीला कोण होतं ?

'कोणी नव्हतं. एकटाच गेला, काहीसा रागावून गेला. कोणाचं काही ऐकलं नाही. कुठं गेलाय कोण जाणे !'

'ऐनापुरात नाही ? तुम्ही पाहून आलात का तिकडे....?'

'तिथं कुठून असणार ? आज सकाळीच त्याचा भाऊ नाभिराज त्याला शोधायला तेरदाळला आला होता. तेव्हा पासून आम्हा सर्वांची एखाद्या वेड्यासारखी स्थिती होऊन गेलीय. आता पर्यंत आमची समजूत हीच होती, की तो तिकडे गेला असणार म्हणून !'

'ऐनापूरला गेला नाही ? तर मग जातांना कुठं जातोय म्हणून सांगून गेलाय ?'

'दोन दिवस घरात भांडण चाललं होतं. रूक्कव्वा जुन्या वळणाची म्हतारी आहे, ती आपली थाडकन काही तरी बोलून जाते. ते काही ह्याच्याच्यानं सहन झालं नाही. आठ दिवस झाले त्यानं तिच्याशी बोलणं टाकलं होतं. जायच्या आधी इंदिरव्वाला तो एकदा म्हणाला होता, की तारक्काकडे जाईन म्हणून मला इथं धाडण्यात आलं. सकाळधरून इंदिरा आपली गुडघ्यात डोकं खुपसून तोंड झाकून बसलीय बघा.

त्याचं वाक्य कुठं पुरं होतं न होतं तोच तारक्का एकदम पलटी खाऊन वरवंडीवरनं खाली पडली. तिच्या तोंडून: 'हायरे दैवा ! माझ्याकडे जाणार म्हणाला होता ? खरं का हे ? इथं येईन म्हणाला होता...... ' असं काहीसं अस्पष्टपणे बाहेर पडलं.

तो माणूस जागचा उठून पुढे होईपर्यंत शेजार पाजारच्या आयाबाया 'काय पडलं ? कसला आवाज झाला ?' असा गलका करीत धावत आल्या. त्यांनी 'काय ग तारा; काय झालं ?' असं म्हणत तिला उठवून बसतं केलं. काही कामासाठी पानमळ्यात गेलेल्या म्हाताऱ्या अम्मव्वानं_दुरूनच हे दृश्य पाहिलं आणि ती तडक धावत धावत आली. घाबरून म्हणाली, 'पाहा गं, तिच्या पोटाला खुंटा बिंटा तर लागला नाही पाहा !'

# 23

त्यानंतर दोन दिवसांनी तारक्काचा गर्भपात झाला. तसं सारं घरदार कष्टी झालं. सर्वांना दु:ख झालं. म्हातारी अम्मव्वा संतापून म्हणाली, 'हिला मुळी जगायची इच्छाच नाही, नाही तर स्वत:चे हे हाल तिनं थोडेच करून घेतले असते? कोठला कोण मामाचा मुलगा आणि कुठला काय निरोप काल तो म्हातारा इथं त्याची चौकशी करायला म्हणून निरोप घेऊन आला. आणि ही एकदम उत्साहानं उसळ्या मारायला लागली. जगात कुठं काही मी कधी असं ऐकलं नव्हतं आजवर! तो कुठं, ही कुठं? हिचा तो मामा. लग्नाच्या गोष्टी करण्यासाठी इकडे जो एकदा येऊन गेला, त्यानंतर त्यानं पुन्हा म्हणून कधी इकडे ढुंकून देखील पाहिलं नाही..... आणि ही मात्र अहोरात्र त्यांच्या नावाचा जप करीत असते.'

ह्यावर तारक्काच्या मनात कुठले विचार तरंग उमटले ते सारे इथं लिहिणं जरी अनावश्यक असलं, तरी एवढं मात्र सांगता येईल, की अनंताला शोधायची, त्याचा ठाव ठिकाणा लावायची इच्छा तिच्या मनात पुन: पुन्हा डोकं वर काढीत होती. यासाठी ती मनोमन दु:खी होत होती. तिच्या हृदय पटलावर अनंताची मूर्ती अक्षय्य रूपात रेखाटली गेलेली होती. त्याच बरोबर तिच्या मनात अप्पण्णाची मूर्ती ही उभी राहत असे. लौकिक दृष्ट्या अप्पण्णा तिचा नवरा होता. त्याचे प्रेमालाप कर्तव्य भावनेपोटी तिला ऐकणे भागच पडत होते.त्याला हवं तेव्हा सुख द्यायला तिला देहामनानं तयार व्हावंच लागत होतं; तेव्हाही विसरू म्हणता तिच्याच्याने अनंताला विसरवत नव्हतं. त्याच्या स्मृती तिच्या काळजात जणू कायमच्या घर करून राहिलेल्या होत्या. त्याला विसरणं हे तिच्या लेखी सर्वस्वी अशक्य प्राय होऊन बसलं होतं. तरीही अनेकदा तिच्या मनात विचार येई. आता त्याचा माझा काय संबंध? कोण तो माझा? जसं चारचौघांच्या बाबतीत असतं तसंच तो माझ्याही बाबतीत फक्त मामांचा मुलगा एवढाच आहे. आता त्याच्या आठवणी कशाला? इथं घरात मला माझा नवरा आहे. मला जे हवं ते तो मला देतो, माझ्यावर प्रेम करतो. ही भावना ती आपल्या अंतर्यामी घट्ट रुजवायचा प्रयत्न करू पाहते. परंतु अनंताला विसरण्यात मात्र तिला यश लाभत नाही. एक अनामिक अतृप्तता सदैव तिचं काळीज कुरतडत राहते.

दोन दिवसांनी मुलीच्या गर्भपाताचं वृत्त समजताच मल्ल आणि रत्नव्वा अगदी धावत

पळत मुलीला भेटायला आले. जे काही घडलं ते सारं ऐकून रत्नव्वा पहिल्या प्रथम लेकीवर संतापानं एकदम भडकलीच. पण मग विवेकानं स्वत:ला सावरीत मनात उफाळून आलेल्या रागाला तिनं आवर घातला. तिच्या डोळ्यात टचकन पाणी तरारलं. आईच्या डोळ्यातले अश्रू पाहून तारक्काच्या डोळ्यांनाही आसवांची धार लागली. ते पाहिलं आणि रत्नव्वाच शेवटी म्हणली,'हं रडं आवर पोरी, जे व्हायचं ते होऊन गेलं. आता एकदा गर्भ राहणं सुरू झालंय, आज नाही उद्या पुन्हा गर्भार राहशील. लौकर बरी हो. थंडीवाऱ्यापासून जप.'

तारक्का शून्य दृष्टीने आईच्या तोंडाकडे पाहत सारं काही ऐकत होती. खोल तिच्या अंतर्यामी एक आवाज उमटत होता. आता मी मेलेलीच बरी; आता मला जगून तरी काय करायचंय ? दुसऱ्याच क्षणी प्रश्न उमटायचा: काय एक वार अनंताला पाहिल्या भेटल्यावाचूनच मरून जाऊ ? त्या प्रश्नापाठोपाठ वडिलांचे रागाने लाल झालेले डोळे तिच्या दृष्टी समोर येत. वडिलांनी, घरात त्याचं नाव देखील घ्यायला बंदी केली होती. आईनंही तिला बजावून ठेवले होते, की 'तू अनंताचं नुसतं नाव जरी घरात काढलंस तरी तिथल्या तिथं तुझ्या समोर मी माझी जीभ हासडून प्राण देईन.' या सर्व गोष्टी तिला एकदम आठवू लागत. कधी कधी विचार करायची, आई वडिलांनी आयुष्यात मला सुख लागावं, मी सुखी व्हावे यासाठी आजवरं काय म्हणून करायचं बाकी ठेवलंय ? त्यांनी आपलं घर दार देखील माझ्या नवऱ्याच्या नावानं करून दिलं. केवळ माझ्या साठी त्यांनी याचाही विचार केला नाही की अरे, उद्या म्हातारपणी आपलं कसं निभावेल. काय होईल उद्या आपलं ! आणि बदल्यात मी त्यांना काय सुख दिलं ? समजा आज मी मेल्ये, तर त्यांना कोण उरणार आहे ? त्यांचं काय होईल ? त्यांनी निर्वेध जीवन कंठावं यासाठी मी नको का जिवंत रहायला ! अशा प्रकारे तिच्या अंतर्यामी जगण्याची जिवंत राहण्याची आशाही एकदम वाढीला लागायची.

महिनाभर तारक्का बाळंतणीच्या अंधेऱ्या खोलीत राहिली. गावातील वैद्याचे औषधोपचार आणि आईनं केलेली तिची सेवा शुश्रूषा यायोगे तिची प्रकृती दिवसें दिवस सुधारत गेली. आता ती अधून मधून थोडी थोडी बाहेर येऊन बसायला लागली. पण तरी सुध्दा तिचा अशक्तपणा अजून काही कमी झालेला नव्हता. रोजच्या रोज होणारा रक्तस्त्राव अजून थांबला नव्हता. गावातल्या माहितगार लोकांच्या सल्यानुसार जास्वंदीची फुलं आणवून त्याचा काढा वगैरे बनवून तिला देत असत. घर तसंच टाकून इथं आलेल्याला रत्नव्वाला आता एक महिना होऊन गेला होता. पण अशा अवस्थेत मुलीला एकाकी सोडून घरी परत जाणंही तिला भारी दु:ख दायक वाटत होतं. आपली ही चिंता मुलीकडे व्यक्त करीत ती म्हणाली, 'तारा, मी चार एक दिवसांसाठी घरी जाऊन यावं असा विचार करतेय.'

'मलाही चार दिवसासाठी यावसं वाटतंय, मलाही बरोबर घेऊन चल ना !'

'छी: ह्या अशा अवस्थेत मी तुला घेऊन जाऊ हो ? काय तुला वेडबिड तर लागलेलं नाही ना ? स्वस्थपणे इथंच आराम करीत कां नाही पडत ? अंगात अजून अशक्तपणा आहे. उगाच वारा बिरा लागायचा बाहेरचा एखाद वेळेस...!'

तारक्का गप्प बसली. आई आपल्याला का नेत नाही याचं कारण ती जाणून होती. 'इकडे माझ्या माघारी माझा नवरा तेवढ्यात आणखी एक लग्न उरकून घेण्याचा सहज प्रयत्न करू शकेल; मी घरी राहिले तर त्याला तेवढाच अटकाव बसेल, हे सारं खरं आहे पण त्यालाही कसलं सुख नाही. आणि माझं सुख तर कधीच लयाला गेलंय.' हे सारं ती फार उत्तमप्रकारे जाणून होती. म्हणून मग तिनं स्वत:चे अश्रू पुसत आईला विचारलं. 'फिरून पुन्हा केव्हा परत येशील ?' ती म्हणाली, 'तिकडे गेले तरी माझं मन इथंच घुटमळत राहणार, ह्यांना एकदा मध्ये मी पाठवीन आणि त्यानंतर मी स्वत: एकदा येऊन जाईन.

तारक्का गप्प बसली. तिनं मनातल्या मनात म्हटलं: 'आई वडील कुठवर माझं पालन पोषण करणार ? मला आधार-आसरा देणार ? जगण्यासाठी माझं मलाच स्वत:च्या पायावर उभं राहायला हवं...!' आई जायला निघाली तशी तिला जवळ बोलवीत म्हटलं, 'बाबा येतील तेव्हा त्यांच्या बरोबर अनंताचा पत्ता लागला की नाही याची चौकशी करून ते तेवढं कळवशील ना ?'

तसं रत्नव्वाला तारक्काचं सारं बाळपण आठवलं. बाळपणापासून एकत्र राहिले, एकमेकांबरोबर खेळले बागडले, लहानाचे मोठे झाले. त्याचा कसा विसर पडेल... ते कसं विसरू शकेल ती ! असा विचार करून ती म्हणाली, 'ठीक आहे. कळवीन हो तुला मी.' तिच्या मनात असाही विचार तरळून गेला असणार, की पोर येवढी आजार भोगतेय... तिच्या ह्या असल्या अवस्थेत उगाच येवढ्या तेवढ्या वरून काहीबाही बोलून तिचं मन दुखावणं बरं नाही. तरीही जरा थबकून ती म्हणाली, 'तुला आणखी एक गोष्ट सांगून जाते...'

तारक्कानं आईच्या तोंडाकडे पाहात 'काय ?' म्हणून विचारलं.

'तू आपल्या नवऱ्यासमोर हा विषय कधी काढायचा नाही. नाही तर सारं...' हे ऐकून तारक्काला अतीव दु:ख झालं आणि म्हणाली, 'कां कोणी आपण दिलेले दागिने परत मागत का नसतं ? त्यांनी काय त्याना कायमचे आंदण देऊन टाकले होते, चार दिवस घालायला म्हणून दिले, घेऊन गेले. तुम्ही मंडळी तुमची सारी मालमत्ता मामांच्या मुलाच्या नावानं तर करून देणार नाही ना ! ही शंका त्यांच्या आजवरच्या नाराजीचं कारण होतं; आता तेही कारण राहिलेलं नाही. सारं काही त्यांनी स्वत:च्या नावावर करून घेतलंय. आजवर कधी त्यांच्या घरी जाऊ दिलं नाही. आम्ही गप्प बसलो.

काय आम्ही काय आमच्या इतर नातेवाईकांशी संबंध ठेवू नयेत की काय? बस् हे एकटेच काय ते आमचे नातेवाईक आहेत होय? फक्त एकट्या यांच्याशीच आमचे संबंध आहेत?'

तारक्काचं ते बोलणं तिथंच थोपवीत, 'बरोबर आहे तुझं म्हणणं, परंतु जगात सगळ्यांना धरून... सगळ्यांशी सारखे संबंध ठेवून राहावं लागतं, नशिबानं वाईट नवरा गळी पडला, तर काय आपल्या तोंडानं ते चार चौघात बोलून दाखवायचं असतं होय? ऋतुशांतीच्या वेळी गेली नाहीस. त्याचा त्यांनी राग धरला नाही. बोलून चालून तू पडलीस सासुरवाशीण याचीही त्यांना जाणीव आहे.'

'राग यावा अशी गोष्ट नाहीए ही, आई? काय माहीत आहे तुला?' आईचा हात धरून तारानं विचारलं. त्या वेळचा तिचा तो स्वर आणि मुद्रेवरील एकूण भाव पाहून रत्नव्वा घाबरून गेली. लेकीच्या मन:स्थितीची रत्नव्वाला कल्पना होती. कसं झालं तरी नऊमास तिनं तिला उदरात वाढवलं होतं. तिच्याच पोटी तिनं जन्म घेतला होता. मुलीच्या अंगाला हात लावीत ती म्हणाली, 'ताप आहे ग तुझ्या अंगात. जा बाळ, जाऊन जरा झोप शांत. तू हे असं काय वागायला लागलीयस एखादं भूत पिशाच्च अंगात आल्यासारखं?'

'आई, तुला वाटतंय, की मला जणू काय कोणी भूत पिशाच्चानं पछाडलंय! नाही, मला काहीही झालेलं नाही. मला खुळबीळ लागले नाहीय की कोणा भूता खेतानंही मला झपाटलेलं नाहीय, अगदी एखाद्या दगडासारखी ठणठणीत आहे बघ मी-' असं म्हणत तारा थाड थाड करीत आपल्या छातीवर बुक्के मारून घेत तिला दाखवून द्यायला लागली.

तारक्काची ही सारी लक्षणं पाहून रत्नव्वाला आपला गावी परत जायचा विचार रहित करावा लागला. दुसऱ्या दिवशी लेकीच्या स्थितीत थोडीबहुत सुधारणा झाल्याचं पाहूनच मग ती चांदूरला निघून गेली.

आणखी एक महिना गेला. तारक्काची प्रकृती खूपच सुधारली, परंतु तरीही तिच्या मुद्रेवरची म्लानता काही कमी झाली नाही एकदा असाच मल्ल तिला पाहायला आला असता जावयाला म्हणाला, 'चार दिवस आमच्याकडे राहू द्या हिला. तेवढाच हवापाण्यात बदल होईल.' तसं अप्पण्णानं दुसऱ्याच दिवशी आपली गाडी जोडून बाप-लेकीला चांदूरला धाडून दिलं. मल्ल तारक्काला माहेरी घेऊन आला खरा, पण त्याचं सारं ध्यान तिच्या सासरकडेच लागलेलं होतं. त्यानं वाटेतच मुलीला म्हटलं, 'चार दिवस इथं विश्रांती घेऊन परत जा. कारण स्त्रीनं दिल्या घरीच राहणं उचित असतं... सुखाचं असतं.' घरी येताच रत्नव्वा म्हणाली, 'सध्या तू तिथं राहणंच बरं होतं. पण आता आलीच आहेस तर राहा चार दिवस आराम कर आणि आपल्या घरी सुखानं परत जा. कारण

त्यानं तर तुला गाडीत बसवून धाडून दिलंय.'

माहेरी येताच अनंताला एकवार इथं बोलावून घ्यावं-पाहावं अशी तीव्र इच्छा तारक्काच्या मनात निर्माण झाली. परंतु आपल्या आई-वडिलांकडे ती तिला बोलून दाखविता येत नव्हती. तिच्या मनात येई त्यानं इकडे यायला काय हरकत आहे ? समजा तो आला तर आई-वडील काय, 'यायचं नाही इथं. चल चालता हो इथनं' असं म्हणून त्याला घालवून देतील ? याच विचारानं एक दिवस घरात दुसरं कोणी नाही असं पाहून एका नोकराला बोलावून त्याच्या हाती रूपया ठेवून तिनं त्याला ऐनापूरला धाडलं. म्हणाली, 'जा जाऊन पाहून ये अनंत कुठं आहे ते ? घरी परतलाय की काय ते बघ आणि घरी परतला असेल तर त्याला म्हणावं, येत्या दोनतीन दिवसात जरा इकडे चक्कर टाकून जा... मुद्दाम बोलावलंय म्हणावं त्यांनी तुला.'

नोकर दुसऱ्या दिवशीच ऐनापूरहून परतला सांगायला लागला, 'तो गावात नाहीए.'

'कोण रे ?' रत्नव्वानं विचारलं.

तारक्का त्याचा आवाज ऐकताच धावतच बाहेर आली आणि त्याला काही बोलायची संधीच न देता घाईघाईनं म्हणाली, 'कोणाच्या त्या शिवाच्या बाबतीत का तू हे सांगतोयस ? ठीक आहे. जा तू आपल्या कामाला....' असं म्हणत तिनं त्याला निघून जायची खूण केली. हे सारे काय होतेय हे त्याला मुळीच उमगलं नाही. तो बिचारा गोंधळून निमूटपणे तिथून निघून गेला.

रत्नव्वानं मुलीला विचारलं : 'कोणाविषयी चाललं होतं ?'

शिवा उद्या येडूरला जाणार म्हणून मी आपला त्याला निरोप धाडला, की जातोच आहेस तर वैद्यांना भेट आणि सांग. म्हणावं जरा एकदोन दिवसांत इकडे येऊन भेटून जा.'

'त्याच्या औषधानं तेव्हा तरी असा काय गुण आला होता. आणि आता तरी तो येऊन असा काय मोठा फायदा होणार आहे ? सगळे पाहून झाले. आता काय हा वैद्य पुन्हा येऊन सारं व्यवस्थित करून देणार आहे होय ?'

तारक्कानं यावर काहीही उत्तर दिलं नाही. तिचं मन म्हणत होतं; 'माझा वैद्य मला एकदा येऊन भेटून गेला की बस्स आहे. आता बरं व्हायची मला काडीचीही इच्छा नाही.'

काही वेळानं तारक्का देवळात जाताना वाटेत शिवप्पाला भेटली आणि तिनं त्याच्याकडनं सारं विचारून घेतलं तसं तो म्हणाला, 'ते गावात नाहीएत, मिरजेच्या दवाखान्यात दाखल झाले आहेत.' तारक्कानं जरा पुढं होत आश्चर्यानं विचारलं, 'मिरजेच्या दवाखान्यात ? कोणी सांगितलं तुला हे.... ?'

त्याच्या भावाच्या घरात एक विकेशाबाई होती, तिनं सांगितलं.' तारक्का मध्येच

त्याला त्याला म्हणाली, 'हो, ती त्याची आई आहे.' मग जरा थांबून पुन्हा विचारल, 'ती गोरीशी आणि उंच होती ना ?'

'बसलेली होती, गोरी होती, माथ्यावर एक खूण होती.'

'हो, तीच.'

'काय ?'

'तेरदाळहून जो गेला, तो पंधरा दिवस कोणाला काही कळलंच नाही, नंतर लोकांकडून समजलं.'

'बरं त्यांच्या कडे लक्ष द्यायला त्यांना काही हवं नको पाहायला कोण गेलेत ?'

'कोणी नाही.'

'एकटाच कसा ? हिंडू फिरू शकतोय काय ?'

'तसं ते हिंडू फिरू शकतात, पण डॉक्टरनंच मना केलंय.'

'का ?'

'कोण जाणे, ताई ! दवाखाना सोडून बाहेर कुठं जायची परवानगी नाही त्यांना.'

शून्य दृष्टीने तारा म्हणाली, 'अस्सं !'

तारक्काची याही खेपेस अनंताशी गाठभेट झाली नाही. तीन चार दिवसांनी तिला वडील म्हणाले, 'उद्या सोमवार आहे. बैलांना काही काम नसतं सोमवारी मोकळेच असतात, तुला तुझ्या घरी पोहोचतं करून येतो, चल.'

'चला,कुठं ना कुठं तरी दिवस ढकलायचेच आहेत. चला.' असं मनाशी म्हणत तारा घरी जायच्या तयारीला लागली.

तारक्का आजकाल पहिल्यासारखंच सारं घरकाम करायला लागली होती. एक दिवस अपण्णा गावात जाऊन एक टोपलीभर आंबे घेऊन आला. तारक्का कधी कधी नवऱ्याला म्हणायची: पोटात उष्णता वाढलीय. मोरीवर बसायला गेले की आग आग होते. अप्पण्णाला वाटलं की उन्हाळ्याचे दिवस आहेत. होतं असं कधी कधी. चला जरा चांगले आंबे तर खाऊन घेऊया. तारक्कानं इतरांहून जरा जास्तीच आंबे खाल्ले. पण ते आंबे चांगले नव्हते, वाऱ्यानं पडून पिकले होते, स्वस्तातले होते. घरातल्या इतरांनीही त्यातलेच खाल्ले होते. पण त्यांना कोणाला काही झालं नाही. तारक्काची प्रकृती तशी काही संपूर्ण सुधारलेली नव्हती, हल्ली अंगात थोडा थोडा ताप असायचा. त्यामुळे तिला ते आंबे सोसले नाहीत. चार दिवसात हात पाय आणि डोकं दुखायला सुरूवात झाली.

एक दिवस रात्री बिछान्यात झोपले असता अप्पण्णानं तारक्काच्या अंगावर हात टाकला.

तारा म्हणाली, 'कोण जाणे कां आजही माझी तब्येत बरी नाहीए.'

'तुला आपलं वाटतं तसं.दोन तीन महिने होऊन गेले तरी.....' असं म्हणत अप्पण्णा

आणखी तिच्या जवळ सरकला.

तारक्का घाबरून म्हणाली, 'नाही, मध्यंतरी चार दिवस बरी होते. आंबे खाल्यामुळे हे असं झालं असणार.'

'हूं, आंबे खाल्यानं काय होतंय. दुसऱ्या बायकांना तर साधं दोन घास जेवायला देखील मिळत नाही कधी, आणि तुला आंबे खाऊन आजारपण येतंय होय? फालतू आपलं काही तरी सांगायचं!' तो काहीसा रागानं म्हणाला.

तारक्का पुढं काही बोलली नाही. त्याच क्षणी तिचा देह नवऱ्याच्या उपभोगाची वस्तू बनली.

रात्र, सरली, परंतु तारक्का अंथरूणावरून उठली नाही.अप्पण्णा दिवस उजाडायला थोडा अवधी असतानाच उठून कामावर निघून गेला. अम्मव्वा तारक्काला उठवायला आली. तिनं तिच्या अंगाला हात लावला तो तिला चटकन बसला. तारक्का तापानं नुसती फणफणत होती. हाताला चटका बसताच अम्मव्वाच्या तोंडून निघून गेलं:'आई ग, अंगाला जणू आग लागलीय हिच्या. काय ग तारा, तिला असा हा येवढा ताप चढला तरी कसा? हाय रे देवा, हिच्या वाटचा ताप मला का नाही येत! हे सारं पाहायला लावण्यापरीस देव माझे डोळे का नाही मिटत?'

तारक्का यावर काहीही बोलली नाही. तापामुळे ती ग्लानीतच होती. तिला कसलीच शुध्द बुध्द उरलेली नव्हती. थोड्या वेळानं नवऱ्यानं येऊन पाहिलं, काहीसा हादरलाच. पण वरकरणी तसं काही न दर्शविता म्हणाला, 'काय होणार आहे. होईल दोन दिवसांत बरी, आंबेच बाधलेत तिला..... फार आंबे खाल्लेतना!'

'आग लागो तुझ्या त्या आंब्यांना. तू आणलेच कशाला?'

'बिचारे आंबे काय करतील. हे असलं आजारपण असल्यावर?' लेकानं आईची समजूत घातली.

दोन तीन दिवस असेच गेले. अप्पण्णा आज ताप उतरेल, उद्या ताप उतरेल म्हणून वाट पाहत होता. पण ताप उतरण्याचे नाव तर सोडाच उलट तो सारखा वाढतच होता. ठणकाही वाढीला लागला. मधूनच डोळे फिरवायची. बेशुध्द होऊन पडायची. या वेळी तारक्काचा नवरा भारी व्यथित होऊन गेला. दुःखी झाला. अहोरात्र तिच्या आंथरूणाशी बसून तिची सेवाशुश्रूषा करायला लागला. एकदा असाच तारक्काचं मस्तक मांडीवर घेऊन तिच्या माथ्यावरून हळूवार पणे हात फिरवत असता तारक्काचे डोळे एकदम उघडले. ती अप्पण्णाच्या तोंडाकडे एकटक नजरेनं पाहायला लागली. अप्पण्णाला तिचं ते पाहणं सहन झालं नाही. त्याच्या डोळ्यातून आपोआप दोन अश्रू बिंदू ओघळले. ते पुसत नजर अन्यत्र लावीत त्यानं तिला कसबसं विचारलं, 'कसं काय वाटतं आता?' त्याच्या आवाजात पुरेपूर संकोच होता. ओशाळवाणेपणा होता.

तारक्का काही सांगू इच्छित होती. ओठ थरथरले, परंतु तोंडातून शब्द काही उमटू शकला नाही. जरा थांबून, ओठावरनं जीभ फिरवीत घसा साफ करीत हलकेच म्हणाली, 'अगदी बरं नाहीए. आईला आणि बाबांना बोलावून घ्या.' एक एक शब्द मोठ्या परिश्रमानं तोंडावाटे फुटत होता. ते ऐकून अप्पण्णाला हजार विंचवांनी दंश करावा अशा वेदना झाल्या. तिचं मस्तक आपल्या मांडीवरनं हळूच खाली ठेवीत तो बाहेर गेला. गड्याला ताबडतोब चांदूरला जाऊन आपल्या सासू-सासऱ्यांना घेऊन यायला सांगितलं पुन्हा आत गेला. मन अस्वस्थ होतं. मनातल्या मनात त्यानं प्रार्थना केली, 'देवा, ही एक वेळ वाचव रे हिला यातनं. कृपा कर येवढी माझ्यावर!' नंतर तो तिला देवाचा अंगारा लावायला गेला. तेव्हा तारक्काच्या तोंडावर विकट हास्य पसरलं. जणू ती त्याला म्हणत होती, 'मूर्खा, काय फायदा आता याचा?' अप्पण्णालाही ते कळून चुकलं. तो तिथं तिच्या जवळ थांबू शकला नाही, जरा दूर सरकून बसला. तापामुळे तारक्का शुद्धीत नव्हती. वात झाल्यागत ती बडबडायला लागली, 'बरं नाहीए मला, दूर व्हा जरा... हात लावू नका माझ्या अंगाला-व्हा दूर व्हा...' हे म्हणजे अप्पण्णाला जखमेवर डागण्यासारखं झालं. उठून बाहेर गेला. आई बरोबर थोडावेळ विचारविमर्ष केला. जवळच भाऊबंदांचं घर होतं. तिथनं भावाला आणि चुलतीला बोलावून आणण्यासाठी निरोप धाडला. दुसऱ्या एका गड्याला गाडी जोडायला सांगितली. संध्याकाळचे तेरदाळच्या सरकारी डॉक्टरला दाखविण्यासाठी तारक्काला घेऊन गेले.

डॉक्टरनं सारी तापसणी केली. बरोबर आलेल्या माणसांकडूनही सारी माहिती काढून घेतली. त्यांनी काही दिवसांपूर्वी तारक्काचा गर्भपात कसा झाला तिथपासून तो आजवर जे जे काही घडलं ते सारं डॉक्टरना सांगितलं. तारक्कानं पुन्हा एकवार डोळे मिटून घेतले. डॉक्टरनी एका नर्सला बोलावून काही सांगितलं. ती तारक्काला आत घेऊन गेली. आत नर्सनं जसं तिला तपासायला सुरूवात केली तशी तारक्कानं एक चमत्कारिक किंकाळी फोडली. तिच्या डोळ्यातून घळघळा अश्रू वाहायला लागले. नर्सनं बाहेर येऊन डॉक्टरांना म्हटलं, 'गर्भपाताची बाब नाही. परमा झाला असल्याची शक्यता वाटते, आजार विकोपाला गेलाय. तो आटोक्यात आणणं कठीण आहेसं वाटतं.'

डॉक्टरांनी सकाळी अप्पण्णाला बोलावून चार दिवसांचं औषध दिलं आणि म्हटलं, 'इथं थांबायची काही आवश्यकता नाहीए, घरी घेऊन जा.'

अप्पण्णा बाहेर आला. तारक्काच्या सोबत गेलेल्या एका माणसाला डॉक्टरनी सांगितलं, 'आता फार दिवस ती काढू शकेलसं काही वाटत नाही, तेव्हा तिचे आईवडील कोणी असतील तर बोलावून घ्या त्यांना-'

तारक्काला पुन्हा गाडीत नेऊन झोपविण्यात आलं. तारक्का शुद्धीवर होती. तिनं, 'आई गं फार दुखतंय' म्हणत आवती भोवती पाहिलं. मग नवऱ्याला जवळ बोलावून

घेत म्हणाली, 'पुन्हा का गाडीत झोपवलंय मला ?'

'घरी नाही का जायचं ?'

एक दीर्घ श्वास घेत ती उद्गारली 'घर ?' पुन्हा आणखी एक श्वास घेत म्हणाली, 'पुन्हा घरी ?' मग काही वेळानं विनवणीच्या स्वरात, तारा म्हणाली, 'माहेरी आईकडे घेऊन चला मला.'

'त्यांना निरोप धाडलाय, ते यायला निघालेही असतील.'

'येताहेत?' असं म्हणत तिनं डोळे मिटून घेतले. काही वेळ स्वस्थ पडून राहिली. मग नवऱ्याकडे करूणार्द्र नजरेनं पाहात डोळ्यात पाणी आणून म्हणाली, 'मला तिकडेच घेऊन चला, मळ्यावर नको. मी तुम्हाला अगदी हात जोडून विनविते. माझं येवढं हे म्हणणं ऐकाच.'

अप्पण्णाच्या डोळ्यातही अश्रू आले. त्यानं गाडीवानाला आज्ञा केली. 'तिच्या इच्छेनुसार गाडी लाइनी'च्या रस्त्यानं चांदूरला घेऊन चला.' त्यानं आपल्या एका माणसाबरोबर मळ्यात तसा निरोप द्यायला दवडला. गाडी चांदूरच्या रस्त्याला लागली. उन्ह वाढत चाललं. धूळ उडवीत धावणारी गाडी दुरून एखाद्या धूसर नक्षत्रासारखी दिसत होती. तेव्हा तारक्का ग्लानीतच होती.

रात्री दोन वाजता गाडी मगदुमच्या घरासमोर येऊन उभी राहिली. घरात मल्लप्पा आणि रत्नव्वा दोघेही नव्हते. त्याच दिवशी सकाळी ते होरीगेरीला निघून गेले होते. कुलूप तोडून तारक्काला घरात नेलं गेलं... तेव्हा तारक्का काहीशी शुद्धीवर होती. सावध होती. आपल्या गावी आल्यानं मनोमन प्रसन्न झाली. मुद्रेवर थोडी बहुत शांतीची चिन्ह दिसू लागली. तिनं मनाशी म्हटलं, 'माझ्यासाठी सारे लोक आहेत. आई, सासू, वडील, नवरा-पण त्यातलं कोणीही माझं नाही.' हा विचार मनात उमटताच तिच्या हृदयपटलावर अनंताची मूर्ती दृश्यमान झाली. त्या मूर्तीला त्या स्थानावरून भ्रष्ट करण्याचा उखडून काढण्याचा प्रयत्न करणाऱ्या भरमा आणि अप्पण्णाच्याही आकृती तिच्या डोळ्यासमोर आल्या. शेवटी एक वेळ अनंताला डोळे भरून पाहून मग प्राण सोडावा अशी इच्छा तिच्या मनात निर्माण झाली. या एकाच विचारानं ती आपल्या गावी आली होती. मळ्यात तर तो काही येऊ शकणार नाही. परंतु आपल्या गावी येऊ शकेल. पण इथं यावं तर आई-वडीलही घरी नाहीत. त्यांना माघारी बोलावून आणण्यासाठी आणखी एक माणूस दौडवण्यात आला. मल्ल आणि रत्नव्वा दोघेही होरीगेरीच्या मळ्यावर गेले. तिथून ते तेरदाळला गेले. दुसऱ्या दिवशी दुपारी थकले भागलेले असे चांदूरला परत येऊन पोहोचले. मुलीची अवस्था पाहून त्यांचं काळीज धडधडायला लागलं.

तारक्काला असह्य वेदना व्हायला लागल्या. दोन दिवसांपासून खोकलाही सुरू झाला होता. खोकताना कफाबरोबर रक्तही पडायला सुरूवात झाली. तारक्काला आतल्या

खोलीत झोपवण्यात आलं होतं. तिच्या जवळ तिचे वडील, नवरा, आई वगैरे सारीजण होती. तारक्का दीनवाणेपणानं म्हणाली, 'आई, अनंताला बोलावून घे. त्याला एकदा पाहावसं वाटतं.'

'ठीक आहे बाळ,' असं म्हणत रत्नव्वानं जावयाकडे पाहिलं.

अप्पणा म्हणाला, 'कोणी ऐनापूरला जाणार असेल तर धाडतो मी.'

त्याच दिवशी एकाला ऐनापूरला धाडण्यात आलं. एक दिवस उलटला. तारक्काच्या अंगावर अर्धवट फोड उठलेले दिसायला लागले. रत्नव्वाला वाटलं ह्या देवी आलेल्या दिसतात म्हणून तिनं ते अनुभवी लोकांना दाखविले. त्यांनी पाहिलं आणि सांगितलं की हे फोड देवीचे नव्हते. ही काही देवीची लक्षणं नव्हेत. तारक्का गुपचूप अंथरूणात पडून राहिली. अप्पण्णाला मळा सोडून आलेल्याला पाचसहा दिवस झाले होते, 'जरा जाऊन येतो.' असं म्हणून तो निघून गेला.

कसे तरी दोन दिवस गेले. अप्पण्णा पुन्हा परत आला. एक दिवस रात्री तारक्कानं आईला जवळ बोलावून म्हटलं, ' म्हातारपणी तुम्हाला आधार कोणाचा ? आता मी तर चालल्ये...'

अश्रू पुसत रत्नव्वा म्हणाली, 'असं का म्हणतेस बाळ ? तुला काय झालंय ?' हे बोलताना तिचा गळा दाटून आला होता.

'नाही मला बर नाही वाटत, जीव घाबरतोय, पोटात नुसती आग आग होतेय.'

'उष्णता वाढलीय का बाळ ?'

'थोडं पाणी देत्येस आई ?' तारानं मध्येच म्हटलं. रत्नव्वा तिला पाणी आणून देत म्हणाली, 'जास्त पाणी प्यायचं नाही हां, समजलं !'

'आता आणखी काय होणार आहे ? आण' म्हणत तारक्का थोडं अधिकच पाणी प्याली. नंतर म्हणाली, 'हे आलेत ?' रत्नव्वा उगी राहिली तसं तिनं पुन्हा विचारलं, 'अनंत नाही आला ?'

'नाही, बोलवायला धाडलं होतं. का आला नाही कोण जाणे !'

'आला नाही...' असं म्हणत तारक्कानं डोळे मिटून घेतले. तिच्या डोळ्याच्या कडांतून अश्रू घरंगळले, नाकपुड्यातून उष्ण निःश्वास बाहेर पडला. अप्पण्णा झोपेतून जागा होत तिच्या बिछान्याशी आला.

तारक्कानं शून्य दृष्टीनं चहुबाजूला बघितलं. नंतर अगदी हळूच रत्नव्वाला म्हटलं, 'अनंताला बोलावून आणायसाठी माणूस धाडशील ?'

'गड्यानं निरोप आणलाय की अनंत गावात नाहीए.' असं म्हणत अप्पण्णा उठून बाहेर गेला. झोपलेल्या आपल्या गड्याला-सिध्दाला जागं केलं आणि त्याला सांगितलं, 'असाच मिरजला जा. तिथल्या दवाखान्यात ऐनापुरचा अनंत नावाचा एक माणूस दाखल

झालेला आहे कसंही करून त्याला शोधून काढ. म्हणावं तारक्काचं दुखणं विकोपाला गेलंय. तुम्हाला ताबडतोब बोलावलंय. त्याला पुढ्यात घालून सकाळच्या पहिल्या मोटारनं निघून ये.' नंतर पाचाची नोट त्याच्या हाती देऊन त्यानं त्याची मिरजेला रवानगी केली. मग आत येऊन बायकोला म्हणाला, 'अनंताला बोलावून आणायसाठी सिध्दाला धाडलंय मी.'

तारक्का यावर काहीही बोलली नाही. फक्त कृतज्ञतेच्या नजरेनं तिनं नवऱ्याकडे पाहिलं. थोडं थबकून रत्नाकडे पाहत, 'आई, तुम्हा लोकांचं काय होणार गं ? अर्ध्या प्रवाहात तुम्हा दोघांना सोडून जातेय मी...' असं म्हणून स्फुंदून स्फुंदून रडायला लागली.

'तू गेल्यावर आम्ही तरी जगून काय करणार ?' म्हणत रत्नव्वा मुलीचं रडू थोपवता थोपवता स्वत:च रडायला लागली.

आईच्या म्हणण्याचा भाव समजण्याच्या अवस्थेत तारक्का नव्हती. सकाळ झाली. ऊन वाढायला लागलं, निसर्गाचं चक्र आपल्या नियमानुसार पुढे सरकू लागलं. तारक्काचं अंथरूण रक्तानं भिजलं. रत्नव्वाच्या जीवाला मोठा घोर लागून राहिला. मुलीला अशा प्रकारे मृत्यू यावा या विचारानं ती व्यथित झाली. त्या जोडीनंच तिच्या मनात अशीही कळ उठली की, 'मरण यायचं झालं तरी हे असं निपुत्रिक वांझपणाचं मरण यावं ? मग संध्याकाळ झाली तसं रत्नव्वाला स्पष्ट उमजून चुकलं की पोर काही आता यातून वाचत नाही. तीन दिवस झाले. मल्लुचा डोळ्याला डोळा नव्हता. अंगणात बसला होता. लोक येऊन त्याचं सांत्वन करण्याचा प्रयत्न करीत होते. रत्नव्वाला मुलीचं अंथरूण सोडून कुठं जाता येणंच शक्य नव्हतं. कोपऱ्यात दिवा जळत होता. त्यातून काजळी झडत होती. चांगली रात्र झाली. तारक्कानं क्षीणपणे 'आई !' करून हाक मारली.

'काय म्हणत्येस बाळ ?' तिच्या जवळ सरकत रत्नव्वानं विचारलं.

'मला बाहेर नेऊन झोपवतेस ?'

'का गं ?'

'जरा वारा लागू दे - इथं जीव गुदमरतोय...'

आता मुलीची अखेर जवळ येऊन ठेपलीय असं समजून रत्नव्वा ती जे जे म्हणेल ते ते ती शेवटची इच्छा म्हणून पूर्ण करीत गेली. लगेच बाहेर अंथरूण घालून मल्लला बोलावून त्याच्या मदतीनं तिनं ताराला त्या बिछान्यावर नेऊन झोपविलं. जराशानं रत्नव्वानं विचारलं, 'चहा घेशील का बाळ, करून आणू ?'

तारक्का जरा थांबून क्षीणपणे म्हणाली, 'करत्येस ? तर कर मग...'

अंमळशानं रत्नव्वानं चहा करून आणला. मुलीला पी म्हणून म्हणाली. चमच्या चमच्यानं तिनं तो तिला पाजला. तारक्का अगदी शांतपणे कपभर चहा प्याली. रत्नव्वाला

त्यामुळे काहीसं समाधान वाटलं. जराशानं तारानं विचारलं सिध्दण्णा गावाहून आला का ?'

'नाही बरं, का ग ?

'पहायसाठी जीवाची कासाविशी होतेय...' निराशेनं तारा म्हणाली.

काही काळ गेला. तारक्काच्या बिछान्याच्या आवती भोवती सातआठ लोक बसले होत. दिवा मंदमंदसा जळत होता. सर्वत्र निरव स्तब्धता पसरली होती. कसला काही आवाज नाही. आवाज होता तो फक्त तारक्काला लागलेल्या त्या विचित्र श्वासाचा.

'अद्याप रात्र किती बाकी आहे ?' आवाज चमत्कारिक होता.तिच्या पृच्छेतून एक प्रकारचा हताशपणा व्यक्त होत होता.

'उजाडायला आलंच आहे. मल्लनं म्हटलं. दिशा फाकायच्या आधी तारक्कानं पुन्हा एकवार क्षीण स्वरात विचारलं, 'अनंत आला ?'

'नाही.' रत्नानं उत्तर दिलं.

तारक्का जरासं थबकून म्हणाली, 'आई, पायाला मुंग्या आल्यासारखं वाटतंय, जरा हात फिरव ना.....'

नंतर तारक्का काहीही बोलली नाही. रत्नव्वा पोरीच्या पायापाशी सरकून पायावरनं हात फिरवायला लागली. आवती भोवतीचे लोक म्हणाले. 'पायाची नाडी बंद पडायला लागली असणार!'

'आता काही नाही. सारं संपायलाच आलय....' म्हणत रत्नव्वा रडायला लागली.

लोकांनी तिला समजावित म्हटलं, 'हां रडू नकोस.... शांतपणे तिला प्राण सोडू दे....'

सकाळ झाली, लोक तसेच बसून होते. तारक्काचं मस्तक नवऱ्याच्या मांडीवर होतं. श्वास मंद होत चालला. हळू हळू तोंड उघडायला लागलं. सर्वांनी तिच्या मुखात चमचा पाणी घालणं सुरू केले. तिच्या कानात कोणीतरी 'नमोकार' मंत्र उच्चारला. काळजाची धड धड वाढली. तारक्कानं एकदम डोळे विस्फारून चहुबाजुला निरखून पाहिलं. अखेर तिनं निराशेनं एक दीर्घ उसासा टाकला आणि डोळे मिटून घेतले. डोळ्याच्या कोपऱ्यातून फक्त दोन अश्रू बिंदू बाहेर घरंगळले. काळजाची धडधड थांबली. अखेरचा श्वास नाकावाटे बाहेर पडला.आणि त्या बरोबरच ताराचा प्राणपक्षी अनंत अवकाशात अंतर्धान पावला.

ही बातमी ऐकून चांदूरचे अवघे लोक हळहळले. पाहता पाहता लोक जमले आणि तारक्काचे शव अंतिम क्रियाकर्मांतरासाठी नदीकाठी घेऊन गेले.

अनंताला छोट्याशा टूरिंग कार मध्ये बसवीत भंगारीने विचारले, 'अंगात अजून खूप अशक्तपणा आहे, मी ही बरोबर येऊ का ?'

'छत्, तुला बरोबर घेऊन जाऊ ? तारासमोर ?' अनंतानं तुच्छतेनं विचारलं.

भंगारी पुढे काही एक बोलली नाही. अनंताला दडवून अश्रू पुसत पुसत ती दूर बाजूला सरकली. कार पुढे निघून गेली.

अनंताकडे वळून सिध्दा पुन्हा म्हणाला, 'लक्षणं काही बरोबर दिसत नव्हती !'

'तिला चांदूरला कधी आणलं ?'

'पाच सहा दिवस झाले आता.'

या आधी का नाही कळवलं मला ?' अनंत दु:खानं म्हणाला.

'तीन दिवसांपुर्वी आपल्याला ऐनपुरात शोधून पाहिलं. पण आपला पत्ता लागला नाही. म्हणून काल मला इकडे धाडलं गेलं. परंतु रात्रीपत्तोर आपली भेट होऊ शकली नाही.'

'तू आल्यावर ही एक रात्र तशी व्यर्थच गेली ना !' अनंत त्याला म्हणाला.

'डॉक्टरांकडून परवानगी काढायची होती. काय करणार ?'

कार वेगानं जात होती. परंतु अनंताला वाटलं की किती सावकाश जातेय ही ! चांदूरचा रस्ता तसा सारा दोन तासांचा पण त्याला वाटलं की जणू काही दोन दिवस झालेत आपण हा प्रवास करतोय ! अनंतानं ड्रायव्हरला तीन चारदा गाडी जरा जोरात हाक म्हणून सांगितलं. वाटेत लागणाऱ्या गावांकडे त्याचं मुळी लक्षच नव्हतं. चांदूरला पोहोचायच्या आधी दोन तीनदा 'हा इकडनं वळवा' म्हणाला. तो वेड्यासारखा इकडे तिकडे पाहायचा. मध्येच उठून उभा रहायचा प्रयत्न करायचा, प्रकृती बरी नसल्यानं तोल जाऊन खाली आदळायचा. असं काही झालं की एक प्रदीर्घ श्वास घेऊन विचारायचा, 'सिध्दा, अरे अजून किती दूर आहे ?'

'आता काय, गाव आलंच की....' सिध्दा त्याला दिलासा देत म्हणायचा. तसं रडकुंडीला आलेल्या एखाद्या मुलाप्रमाणे अनंत विचारायचा, 'मी पोहोचेपर्यंत राहील ना ती ?'

त्याची ती अवस्था पाहून सिध्दा त्याला धीर देत म्हणायचा, 'अहो, न रहायला त्यानं असं काय झालंय ?'

अनंतानं आकाशाकडे पाहत हात जोडीत म्हटलं, 'तर मग ठीक आहे भाऊ. ही सारी परमेश्वराची कृपा !'

कार चांदूरला पोहोचे पोहोचतो सकाळचे जवळ जवळ नऊ वाजले होते. अजूनही गाव दोन फर्लांग दूरच होतं. समोरून एक माणूस येताना दिसला. कारचा भोंगा वाजताच अनंतानं त्या माणसाला पाहून गाडी लगेच थांबवायला सांगितली. गाडी थांबताच तोंड बाहेर काढून अनंतानं त्या वाटसरूला विचारलं, 'तारा कशी आहे ?'

'कोणाची तारा ?' त्यानं आश्चर्यानं विचारलं.

'मगदुमच्या रत्नाची मुलगी, तारा.'

अनंताची एकूण अवस्था पाहून तो माणूस क्षणभर गप्प बसला. नंतर मग दु:खद मनानं म्हणाला, 'ती तर आज सकाळीच वारली. कशी सोन्यासारखी मुलगी होती!'

ते ऐकलं आणि अनंत मागच्या मागेच कोसळला! त्याच्या तोंडून एक प्रदीर्घ नि:श्वास बाहेर पडला. त्याला वाटलं की जणू काही कोणी आपला आत्माच आपल्यापासून हिरावून घेतला आहे. तो मूर्च्छित पडल्यासारखा झाला. त्यानं एकदम डोळे फिरवले. सिध्दानं घाबरून अनंताला धरून ठेवीत डोळ्यातून पाणी गाळीत पुढ्यातल्या त्या माणसाला विचारलं, 'किती वेळ झालाय?'

'तसा फार वेळ नाही झाला. हे अर्धा तास झाला असेल, तिला नदीवर घेऊन गेलेत ते.'

अनंत ताडकन जागचा उठला. त्याला कोठून हे येवढं विलक्षण बळ एकाकी प्राप्त झालं होतं कोण जाणे! सिध्दाला जोरात एकाबाजूला ढकलीत त्यानं कार बाहेर उडी घेतली. आणि शेताडी तुडवीत नदीच्या दिशेनं तो धावत सुटला. सिध्दा त्याच्या पाठोपाठ धावत जात ओरडून म्हणाला, 'भाऊ तुमची तब्येत बरी नाहीए मागे फिरा. कार मध्ये बसा. तुम्हाला तिकडेच घेऊन जाईन....'

अनंत मागे वळून न पाहता पडत झडत पुन्हा उठून उभा राहत, धापा टाकीत टाकीत पुढे पुढे जात होता. सिध्दाही त्याच्या पाठोपाठ धावला आणि त्याला गाठून त्यानं त्याचा हात पकडला. अनंताच्या नाकातून रक्त ओघळायला लागलं होतं. पण त्याचं तिकडं लक्षच नव्हतं. तसाच धावत राहिला. थोड्या वेळानं तो स्मशानात पोहोचला.

तोवर तारा धडधडत्या चितेत जळायला लागली होती. अनंतानं तिला दुरूनच पाहिलं. त्याला जुने दिवस आठवले. त्याला भास झाला. तिथं चितेवर तारा नाही जळत. आपलं सबंध आयुष्यच त्या चितेत जळतंय.... आणि ते दृश्य समोर येताच त्याच्या डोळ्यासमोर एकदम काळोखी पसरल्या सारखं होऊन तो खाली जमिनीवर कोसळला.

सिध्दानं त्याला दंडाला धरून उठवून बसविलं. अनंत काही काळ तसाच गप्प बसून राहिला. असं वाटत होतं की मनात तो कसला तरी विचार करतोय. त्याच्या डोळ्यांसमोरून त्याच्या आणि तारक्काच्या बाळपणातल्या सुखी जीवनाची एक एक दृश्यं सरकत गेली. त्याच प्रमाणे ती जत्रा, त्या पहाटेचे ते चांदणे, जायच्या तयारीत उभी असलेली तारा..... सारे गंभीर प्रसंग एखाद्या चित्रपटासारखे त्याला वाटले; तसं त्याच्या अंगात कसला तरी आवेश संचारल्यासारखं झालं. त्या आवेशाची चिन्हं त्याच्या मुद्रेवर प्रतिबिंबित व्हायला लागली. अनंत एकदम जागचा उठला आणि सिध्दाच्या हाताला हिसडा देत स्वत:चा हात सोडवून घेत ताराच्या चितेच्या दिशेनं धावत सुटला.

'धरा! धरा! आवरा त्याला.' म्हणत सिध्दाही त्याच्या पाठोपाठ धावत सुटला.

लोकांनी वळून पाहिलं. 'काय झालं..... काय झालं?' म्हणत रडत रडत म...

उठून उभा राहिला. तेवढ्यात तिकडे दुर्लक्ष करीत अनंतानं धाडकन चितेत उडी घेतली. 'का असं का ?' म्हणत पाच सहा जणांनी त्याला धरून चितेतनं बाहेर ओढून काढलं.

अनंत बेशुध्द होऊन जमिनीवर कोसळला. तो पुन्हा शुध्दीवर म्हणून आला नाही. त्याची जीवन ज्योत तिथेच मालवली.

**Printed at Gayatri Offset Press, Noida**